# नवभारत

४८८३

वर्ष २ रें ] एप्रिल १९४९ [ अंक ७ वा



१ आणा

अनुक्रमणिका




नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**
**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका

## चित्रशाळा (तीन अंकी नाटक)

[लेखक : श्री. नाना जोग; प्रकाशक : श्री. म. म. केळकर, मनोहर ग्रंथमाला, टिळक रोड, पुणें २; (डिसेंबर १९४८); पानें ९४; किं. १॥ रु.]

रसाशिवाय काव्य नाहीं; आणि काव्यांतहि अत्यंत रमणीय असें जे नाटक त्यांत तर 'नानारसानीं युक्त असें लोकचरित असतें' असें नाटककार कालिदास म्हणतात. श्री. नाना जोग यांच्या या 'चित्रशाळा' नाटकांत असें लोकचरित धुंडाळीत असतां काय आढळून येतें ? नायिका— शोभा हिचा नाटकांतील बहुतेक संसार चहा, धुणीं-भांडीं, उष्टींखरकटीं यांनींच व्यापून गेलेला दिसतो. या अशा संसारांत रसांचा राजा जो शृंगार त्याचा आविष्कार त्या नायिकेच्या भूमिकेंत दिसावयास कोठें अवसरच नाहीं. शृंगार नाहीं म्हणजे शृंगारा-पोटीं येणारा विरहहि नाहीं ! मग करुणरसाला वाव कोठला ? नाटकांत संवाचा गोंधळ अथपासून इति-पर्यंत दिसतो. त्यामुळें रौद्र, वीर, भयानक इत्यादि रसांचा कांहींसा आभास होतो खरा. नायक प्रकाश याच्या 'चित्रशाळें'त भंगिणीचें एक चित्र रंगविलें जात असल्याचा उल्लेख आहे. हें बीभत्सरसाचें उदा-हरण असें कदाचित् कोणी म्हणूं शकेल. आणि नायक हा एकदा अर्धनारीनटेश्वराचें चित्र रंगवि-ण्याचा आव आणून नायिकेच्या नाकाखालीं मिशी-सारखा फराटा ओढतो. या दृश्यानें हास्यरसही नाटकांत आहे असें म्हणतां येईल. म्हणजे प्रमुख रसांचा पूर्ण अभाव आणि बाकीच्यांचा किंचित् भास असें हें नाटक वरील व्याख्येनुसार 'नाटक' या संज्ञेला पात्र होईल कीं काय अशी शंका मनांत येते.

पण प्रस्तावनाकार श्री. दादा धर्माधिकारी ...

... मालेच्या विश्वस्त-मंडळाकडे ...

अतिशय आवडलें' असा आपला अभिप्राय देतात ! मात्र, तो देतांना ते त्याला एक पुस्त जोडतात : "पण तें 'आवडणें' आजच्या जगां प्रतिष्ठितपणाचें द्योतक आहे कीं नाहीं हें म माहीत नाहीं. त्यामुळें अमुक एक मला आ म्हणण्याचीही भीति वाटते." या ए 'आजच्या जगांत' हे शब्द हेतुपूर्वक असावेत असें वाटतें. म्हणजे 'उद्यांच्या ... आवडणें प्रतिष्ठितपणाचें द्योतक होईल ०१–५०६ म्हणावयाचें आहे असें दिसतें. पण ५०७–५०८ हृदयशून्य भकास दृश्य जें समोर दिस ०९–५१३ होईल असें आज तरी कोणतेंहि ५१३ नाहीं. त्यावरून हें त्यांचें म्हणणेंहि ५१४ होईल तें सांगवत नाहीं. अनेक प्रक ५१५–५२४ झालेले लोक सभोंवार सर्वत्र दिस ५२५–५२९ बाजार, लांचलुचपत व भांडवलश ५३०–५३५ करणारी पिळवणूक यांनीं गांजले ५३६–५३९ उपाशी मरत आहेत; त्यांची होत आहे. तरीहि, या गोष्टी ५४०–५४४ जगांत नाहीं अशी बेफिकि दिसते. कलात्मक वाङ्मयाच्य ५४५–५५३ टाकली तर ही बेफिकीरी वृत्ति ५५४–५६२ आल्यावांचून रहात नाहीं. ५६३–५६५ गोष्टीची ददात नाहीं, ५६६–५७२ विवंचना नाहीं असे हजारों बंगले ३–५७४ नागरिक आपल्याच विशिष्ट ५७५ रागद्वेषांच्या लहरींनीं निर्माण ५७६ रसाळ चित्रें ज्यांत रंगविलीं आहेत, कलाकृतींचें, आरामशीर, गुलगुली गिरद्यांनीं मढविलेल्या कोचावर रु. १ कलाकृति नाटक असल्यास प्रेक्षा ...

... पुणे २, येथें








वरून, कोडकौतुक करीत असल्याचें दृश्य आज
ांस दिसत आहे. नाममात्र म्हणण्याचें कारण
कलाकृतींतील जीवन अगदीं निर्लेप अशा
एकांगी मानवी व्यक्तीचें रंगविलेलें असतें.
सामाजिक, धार्मिक, आर्थिक अशी जी सांप्रतची
जागतिक परिस्थिति, तिच्यांतून निर्माण झालेल्या
संमिश्र अशा विविध–अंगी जीवनाचा साक्षात्कार
त्यांत नसतो. अशा जीवनाचें चित्र मला या
'चित्रशाळा' नाटकांत मात्र पहावयास मिळालें.
ा हें चित्र आजच्या जगाला कसेंसेंच वाटतें; तें
ला सोसवत नाहीं; रुचत नाहीं; त्यांत त्याला
ीच वाटत नाहीं; आजच्या वर दिग्दर्शि‍ा
वास्तविक जगाच्या पार्श्वभूमीवर यांत जें
वेलें आहे तें उद्यांच्या जगाचें आहे. तें
लेनें रंगविलेलं नाहीं, वास्तविक जग
करून घेऊन तें रंगविलेलें आहे.
भावी उच्च आकांक्षा कोणत्या
स्पष्टपणानें मांडलेल्या आहेत.
ही युगांतील कामगारांच्या चळा-
णारा या नाटकांतील संपाचा
तो त्या आकांक्षा पुढील शब्दांत
सर्गाच्या संपत्तीवर, माणसाच्या
ीवर भांडवलदारांनीं आपली
ादून आज माणसाच्या अन्
ताची अमानुष भिंत उभी
ामुळें वित्त नसेल तर माणु-
न् असेल तर वित्ताचें कुंप-
ं शेत खाऊन टाकतं! जेव्हां
जमीनदोस्त होईल तेव्हांच
सारी शक्ति एकवटून मुक्त
समाजाला देण्याचं अन् गरज
समाजापासून मागण्याचं स्वातंत्र्य
ाचं आहे.'' या आकांक्षा सफल
र्थ कोणामध्यें येऊं शकेल ? या
पुढें नायिका शोभा हिच्या
देतो : ''माझ्यासारख्या दांडग्या
ाशील असं झालं पाहिजे तुला.''
त्रा अर्थ असा कीं तशीच वेळ

आली तर स्वतःच्या मरणालाही तयार होऊन त्या मरणांतून नवजीवनाची निर्मिति तुला करावी लागेल. आणि त्या निर्मितींतच तें सामर्थ्य आपो-आप येईल. शोभा या वेळीं गर्भवती असते. त्याला अनुलक्षूनच गोविंदाची ही भविष्यवाणी आलेली आहे. शोभा या भविष्यवाणीची जाणीव आपला प्रिय-कर प्रकाश याला पुढील शद्बांत करून देते. ''ऐक! ऐक हा हुंकार!–पोटच्या गोळ्याचा–एका तिळभर जीवाचा–जो कितीही दुबळा असला आज–नाहीं ज्याला ज्ञान–अन् चोहींकडून कोंडला असला तरी ज्यास भरवीन घास–एकेक सावकाश–माझ्या रक्ता-मांसाचा–अन् मग जो, फुटतांच प्राण, शब्द, पंख–सोडून सावली माउलीची, मोडून छत्र तिचं, करून निशाण, सुटतो जसा बाण एका क्षणीं तसा एका क्षणांत होईल तो स्वतंत्र! पण हा आई होण्याचा सोहळा–हा सुखसोहळा आपल्या मर-णाचा–मरून जगण्याचं हें जीवनतंत्र.'' प्रस्तावना-कारांनीं म्हटल्याप्रमाणें ''मार्क्सच्या द्वंद्वात्मक भौतिक वादाच्या उपपत्तीचें निरूपण वरील शोभेच्या उद्गारांत आहे. या उपपत्तीची सत्यता भौतिक शास्त्रांचा विकासच ठरवील.''

अखेरीस प्रस्तावनाकार या व इतर जुन्या नाट-कांतील फरक स्पष्ट करून दाखवीत आहेत, तो लक्षांत घेण्यासारखा आहे. ''यांत इतर जुन्या नाटकांप्रमाणें कुठलाहि रस उत्कट किंवा तीव्र स्वरू-पांत नाहीं. माणूस ढळढळां रडेल, खदखदां हसेल किंवा त्याच्या आंगरख्यांचे बंद तटातट तुटतील असे प्रसंगहि त्यांत नाहींत. तरी पण अंतःकरणाला चटका लावणारे, बुद्धीला गति देणारे, मनाला डिवचणारे असे हृदयंगम प्रसंग त्यांत खास आहेत.'' म्हणंजे परंपरागत मानलेले शृंगारादि भावनाचे रस 'रसग्रहणा'साठीं जरी यांत नसले तरी उद्यांच्या जगाला साजणारे व मानवणारे बुद्धि-गम्य रस यांत अनेक आहेत. प्रस्तावनाकार म्हणतात, ''शेवटला भाग–कळायला किंचित् कठिण वाटेल. पण कलेच्या दृष्टीनें तो उत्कृष्ट उतरला आहे. व तो मोठा गंभीर, उदात्त व रमणीय आहे.''

— त्र्यं. सी. कारखानीस

अनुक्रमणिका






सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्त–मंडळाचें मासिक

वर्ष दुसरें

अंक सातवा

# नवभारत

संचालक : श्री. शंकरराव देव

संपादक-मंडळ

आचार्य शं. द. जावडेकर–आचार्य स. ज. भागवत – श्री. हरि कृष्ण मोहनी – प्रा. वि. म. बेडेकर



सहामाही रु. ५ अंकास रु. १

नं. १ जोशी यांनीं सुलभ मुद्रणालय, २९१ शनिवार, पुणें २, येथें

मालेच्या विश्वस्त-मंडळाकरितां तेथेंच नवभारत का...

का. संपाद...
...थहि नव...
'एकच जग'
...ली. ही कल्पन...
कल्य...
मात्र कुठें
म्हणजे ए...
लाग...
पेटली. प्रेम.
एकाच वेळीं आव...
सर्व ठिकाणीं धुमसूं
विचारवंतांकडून ऐक्य.






# 'नवभारत' एप्रिल १९४९

## लेखक-परिचय

[ली दिलेल्या लेखकांशिवाय या अंकांतील इतर लेखकांचे लेख 'नवभारतां'त पूर्वी आले
या वेळीं त्या लेखकांचा परिचय दिला आहे— का. सं. ]

**भागवत**, एम्. ए.-(मुंबई)—समाजशास्त्र व मानववंशशास्त्र यांच्या व्यासंगी अभ्यासक.
या 'राजारामशास्त्री भागवत यांचें चरित्र', 'Romance in Pali Folklore' इत्यादि
ास्त. पुस्तकांच्या लेखिका. 'Hinduism and its Future in the New World Society' ह्या
ालें श्री. शीलवती केतकर यांच्या सहकार्यानें लिहिलेल्या पुस्तकांत त्यांनीं डॉ. केतकर यांच्या हिंदुसमाजविषयक विचारांचें संक्षिप्त संकलन केलें आहे. प्रा. क्षीरसागरांनीं या अंकांतील आपल्या लेखांत डॉ. केतकरांचा म्हणून उल्लेख केलेला इंग्रजी उतारा याच पुस्तकांतील आहे.

**लवती केतकर**— डॉ. श्री. व्यं. केतकर यांच्या विदुषी पत्नी. यांनीं श्री. दुर्गा भागवत यांच्या सहकार्यानें प्रसिद्ध केलेल्या पुस्तकाचा उल्लेख वर आलाच आहे. त्यांनीं केलेल्या इंग्रजी अनुवादांपैकीं "A History of Indian Literature" by M. Winternitz, "On the Soul of the Indian Woman as reflected in the folklore of the Konkan" by Hedwig Bachmann in two vols. हे ग्रंथ सुप्रसिद्ध आहेत.

**. म. आपटे** एम्. ए., पीएच्. डी.— इस्माइल कॉलेज, जोगेश्वरी येथें संस्कृत प्राध्यापक. वैदिक वाङ्मयाचा भाषाशास्त्रदृष्ट्या अभ्यास व वैदिक संस्कृतीचें समालोचन हे यांच्या व्यासंगाचे विषय आहेत. त्यांचे संशोधनात्मक असे सुमारें २५ लेख संशोधनविषयक नियतकालिकांत प्रसिद्ध झाले असून 'Social and Religious Life in the गृह्यसूत्र' "The Vedic age (in the History of India edited by Dr R. C. Majumdar)" इत्यादि दहा पुस्तकें व निबंध प्रसिद्ध झाले आहेत.

**. शं. फाटक**— बी. कॉम्. (पुणें)—बृहन्महाराष्ट्र कॉलेज ऑफ कामर्समध्यें 'ट्यूटर'. सा[illegible] चित्र व संगीत या कलांचे अभ्यासक.

**. ह. मोडक**— (मुंबई) शास्त्रीय समाजसत्तावाद व पुरोगामी ललितवाङ्मय यां[illegible] व प्रकाशक. 'लोकसाहित्य' या प्रकाशन संस्थेचे व्यवस्थापक. अलेक्झांडर [illegible] 'गोर्की चरित्र', 'मुलांचा लेनिन' इत्यादि अनुवादात्मक पुस्तकांचे लेखक.

**. कृ. लागू**, एम्. ए. — (पुणें) स. प. कॉलेज, पुणें, यामधील इंग्रजीचे प्रसिद्ध हल्लीं सेवानिवृत्त. Enoch Arden, Lycidas. Isabella वगैरे त्यांनीं संपादन केलें असून, 'दिवाकरांच्या नाट्यछटा', 'साहित्य-सु[illegible] पुस्तकांचेंही संपादन केलें आहे.

---

श्री. दुर्गा भागवत

# 'एक जगा'ची कल्पना आणि डॉ. केतकर

महाराष्ट्रीय 'ज्ञानकोश'कार डॉ. श्रीधर व्यंकटेश केतकर यांच्या निधनाला येत्या १० एप्रिल १९४९ ला बारा वर्षें पुरीं होतील. या त्यांच्या श्राद्धतिथीच्या निमित्तानें या अष्टपैलू महापांडिताचें पुण्यस्मरण करतांना त्यांच्या विचारसंपदेमधील एक जो अत्यंत उज्ज्वल व जिवंत विचार प्रस्तुत लेखिकेस वाटतो, त्याचें या लेखांत थोडक्यांत दिग्दर्शन करावयाचें योजिलें आहे.

## कल्पनेचा उगम व विकास

सार्वभौम किंवा जागतिक राष्ट्रीयत्व म्हणजे सर्व जग एकाच राष्ट्रीयत्वाच्या सूत्रानें बांधलें जाणें; समान संस्कृतीच्या योगानें निरनिराळ्या समाजांचें जगभर ऐक्य होणें—मग ही संस्कृति यांत्रिक असो कीं आध्यात्मिक असो—; ही भव्य मनोरंजक कल्पना पाश्चात्य जगांत १९३२ सालीं इंग्लंडमध्यें एच्. जी. वेल्स ह्यांनी ध्वनित केली. रशियाच्या क्रांतीनें ज्या अर्थी आर्थिक संस्कृतीचा पाया बदलला, त्या अर्थी इतर बाबतींतहि अशा तऱ्हेचें राष्ट्रीयत्व जगभर फैलावणें नुसतें शक्यच नव्हे, तर अत्यंत श्रेयस्कर आहे, असा गंभीर विचार पाश्चात्य विचारवंतांपुढें आला. पण ही कल्पना कितीहि उदात्त आणि मानवजातीचें कल्याण साधणारी असली, तरी ती व्यवहारांत मात्र कुठेंच मूळ धरीना. होतां होतां ही कल्पना म्हणजे एक आभासच आहे असेंच बहुतेकांना वाटूं लागलें!

त्यानंतर कांहीं वर्षांनीं दुसऱ्या महायुद्धाची खाई पेटली. प्रेमानें नव्हे तर भयंकर द्वेषानें सर्व जग एकाच वेळीं आवळलें गेलें. वैर ही एकच भावना सर्व ठिकाणीं धुमसूं लागली. अशा वेळीं पाश्चात्य विचारवंतांकडून ऐक्याचा दुसरा सूर स्पष्टपणें १९४५ मध्यें आला. गांधीजींचें विश्वप्रेमाचें सूत्र जरी पाश्चात्यांनीं दिमाखानें त्या वेळीं धिक्कारलें, तरी एका अमेरिकन गृहस्थाचा संदेश मात्र पाश्चात्यांना दडपून टाकणें सोपें नव्हतें. तें त्यांना इष्टहि नव्हतें. वेंडेल विल्कीनें One World किंवा 'एकच जग' ही नितांतसुंदर कल्पना जगापुढें मांडली. ही कल्पना प्रत्यक्ष कृतीनें सुचविणारे भारताचे महान् नेते त्या वेळीं तुरुंगांत होते. त्यांचा सूर तर केव्हांच दडपला गेला होता. विल्कीच्या घोषणेनें अर्धें शिक्षित जग जागें झालें. त्यानें ह्या कल्पनेचा पुरस्कार केला. पण बाकीच्या अर्ध्या साम्राज्यवादी जगानें फिरून तिच्यावर जोरानें प्रहार केला. ह्या दोन क्रियांचे ध्वनि-प्रतिध्वनि अद्याप सर्वत्र ऐकूं येत आहेत. त्यामुळें एकच गोष्ट सिद्ध होते कीं सार्वभौम राष्ट्रीयत्वाची कल्पना ही चिरडली जाणारी सामान्य वस्तु नव्हे. तिला कदाचित् मुरड घालावी लागेल. पण ती नक्कीच डोकें वर काढल्यावांचून रहाणार नाहीं.

## विश्वनागरिकत्वाचे पहिले भारतीय पुरस्कर्ते

गांधीजी, वेल्स व विल्की ह्यांच्यासारख्या जगद्विख्यात पुरुषांच्या कल्पनांची ही संभावना! तेथें प्रत्यक्ष हिंदुस्थानांत सुद्धां ज्याला महाराष्ट्राबाहेर फार लोक ओळखीत नसत, त्या डॉ. श्रीधर व्यंकटेश केतकरांसारख्या भारतीय विद्वानाची काय कथा सांगावी! विश्व-राष्ट्रीयत्वाची कल्पना जर पहिल्यांदा कुणी पुढें मांडली असेल तर ...णि उघडपणें केतकरांनींच. १९१२ सालीं अमेरिकेंत ... सांगण्यांत त्यांचा हातखंडा ... असतांना 'हिंदु ज... चाकोरींतून ते रतिमात्र इकडे वळ... प्रथम घोषित के... ह्या देशांतल्या सामाजिक स्थितीवर आणि तें अमेरि...नीं लिहिलें. पण ते एक सुधारक तरी होते सांस्कृतिक ऐ...



अनुक्रमणिका





केला नाहीं. पुढें केतकरांचा व्यासंग वाढला. तसतश्या ह्या कल्पनेला पण पारंब्या फुटल्या. १९२५ सालीं ज्ञानकोशाच्या प्रस्तावना-खंडाच्या पहिल्या भागांत, विशेषतः बारा ते पंधरा या प्रकरणांत, ह्या कल्पनेचीं मुळें खूप खोल गेलेलीं दिसून येतात. केतकरांच्या भाषेंत सांगावयाचें म्हणजे 'मनुष्यजातीचें परमोच्च ध्येय व कल्याण जगांतील सर्व माणसांचा एक समाज बनवणें' हेंच होय. हें सांस्कृतिक ऐक्य एक कविकल्पना नसून हरतऱ्हेच्या व्यावहारिक आराखड्यांतून पूर्णपणें पारखून घेतलेला बहुमोल सिद्धान्त आहे. हिंदु समाजाची पुनर्घटना हा केतकरांचा अत्यंत जिव्हाळ्याचा विषय आहे. आपल्या जातिभेदांनीं बुजबुजलेल्या समाजालाहि विश्वनागरिकत्वांत मानाचें स्थान मिळेल ही थोर आकांक्षा त्यांच्या सर्व लेखनांत स्पष्टपणें उमटलेली दिसून येते. इतकेंच नव्हे तर, अगणित जाती–जमाती आणि बहुरंगी धार्मिक पंथ ह्यांनीं विस्कळित झालेला हिंदुसमाज अद्यापहि आंतून बलशाली आहे, इतर समाजांशीं एकरूप होण्याचें, इतकेंच नव्हे तर इतर समाजांना मार्गदर्शन करण्याचेंहि सामर्थ्य त्यामध्यें आहे, हें डॉ. केतकरांनीं हरतऱ्हांनीं सिद्ध करून दाखविलें आहे. त्यांच्या लेखनांतील अतिशय गंभीर आणि चैतन्यपूर्ण भाग तो हाच आहे. बाकीचें समग्र केतकर-वाङ्मय नष्ट होऊन एवढींच त्यांचीं पानें जरी वांचलीं तरी त्यांत त्यांच्या विद्वत्तेचें, व्यक्ति मत्त्वाचें, प्रतिभेचें आणि व्यासंगाचें अथांग दर्शन वाचकाला होईल! ह्या कल्पनेवर १९३५ सालीं त्यांनीं फिरून हात फिरविला, आणि भारतीय समाज शास्त्रावरील आपल्या ग्रंथात त्यांनीं ह्या कल्पना हिंदुस्थानांतील जातीजातींचें तपशीलवार विवेचन करून, हिंदूंच्या स्मृतींचा समग्र आढावा घेऊन सप्रमाण सिद्ध केल्या आहेत. पण इतकें झालें तरी आमच्या इकडील पंडितांना अजून देखील ह्या विश्व... ...नागरिकत्व डॉ. केतकरांना देतांना

प्रा. रा. कृ. लागू, एम्‌... ...हेरच्या ज...ची गोष्टच

हल्लीं सेवानि...

त्यांनीं संपादन के... खेंचल जातात?

पुस्तकांचेंही संपाद... ...शांततेची लाट

...पासूनथी होत

असतात, तेव्हां एकाच तऱ्हेची विचारसरणी न कळत तयार होत असते. अत्यंत संस्कारक्षम मनावर त्या विचारसरणीचा ठसा स्पष्ट उमटून येतो आणि प्रभावशाली व्यक्ती ते विचार नाना तऱ्हेच्या प्रयोगांनीं आणि लेखनाच्या व भाषणाच्या रूपानें लोकांपुढें मांडीत असतात. विश्वनागरिकत्वाची कल्पना ही अलीकडील सर्व भयंकर घटनांनाहि न जुमानतां धीटपणानें बाहेर डोकावणारी सर्वांत शुभ अशी कल्पना आहे. ह्या कल्पनेच्या प्रणेत्यांना विसरणें कृतघ्नपणाचें ठरेल!

एकादा पाश्चात्य विचारवंत एकादी कल्पना जगापुढें ठेवतो, तेव्हां त्याच्या भूमिकेंत आणि तीच कल्पना एकादा भारतीय विचारवंत जगापुढें मांडतो त्या भूमिकेंत फार अंतर असतें. स्वतंत्र, सत्ताधिष्ठित राष्ट्रांतील व्यक्ति आपल्या कल्पना नुसत्या लेखरूपानें जगापुढें मांडूं लागली तरी त्या कल्पनांचा फैलाव व बोलबाला झपाट्यानें होतो. राजकीय पार्श्वभूमीमुळें तीं मतें उठावदारपणें दिसूं शकतात. पण गुलाम राष्ट्रांतील महात्म्याला सुद्धां, युगांतरीं भंग पावणार नाहींत अशा उच्चतम कल्पना प्रसृत करतांनाहि, भक्कम प्रचारयंत्राचा आश्रय घ्यावा लागतो. स्वाभाविकच, गुलामांखेरीज श्रोते त्यांना मिळत नाहींत!

डॉ. केतकरांचा विश्वनागरिकत्वाचा हा अभिनव सिद्धान्त सुद्धां ज्ञानकोशाच्या पानांत मुकेपणीं अडकून राहाण्याचें हेंच कारण आहे. कल्पना सत्यावर अधिष्ठित होती. तिची झेंप मोठी. छपाईच्या सुलभ साधनांमुळें 'प्रसिद्ध' होऊनहि तिला प्रचाराच्या अभावीं पंख फुटून जगत्संचार करतां आला नाहीं. एवढेंच काय, पण भारतीय आणि पाश्चात्य विचारवंतांच्या विचारांची दिशा आणि कार्यक्षेत्र सुद्धां एकच असलें, तरी त्यांच्या कार्याच्या कक्षेंत आमूलाग्र फरक असतो. भौतिक शास्त्रांच्या बाबतींत सुद्धां हा फरक प्रामुख्यानें जाणवतो. सर चंद्रशेखर व्यंकट रामन्, सर विश्वेश्वर अय्या ह्यांच्यासारख्या विश्वविख्यात शास्त्रज्ञांनीं सुद्धां 'देशाला संपूर्ण स्वातंत्र्य मिळाल्याखेरीज आम्हांला विशाल राष्ट्रीय जीवन मिळणार नाहीं आणि विशाल राष्ट्रीय जीवन असल्याखेरीज कोणत्याहि








तऱ्हेच्या प्रतिभेचा प्रत्यक्ष कार्यांत फारसा उपयोग करून घेतां यावयाचा नाहीं,’ असे निर्वाणीचे उद्गार वारंवार काढले आहेत! मग सामाजिक शास्त्रांची हकीकत काय असेल त्याची कल्पनाच नको!

### विशाल कल्पना येथें मूळ कां धरीत नाहीं?

थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे पाश्चात्य तत्त्वज्ञ हा जगाचा नागरिक ह्या स्वाभाविक प्रवृत्तीनेंच लिहीत असतो. अर्थात् त्याच्या लिखाणांत सर्व-सामान्य सिद्धान्त अधिक प्रमाणांत असूं शकतात. ह्याच्या अगदीं उलट भारतीय विद्वानाची भूमिका आहे. जगाचें नागरिकत्व ही आमच्या डोळ्यां-समोरील पण अजून आम्हांला साध्य नसलेली वस्तु आहे. आमचे पाय अगतिकत्वामुळें टीचभर जागेवर खिळले आहेत. कळत न कळत प्रांताभिमान आम्हांला विळखा घालून बसला आहे. धरलें तर डसतें, सोडलें तर बाधतें, अशी थोडक्यांत आमची स्थिति आहे. त्यामुळें कितीहि विशाल तत्त्वें आमच्या मनांत घोळत असलीं, तरी आम्हांला आमची दृष्टि परिस्थिती-प्रमाणें एका उद्दिष्टावर खिळवून ठेवावी लागते. तें उद्दिष्ट सध्यां तरी एकच कीं जें जें ज्ञान [illegible] उपलब्ध असेल तें तें प्रत्येक देशबांधवाला साध्य [illegible] असें करणें; जें जें कार्य असेल त्याचा [illegible] स्पष्ट [illegible] पुढच्या पिढीला मिळवून देणें. ह्या देशांत संपूर्ण नागरिक-त्वाची जाणिव वरपासून [illegible] उत्पन्न झाल्या-खेरीज दुसरी कोणतीहि मोठी कल्पना इथें मूळ धरणार नाही [illegible] सत्य प्रत्येक भारतीय विचारवंता-च्या अंत[illegible]करणावर स्वानुभवानें कोरलें गेलें आहे. त्याचा [illegible] परिणाम असा झाला आहे कीं, विषय कुठलाहि असो, हिंदी मनुष्य कुठल्याहि सामाजिक विषयावर लिहूं लागला तरी तो नकळत हिंदी प्रश्नांत गढून जातो. त्याची चाकोरी जशी कांहीं ठरलेलीच असते. आमचें सगळें जीवनच इतकें अनभ्यस्त आहे कीं त्याचा कांहीं न् कांहीं विचार केल्याखेरीज आम्हांला इतर कुठें नजर फेकतां येत नाहीं. त्यामुळें बाहेरील जगांत ज्यांना हिंदुस्थानाबद्दल कुतूहल नाहीं, त्यांना ह्या लिखाणाचें मोल वाटत नाहीं. एवढेंच काय पण खुद्द आपण सुद्धां वेळोवेळीं ह्या ठराविक चाकोरीला कंटाळून केवळ मनाला मोकळेपणा हवा, नवे विचार हवेत, म्हणून पाश्चात्य तत्त्वज्ञांवरच अव-लंबून रहातों. डॉ. केतकरहि ह्या परिस्थितीस अप-वाद नव्हते. जागतिक राष्ट्रीयत्वाची कल्पना त्यांनीं हिंदी चष्म्यांतून पाहिली. आणि जगाचा नागरिक होण्याची उच्च आकांक्षा बाळगून त्यांनीं स्वतःचा समाज त्या पातळीपर्यंत पोंचूं शकेल कीं नाहीं, ह्याची बारकाईनें न कचरतां छाननी केली.

### केतकरांची समाजसंशोधकाची भूमिका

१९१२ ते १९३५ च्या दरम्यान डॉ. केत-करांचें मुख्य लिखाण ह्याच विषयावर झालें. नवल म्हणजे दोन तपांच्या अवधींत त्यांच्या मतां[illegible] पालट झाला नाहीं; तर तीं मतें उत्तरोत्तर अधिक [illegible] आश्च अधिक स्पष्ट अशीं बनलीं. हीं [illegible] आकलन नव्हत; तर विधायक कार्य[illegible] मात्र तीच [illegible] होत. उदाहरणार्थ, प[illegible]भकालीं— आणि [illegible]विवाहानें किं आर्थिक समतेनें [illegible] महाराष्ट्रांत “मोठ्या[illegible]तक चालीरीतींच्य देवघेवीनें [illegible] होत्या व [illegible] एकरूप होतां येईल? [illegible]यानीं अ[illegible] दलितांनीं हिंदुसमाज न सोडतांच त्यांत राहिल्यानें त्यांचा खरोखरीचा फायदा शेवटीं कसा होईल? सामाजिक चळवळी म्हणजे काय? जुनी रूढि कितपत टाकावी? पाश्चात्यांचें सर्वस्वीं अनुकरण करण्यांत कसा धोका आहे? हिंदी मनुष्यानें हिंदी बाणा पुरेपूर कायम राखूनच जगाचा नागरिक कसें बनावें? प्रांतांप्रांतांतील भाषेचे बखेडे, आणि द्वेष हे सांस्कृतिक ऐक्य कशा प्रकारें सांभाळले असतां नाहींसे होतील?—हे सारे व्यावहारिक प्रश्न त्यांनीं व्यावहारिक आराखड्यांनींच सोडविण्याचा उत्तम प्रयत्न केला आहे. भविष्य व व्यवहार, ध्येय व सत्य ह्यांचा हा सुंदर मिलाफ आहे.

डॉ. केतकरांची भूमिका प्रचारकाची किंवा समाजसुधारकाची नव्हती. ती समाजसंशोधकाची होती. त्यांच्या लिखाणांत चिकित्सक दृष्टि सर्वत्र दिसून येते. त्यांत पूर्वग्रह नाहीं. कोठेंहि ते भावनेच्या आहारीं गेलेले नाहींत. कठोर सत्यें अगदीं ओबडधोबड आणि उघड्या भाषेंत आणि तींहि चव्हाट्यावर सांगण्यांत त्यांचा हातखंडा होता. संशोधनाच्या चाकोरींतून ते रतिमात्र इकडे वळले नाहींत. ह्या देशांतल्या सामाजिक स्थितीवर पुष्कळांनीं लिहिलें. पण ते एक सुधारक तरी होते








केला नाहीं. पुढें केतकरांचा व्यासंग वाढला. तसतशा ह्या कल्पनेला पण पारंब्या फुटल्या. १९२५ सालीं ज्ञानकोशाच्या प्रस्तावना-खंडाच्या पहिल्या भागांत, विशेषतः बारा ते पंधरा या प्रकरणांत, ह्या कल्पनेचीं मुळें खूप खोल गेलेलीं दिसून येतात. केतकरांच्या भाषेंत सांगावयाचें म्हणजे 'मनुष्यजातीचें परमोच्च ध्येय व कल्याण जगांतील सर्व माणसांचा एक समाज बनवणें' हेंच होय. हें सांस्कृतिक ऐक्य एक कविकल्पना नसून हरतऱ्हेच्या व्यावहारिक आराखड्यांतून पूर्णपणें पारखून घेतलेला बहुमोल सिद्धान्त आहे. हिंदु समाजाची पुनर्घटना हा केतकरांचा अत्यंत जिव्हाळ्याचा विषय आहे. आपल्या जातिभेदांनीं बुजबुजलेल्या समाजालाहि विश्वनागरिकत्वांत मानाचें स्थान मिळेल ही थोर आकांक्षा त्यांच्या सर्व लेखनांत स्पष्टपणें उमटलेली दिसून येते. इतकेंच नव्हे तर, अगणित जाती–जमाती आणि बहुरंगी धार्मिक पंथ ह्यांनीं विस्कळित झालेला हिंदुसमाज अद्यापहि आंतून बलशाली आहे, इतर समाजांशीं एकरूप होण्याचें, इतकेंच नव्हे तर इतर समाजांना मार्गदर्शन करण्याचेंहि सामर्थ्य त्यामध्यें आहे, हें डॉ. केतकरांनीं हरतऱ्हांनीं सिद्ध करून दाखविलें आहे. त्यांच्या लेखनांतील अतिशय गंभीर आणि चैतन्यपूर्ण भाग तो हाच आहे बाकीचें समग्र केतकर-वाङ्मय नष्ट होऊन एवढींच त्यांचीं पानें जरी वांचलीं तरी त्यांत त्यांच्या विद्वत्तेचें, व्यक्ति मत्त्वाचें, प्रतिभेचें आणि व्यासंगाचें अथांग दर्शन वाचकाला होईल! ह्या कल्पनेवर १९३५ सालीं त्यांनीं फिरून हात फिरविला, आणि भारतीय समाजशास्त्रावरील आपल्या ग्रंथांत त्यांनीं ह्या कल्पना हिंदुस्थानांतील जातीजातींचें तपशीलवार विवेचन करून, हिंदूंच्या स्मृतींचा समग्र आढावा घेऊन सप्रमाण सिद्ध केल्या आहेत. पण इतकें झालें तरी आमच्या इकडील पंडितांना अजून देखील ह्या विश्व... ...जनकत्व डॉ. केतकरांना देतांना

**प्रा. रा. कृ. लागू,** एम्... बाहेरच्या ज...ची गोष्टच

हल्लीं सेवानि...

त्यांनीं संपादन के...

पुस्तकांचेंही संपाद... **खेंचल जातात ?**

...शांततेची लाट

...पासून होत

असतात, तेव्हां एकाच तऱ्हेची विचारसरणी न कळत तयार होत असते. अत्यंत संस्कारक्षम मनावर त्या विचारसरणीचा ठसा स्पष्ट उमटून येतो आणि प्रभावशाली व्यक्ती ते विचार नाना तऱ्हेच्या प्रयोगांनीं आणि लेखनाच्या व भाषणाच्या रूपानें लोकांपुढें मांडीत असतात. विश्वनागरिकत्वाची कल्पना ही अलीकडील सर्व भयंकर घटनांनाहि न जुमानतां धीटपणानें बाहेर डोकावणारी सर्वांत शुभ अशी कल्पना आहे. ह्या कल्पनेच्या प्रणेत्यांना विसरणें कृतघ्नपणाचें ठरेल !

एकादा पाश्चात्य विचारवंत एकादी कल्पना जगापुढें ठेवतो, तेव्हां त्याच्या भूमिकेंत आणि तीच कल्पना एकादा भारतीय विचारवंत जगापुढें मांडतो त्या भूमिकेंत फार अंतर असतें. स्वतंत्र, सत्ताधिष्ठित राष्ट्रांतील व्यक्ति आपल्या कल्पना नुसत्या लेखरूपानें जगापुढें मांडूं लागली तरी त्या कल्पनांचा फैलाव व बोलबाला झपाट्यानें होतो. राजकीय पार्श्वभूमीमुळें तीं मतें उठावदारपणें दिसूं शकतात. पण गुलाम राष्ट्रांतील महात्म्याला सुद्धां, युगांतरीं भंग पावणार नाहींत अशा उच्चतम कल्पना प्रसृत करतांनाहि, भक्कम प्रचारयंत्राचा आश्रय घ्यावा लागतो. स्वाभाविकच, गुलामाखेरीज श्रोते त्यांना मिळत नाहींत !

डॉ. केतकरांचा विश्वनागरिकत्वाचा हा अभिनव सिद्धान्त सुद्धां ज्ञानकोशाच्या पानांत मुकेपणीं अडकून राहाण्याचें हेंच कारण आहे. कल्पना सत्यावर अधिष्ठित होती. तिची झेंप मोठी. छपाईच्या सुलभ साधनांमुळें 'प्रसिद्ध' होऊनहि तिला प्रचाराच्या अभावीं पंख फुटून जगत्संचार करतां आला नाहीं. एवढेंच काय, पण भारतीय आणि पाश्चात्य विचारवंतांच्या विचारांची दिशा आणि कार्यक्षेत्र सुद्धां एकच असलें, तरी त्यांच्या कार्याच्या कक्षेंत आमूलाग्र फरक असतो. भौतिक शास्त्रांच्या बाबतींत सुद्धां हा फरक प्रामुख्यानें जाणवतो. सर चंद्रशेखर व्यंकट रामन्, सर विश्वेश्वर अय्या ह्यांच्यासारख्या विश्वविख्यात शास्त्रज्ञांनीं सुद्धां 'देशाला संपूर्ण स्वातंत्र्य मिळाल्याखेरीज आम्हांला विशाल राष्ट्रीय जीवन मिळणार नाहीं आणि विशाल राष्ट्रीय जीवन असल्याखेरीज कोणत्याहि

# ‘एक जगा’ची कल्पना आणि डॉ. केतकर

तन्हेच्या प्रतिभेचा प्रत्यक्ष कार्यांत फारसा उपयोग करून घेतां यावयाचा नाहीं,’ असे निर्वाणीचे उद्गार वारंवार काढले आहेत! मग सामाजिक शास्त्रांची हकीकत काय असेल त्याची कल्पनाच नको!

### विशाल कल्पना येथें मूळ कां धरीत नाहीं?

थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे पाश्चात्य तत्त्वज्ञ हा जगाचा नागरिक ह्या स्वाभाविक प्रवृत्तीनेंच लिहीत असतो. अर्थात् त्याच्या लिखाणांत सर्वसामान्य सिद्धान्त अधिक प्रमाणांत असूं शकतात. ह्याच्या अगदीं उलट भारतीय विद्वानाची भूमिका आहे. जगाचें नागरिकत्व ही आमच्या डोळ्यांसमोरील पण अजून आम्हांला साध्य नसलेली वस्तु आहे. आमचे पाय अगतिकत्वामुळें टीचभर जागेवर खिळले आहेत. कळत न कळत प्रांताभिमान आम्हांला विळखा घालून बसला आहे. धरलें तर डसतें, सोडलें तर बाधतें, अशी थोडक्यांत आमची स्थिति आहे. त्यामुळें कितीहि विशाल तत्त्वें आमच्या मनांत घोळत असलीं, तरी आम्हांला आमची दृष्टि परिस्थितीप्रमाणें एका उद्दिष्टावर खिळवून ठेवावी लागते. तें उद्दिष्ट सध्यां तरी एकच कीं जें जें ज्ञान उपलब्ध असेल तें तें प्रत्येक देशबांधवाला साध्य करणें असें करणें; जें जें कार्य असेल त्याचा फायदा पुढच्या पिढीला मिळवून देणें. ह्या देशांत संपूर्ण नागरिकत्वाची जाणीव वरपासून खालपर्यंत उत्पन्न झाल्याखेरीज दुसरी कोणतीहि मोठी कल्पना इथें मूळ धरणार नाहीं हें सत्य प्रत्येक भारतीय विचारवंताच्या अंतःकरणावर स्वानुभवानें कोरलें गेलें आहे. त्याचा परिणाम असा झाला आहे कीं, विषय कुठलाहि असो, हिंदी मनुष्य कुठल्याहि सामाजिक विषयावर लिहूं लागला तरी तो नकळत हिंदी प्रश्नांत गढून जातो. त्याची चाकोरी जशी कांहीं ठरलेलीच असते. आमचें सगळें जीवनच इतकें अनभ्यस्त आहे कीं त्याचा कांहीं न् कांहीं विचार केल्याखेरीज आम्हांला इतर कुठें नजर फेरतां येत नाहीं. त्यामुळें बाहेरील जगांत ज्यांना हिंदुस्थानाबद्दल कुतूहल नाहीं, त्यांना त्या लिखाणाचें मोल वाटत नाहीं. एवढेंच काय पण खुद्द आपण सुद्धां वेळीवेळीं ह्या ठराविक चाकोरीला कंटाळून केवळ मनाला मोकळेपणा हवा, नवे विचार हवेत, म्हणून पाश्चात्य तत्त्वज्ञांवरच अवलंबून रहातों. डॉ. केतकरहि ह्या परिस्थितीस अपवाद नव्हते. जागतिक राष्ट्रीयत्वाची कल्पना त्यांनीं हिंदी चष्म्यांतून पाहिली. आणि जगाचा नागरिक होण्याची उच्च आकांक्षा बाळगून त्यांनीं स्वतःचा समाज त्या पातळीपर्यंत पोंचूं शकेल कीं नाहीं ह्याची बारकाईनें न कचरतां छाननी केली.

### केतकरांची समाजसंशोधकाची भूमिका

१९१२ ते १९३५ च्या दरम्यान डॉ. केतकरांचें मुख्य लिखाण ह्याच विषयावर झालें. नवल म्हणजे दोन तपांच्या अवधींत त्यांच्या मतांत उलट झाला नाहीं; तर तीं मतें उत्तरोत्तर अधिक बोंसदार, अधिक स्पष्ट अशीं बनलीं. हीं मतें म्हणजे शुष्क तर्क नव्हत; तर विधायक कार्यप्रवृत्तींनीं भरलेलीं प्रवचनेंच होत. उदाहरणार्थ, परक्या समाजाशीं विवाहानें किंवा आर्थिक समतेनें आणि सांस्कृतिक चालीरीतींच्या देवघेवीनें त्याला कसें एकरूप होतां येईल? अस्पृश्यांनीं आणि दलितांनीं हिंदुसमाज न सोडतांच त्यांत राहिल्यानें त्यांचा खरोखरीचा फायदा शेवटीं कसा होईल? सामाजिक चळवळी म्हणजे काय? जुनी रूढि कितपत टाकावी? पाश्चात्यांचें सर्वस्वीं अनुकरण करण्यांत कसा धोका आहे? हिंदी मनुष्यानें हिंदी बाणा पुरेपूर कायम राखूनच जगाचा नागरिक कसें बनावें? प्रांतांप्रांतांतील भाषिचे बखेडे, आणि द्वेष हे सांस्कृतिक ऐक्य कशा प्रकारें सांभाळले असतां नाहींसे होतील?—हे सारे व्यावहारिक प्रश्न त्यांनीं व्यावहारिक आराखड्यांनींच सोडविण्याचा उत्तम प्रयत्न केला आहे. भविष्य व व्यवहार, ध्येय व सत्य ह्यांचा हा सुंदर मिलाफ आहे.

डॉ. केतकरांची भूमिका प्रचारकाची किंवा समाजसुधारकाची नव्हती. ती समाजसंशोधकाची होती. त्यांच्या लिखाणांत चिकित्सक दृष्टि सर्वत्र दिसून येते. त्यांत पूर्वग्रह नाहीं. कोठेंहि ते भावनेच्या आहारीं गेलेले नाहींत. कठोर सत्यें अगदीं ओबडधोबड आणि उघड्या भाषेंत आणि तींहि चवाठ्यावर सांगण्यांत त्यांचा हातखंडा होता. संशोधनाच्या चाकोरींतून ते रतिमात्र इकडे वळले नाहींत. ह्या देशांतल्या सामाजिक स्थितीवर पुष्कळांनीं लिहिलें. पण ते एक सुधारक तरी होते









अनुक्रमणिका

किंवा दुर्धारक! दोघांचाहि भावनांचा आवेश मोठा. एकाला सुधारणेचा ध्यास, तर दुसऱ्याला परंपरेचा हव्यास. नाना तऱ्हेचें, अतिशय उच्च दर्जाचें वाङ्मय मराठींत ह्या विषयावर झालेलें आहे. लोकहितवादी, ज्योतिबा फुले, राजारामशास्त्री भागवत, चिपळूणकर, आगरकर, टिळक, राजवाडे; किती म्हणून नांवें सांगावीं? परंतु मनाचा समतोलपणा पूर्णपणें राखून समाजशास्त्रज्ञ म्हणून जर कोणी जातिभेदासकट सर्व गोष्टींची मर्मगामी छाननी केली असेल, तर ती केतकरांनींच. ह्या कार्याकरितां, त्यांना नाना व्यक्तींचा, नाना जातींचा, नाना संस्थांचा रोष आजन्म सहन करावा लागला! कदाचित् विरोधाच्या ह्या घर्षांतूनच त्यांचे विचार, त्यांचें निरीक्षण अधिक स्वच्छ, अधिक कणखर होऊन बाहेर पडलें असावें! ह्या त्यांच्या साहसी स्वभावामुळें त्यांचे विचार पुष्कळांना उच्छेदी वाटत. पण परंपरेची जुनाट पुटें उच्छेदीत असतांनाच त्यांना विश्वनागरिकत्वाच्या कल्पनेचें तेजाळ मोतीं लाभलें हें विसरून चालेल काय?

---

## डॉ. केतकरांचें 'स्वराज्य'

मराठी भाषेंत महाराष्ट्राचा राज्यकारभार चालणें यालाच मी स्वराज्य समजतों. जो कायदा मराठींत मांडला नाहीं, तो कायदा महाराष्ट्रास बंधनकारक नाहीं. महाराष्ट्राचा जो गव्हर्नर असेल त्याची सही देखील मराठींत नसली तर ती बेकायदेशीर [illegible], आणि मुख्य न्यायाधिशापासून खालच्या न्यायाधिशाच्या निवाड्याची भाषा मराठीच असली पाहिजे; या प्रकारचे कायदे तुम्ही लवकर मंजूर करून घ्या. देशी भाषेंत राज्य चालविणारें सरकार जितकें लवकर स्थापित होईल तितकें लवकर स्थापित करा. हें जर तुमच्या पिढीनें केलें तरच तुमच्या पिढीनें आपलें कर्तव्य बजावलें असें होईल, एरव्हीं होणार नाहीं.

—डॉ. श्री. व्यं. केतकर, १८ फेब्रुवारी १९२८ ['लोकशिक्षण' मे-जून १९३७ डॉ. केतकर-विशेषांकांतून]

## डॉ. केतकरांची उच्चतर कलात्मकता

'कलात्मकते'च्या नांवाखर विचारशून्यता लपविण्यापेक्षां कलात्मकतेकडे थोडसं दुर्लक्ष करून संसारांतील विविध दृश्यें जीं सामान्य लोकांच्या नजरेला आलीं नसतीं तीं दाखविणें, त्यांतील खोल पै सुचाविणें, त्यांच्या दर्शनानें सुविचारांत, सद्भावनेंत आणि सात्त्विक आनंदांत भर घालणें, हें अधिक श्रेयस्कर आहे. हें कार्य करतांना भाषेची ठाकठिकी साधली नाहीं, कथानकाची बांधणी शिथिल आणि मांडणी अव्यवस्थित झाली, कांहीं ठिकाणीं अकालपांडित्यप्रदर्शन झालें व कांहीं ठिकाणीं कंटाळवाणा पाल्हाळ झाला, तर हे दोष दोषस्वरूपच आहेत; परंतु ते पत्करतील! 'कले'चें नांव एकसारखें घेऊन विचारशून्य उखाणे घेत बसण्यापेक्षां वरील दोष करून विचारप्रवर्तन व सद्भावनापोषण करणाऱ्या केतकरांमध्यें उच्चतर दर्जाची कलात्मकता अधिक आहे असें मला वाटतें. ऋतुमात्रजीवी सुंदर फुलांचे ताटवे मांडणीमुळें रमणीय वाटतात आणि असतातहि; परंतु बेडौल दिसणाऱ्या कलमी आंब्यांच्या झाडावर, फणशींवर व उंच गेलेल्या माडांवर शेंकडों फळें लटकत आहेत, समुद्रावरून वादळी वारे वाहत आहेत, सुंदर पाण्याचे वांकडे तिकडे कां होईनात पाट चालले आहेत, अशा देखाव्यांत देखील आनंददायकत्व आहे असें मला वाटतें

— प्रो. वा. म. जोशी, एम्. ए. ('लोकशिक्षण' डॉ. केतकर– विशेषांक, मे जून १९३७



अनुक्रमणिका






प्रा. श्रीकृष्ण के. क्षीरसागर

# केतकर-कार्याच्या आकलनांतील अडचणी

डॉ. केतकर निवर्तल्याला या महिन्यांत बारा वर्षें पुरीं होतील. या बारा वर्षांत अनेक निमित्तांनीं आणि अनेक प्रसंगांनीं मराठी वाङ्मयांत व मराठी सार्वजनिक जविनांत केतकरांची आठवण होणें अपरिहार्यच होतें. त्यांचे ग्रंथहि वरच्या परीक्षांकरतां मधूनमधून नेमले जातात. तथापि, या सर्व निमित्तांनीं आणि प्रसंगांनीं जर कोणती एखादी गोष्ट पुनः सिद्ध झाली असेल तर ती म्हणजे– "केतकरांचें कार्य, व्यक्तिमत्त्व आणि विचार समजावून घेण्याच्या मार्गांत बऱ्याच अडचणी आहेत"–ही होय. वास्तविक पाहतां केतकरांच्याइतका मनमोकळा मनुष्य निदान त्यांच्या दर्जाच्या पुरुषांत तरी दुसरा झाला नसेल. तसेंच त्यांच्या लेखनांतहि स्पष्टता आणि निश्चितता हे गुण प्रामुख्यानें होते. त्यांनीं लेखनहि विपुल केलें. आणि प्रचारकी बाण्याच्या सर्वच पुरुषांप्रमाणें महत्त्वाच्या संदेशाची पुनरुक्ति करण्यासहि ते कचरत नसत. ज्यांचे प्रमुख सिद्धान्त अत्यंत स्पष्ट होते आणि ज्यांनीं आपले सिद्धान्त शक्य तितक्या उच्चरवानें सांगितले अशा आधुनिक महापुरुषांत केतकरांची गणना करावी लागेल. पण आज बारा वर्षांनींहि असें म्हणतां येईल कीं अखिल हिंदुस्थानांत आज ज्यांचे विचार अभ्यासिले जाणें आवश्यक आहे अशा दोन किंवा तीनच महाराष्ट्रीयांत केतकरांचें स्थान असूनहि महाराष्ट्राबाहेर त्यांचें नांव मात्र फारच थोड्या लोकांस माहीत आहे. आणि असेंहि म्हणतां येईल कीं त्यांच्या विचारांचा अल्पतम भागच काय तो अद्याप महाराष्ट्रीयांनीं आकलन केला आहे. आणि त्यांच्या संबंधींचे गैरसमज मात्र तज्ज्ञ म्हणविणारांतहि शाबूत आहेत !

## केतकरांचें मोठेपण कोणत्या वर्गांतलें ?

स्वतंत्र बुद्धि हें मोठेपणाचें एक प्रमुख गमक मानल्यास दोन मोठीं माणसें एकमेकांसारखीं नसतात या गोष्टीचें दुःखहि मानतां येणार नाहीं कीं आश्चर्यहि मानतां येणार नाहीं. पण केतकरांचें आकलन होण्याच्या मार्गांतील अडचण मात्र तीव्र आहे! केतकरांच्या कार्यारंभकालीं– आणि कार्यसमाप्तीनंतर आजहि महाराष्ट्रांत "मोठेपणा" संबंधीं कांहीं गृहीत कल्पना होत्या व आहेत.

जहाल–मवाळ, सुधारक–उद्धारक, तुरुंगांत जाणारे–तुरुंगाला भिणारे, स्वार्थत्यागी स्वार्थसाधू वगैरे परस्परविरोधी कोटी महाराष्ट्रानें केसरी, डी. ई. सोसायटी, हिंगणें आश्रम या संस्थांच्या जन्मकाळीं ठरवून टाकल्या. त्या बदलण्यास तो आजहि तयार नाहीं. समाजादरास पात्र अशा कोटयांपैकीं आणखी एक कोटी म्हणजे विद्वानांची. आणि तिजमध्यें डॉ. भांडारकरांसारख्या सर्वमान्य संशोधक पंडिताचा समावेश होई.

केतकरांनीं अमेरिकेहून परत आल्यावर जे उद्योग सुरू केले; आणि जे विचार प्रसिद्ध केले त्यांवरून महाराष्ट्राला–म्हणजे त्यांतील वाचाळ इंग्रजी शिक्षित विभागाला–त्यांना कोणत्या वर्गांत ढकलावें हें समजेना !

त्यांनीं सुरू केलेल्या ज्ञानकोश–कार्यांत तुरुंगवासाचा संभव नव्हता; त्यांनीं कमी पगाराचें स्तोम अगर व्रत केलेलें नव्हतें; आगरकर, कर्वे यांच्या अर्थानें ते सुधारक नव्हते तर उलट त्यांचा उपहास करणारे होते; युरोपीय विदुषीशीं विवाह केलेला असल्यानें 'पुराणमताभिमानी' या नांवावरहि त्यांचा हक्क नाहीं अशी लोकांची समजूत होती.








आणि शेवटची व अगदीं निरुपद्रवी अशी जी 'विद्वान्' ही पदवी ती त्यांना देतांनाहि त्यांच्या स्वतःच्या 'उपद्रवी' लिखाणाचें स्मरण होऊन कित्येकांना कसेंसेंच होई ! त्यांचें म्हणणें असें पडे कीं, विद्वानाचें लेखन रागद्वेषशून्य, पक्षरहित, व प्रचारहीन असावें. सारांश, 'अॅकॅडेमिक' लिखाण, हें जितकें निर्गुण–निर्विकार असणें जरूर आहे, तितकें केतकरांचें लिखाण नाहीं ही विद्वानांची तक्रार होती. आणि त्यांची लेखनशैली सुंदर नाहीं असें साहित्यिकांचें मत पडल्यानें ते त्यांस 'विद्वान्' म्हणण्यास तयार होत, पण 'साहित्यिक' म्हणतांना नाक मुरडत !

पण या सर्व गोष्टींतून एकच गोष्ट सिद्ध होते. आणि ती म्हणजे – इतर लोक ज्या गोष्टी करीत होते, त्याच गोष्टी, त्याच तऱ्हांनीं करून शीघ्र लोकप्रियता मिळविण्याचा केतकरांचा मानस नव्हता; तो केतकरांचा संप्रदायच नव्हता.

## केतकरांचा मूळ उद्देश राजकीय

पण केतकरांच्या स्वतःच्या मतें ते कोणत्या उद्योगांत होते हें पाहणें अधिक उपयुक्त होईल. केतकर अमेरिकेला गेले तो काळ गुप्त कटांचा होता. परीक्षांचीं मापें सरळ भरून मोबदल्यांत भरभक्कम पगाराचें माप घेणाऱ्या "स्कॉलर" वर्गाची वृत्ति केतकरांना कधींच मानवण्यासारखी नव्हती. महाराष्ट्राविषयींचा अभिमान आणि आंग्लपूजनासंबंधीं तुच्छता, हीं त्यांच्या अंगीं प्रथमपासूनच भरपूर होतीं. त्यांतच वंगभंगाचा, तरुणांना बेफाम बनविणारा काळ ! केतकरांच्या अमेरिकेला जाण्यांतील उद्देश या वातावरणाला साजेसाच म्हणजे अत्याचारी राजकारणाच्या तयारीचा होता, असें म्हणतात. आणि त्यांत नवलहि नाहीं. पण नवल हें कीं अमेरिकेच्या नव्या जगांत जाऊन अर्थशास्त्र, समाजशास्त्र, राज्यशासनशास्त्र यांसारख्या शास्त्रांचें आधुनिक स्वरूप अभ्यासतांच त्यांच्या विचारांना एकदम वेगळें वळण लागलें ! दुर्दम्य आशावाद आणि दुर्दम्य ज्ञानलालसा हे त्यांचे दोन स्वभावविशेष लहानपणापासूनच प्रसिद्ध होते. 'भावी ज्ञानकोशकार' अशी पदवीहि त्यांना त्यांच्या उमरावती येथील एका शिक्षकांनीं लहानपणींच बहाल केली होती.

त्यांनीं अमेरिकेंत असतांच विद्यालयीन अभ्यासाला धरून जो प्रबंध लिहिला तो 'भारतीय जातिसंस्थेचा इतिहास' (The History of Caste in India) हा होय. तो त्यांनीं १९०९ सालीं लिहिला. बॉबच्या रासायनिक रचनेपासून तों भगवान् मनुप्रणीत भारतीय समाजशास्त्राच्या रचनेपर्यंतची केतकरांसारख्या निर्भय महाराष्ट्रीय तरुणाची विचारक्रांति विचारवन्तास अर्थपूर्ण वाटल्याखेरीज राहणार नाहीं. क्रांतिकारक पुरुष क्रांतिकार्याचा अवरोध करून जेव्हां तत्त्वविचारांकडे वळतात तेव्हां ते सशस्त्र क्रांतीहूनहि श्रेष्ठतर असें विचारक्रांतीचें कार्य करून दाखवितात असें इतिहासावरून दिसतें. अर्वाचीन भारताच्या लहानशा कालखंडांतहि याचीं उदाहरणें कमी नाहींत. योगिराज अरविंद घोष, आहिताग्नि राजवाडे, कॉ. रॉय हे पुरुष राजकारणांतून तत्त्वज्ञानांत वळल्यामुळेंच अधिक मोठें कार्य झालें आहे !

आणि तरीहि परदेशगमनांतील केतकरांचा मूळ उद्देश राजकीय होता, ही गोष्ट विसरून चालणार नाहीं. आणि त्यांच्या पर्वतप्राय कार्याची कोणतीहि शाखा पाहिली तरी राजकीय हेतूची त्यांना कधींहि विस्मृति पडली नव्हती हेंच दिसून येईल. सशस्त्र क्रांतीचे आणि अत्याचाराचे बेत आंखण्याइतकी धडाडी अंगीं असलेला मनुष्य जातिसंस्थेच्या इतिहासाकडे, व्रात्यस्तोमविधीकडे आणि ज्ञानकोशाकडे कां वळतो आणि त्यानें हातीं घेतलेलें समाजेतिहाससंशोधन हें केवळ विद्यालयीन संशोधनाहून कसें भिन्न असतें, याची कल्पना केतकरांवर टीका करणाऱ्या फारच थोड्या लोकांना आलेली आहे !

## 'निर्गुण–निर्विकार' पुस्तकी पंडित ते नव्हते !

केतकर अमेरिकेला गेले त्या वेळीं आणि केतकरांनीं ज्ञानकोशाचे खंड प्रकाशित करण्यास सुरुवात केली त्या वेळीं हिंदी स्वराज्याचा प्रश्न शिगेला पोहोंचलेला होता; तसाच सामाजिक पुनर्घटनेचा प्रश्न निकराला आला असून त्यांत एक प्रकारचें नैराश्यहि पसरलें होतें. पण या दोन्ही साध्यांना व्यापणारें एकच साध्य सांगायचें तर तें "अठरा पगड" भार-








तीय समाजांतून एक राष्ट्र निर्माण करणें हें सांगतां आलें असतें. एक राष्ट्र निर्माण झाल्याखेरीज स्वातंत्र्य मिळवणें शक्य नाहीं; मिळवलेंच तर टिकवणें शक्य नाहीं; आणि जातिकल्पनेमुळें उत्पन्न झालेली संकुचित वृत्ति नष्ट झाल्याखेरीज राष्ट्र निर्माण होणें शक्य नाहीं; येथपर्यंत विचार केतकरांच्या पूर्वींहि झालेला होता. परंतु जातिसंस्थेचा आणि तिच्या निर्मूलनाचा विचार करतांना अर्धवट विद्वान् आणि स्वार्थी मिशनरी यांनीं काढलेल्या अपसिद्धान्तांच्या ब्रह्मघोटाळ्यांतून बाहेर निघण्याइतकी स्वतंत्र बुद्धि आमच्याकडील बहुतेक सुधारकांना नव्हती. अनुकरण, हीनत्वगंड, समाजेतिहासाचें अज्ञान, पुस्तकी कल्पना यांसारख्या अनेक विकृतींनीं ते पिडलेले होते. शिवाय सगुण राष्ट्रनिर्मितीकरितां कंबर कसण्याऐवजीं निर्गुण परमेश्वराच्या प्राप्तीकरितां कंबर बांकविणारे वीरच त्यांत अधिक होते! तर उलट विष्णुशास्त्री चिपळूणकरांसारखे लोक 'आमच्या देशाला कोणताच विकार झालेला नाहीं' असें म्हणून सुधारक व मिशनरी यांची टवाळी करण्यांत धन्यता मानीत होते आणि स्थितिप्रिय आणि मागसलेल्या विचारसरणीलाच देशाभिमानी विचारसरणी हें गोंडस नांव देत होते! केतकरांच्या जीवितकार्याचें थोडक्यांत वर्णन करायचें झाल्यास असें करतां येईल कीं, भारतीय समाजगटांचें एक राष्ट्र बनविण्याकरितां आणि भारतीय समाजाचें 'आधुनिकीकरण' करण्याकरतां त्याच्या गतेतिहासांतील विकासक्रमाची संगति लावून दाखविणें व अशा प्रकारें जातिसंस्थेसारख्या बरील संस्थांचा अर्थ अडाणी पुढाऱ्यांस समजावून सांगणें, हें त्यांचें जीवितकार्य होतें. कारण जें यंत्र आपण दुरुस्त करावयास निघालों आहों त्याची रचना प्रथम माहीत हवी! अशा प्रकारें स्वदेशाला 'राष्ट्रत्व' आणि आधुनिकत्व मिळवून देण्याकरतांच केतकरांना समाजशास्त्राकडे वळावें लागलें. त्यांनीं पी एच्. डी. च्या प्रबंधाकरतां घेतलेला विषय असो कीं ज्ञानकोशांत विवेचिण्याकरतां घेतलेला प्रश्न असो; त्याचा संबंध त्यांच्या जीवनांतील या 'मध्यवर्ती हेतूशीं' (Life-theme शीं) होता.

त्यांनीं केलेलें सामाजिक निदान; त्यांनीं सुचविलेले इलाज; त्यांनीं केलेला (भ्रान्त सुधारकांचा) उपहास;—फार काय त्यांच्या लेखनांतील वेग आणि आवेश या सर्वांची संगति लागण्यास ते 'निर्गुण—निर्विकार' संशोधनांत गुंतलेले एक पुस्तकी पंडित होते ही कल्पना प्रथम सोडली पाहिजे.

## भारतीय समाजाच्या पुनर्घटनेचें जीवनस्वप्न

हिंदूंच्या सामाजिक प्रश्नांचा आणि राष्ट्रनिर्मितीचा विचार करणें म्हणजे जातिसंस्थेचें कोडें उलगडण्याचा विडा उचलणेंच होय! केतकरांनीं आपल्या सार्वजनिक जीवनाच्या आरंभींच या महाकूटाला आपल्या इंग्रजी ग्रंथाच्या द्वारें उत्तर दिलें होतें. आणि तें पुढील स्वरूपाचें होतें:

To a person endowed with better knowledge of facts. ... the history of the past has an entirely different meaning. He would plainly see that the present conditions should not be looked upon as a regeneration of the good conditions of former times, but only as a result of insufficient integration or insufficient unity of the groups that were brought into contact.

"The history of caste in India is not then a history of the increase of social division and inequality but a history of less rapid or, to use the popular but inexact word, 'arrested' development, arrested organisation and arrested integration."

केवळ एक संशोधनक्षेत्रीय निष्कर्ष म्हटल्यास हा सिद्धांत इतर सिद्धांतांप्रमाणेंच रुक्ष, बेचव, आणि निर्जीव वाटेल. पण भारतीय समाजाच्या पुनर्घटनेकडे एक भव्य ऐतिहासिक कार्य आणि रम्य जीवनस्वप्न म्हणून पाहणारास वरील सामाजिक निदानामुळें नवी श्रद्धा लाभेल, नवी शक्ति येईल!

बर्नार्ड शॉ यांनीं असें म्हटलें आहे कीं कार्ल मार्क्सचे ग्रंथ वाचल्यानंतर माझ्या आशेला 'जीवनांत कांहीं तरी करण्यासारखें आहे' अशी नवी पालवी फुटली. केतकरांचे ग्रंथ वाचल्यावरही आजच्या भारतीयाला हीच श्रद्धा लाभेल; निदान तशी श्रद्धा लाभावयास हवी!



अनुक्रमणिका






कारण 'The History of Caste in India', 'The Hindu Law' : 'Hinduism : its Formation and Future' यांसारख्या त्यांच्या इंग्रजी ग्रंथांतून काय, कीं ज्ञानकोशाच्या पहिल्या पांच खंडांतील बहुमोल समाजविश्लेषणांतून काय, कीं हिंदुस्थानांत पाऊल टाकतांच महाराष्ट्रीय विद्वानांवर टाकलेल्या बॉंबगोळ्याप्रमाणें भासणाऱ्या त्यांच्या 'स्फुट लेखांतून' काय, हेंच ध्रुवपद ऐकूं येत आहे: 'जें बदलूं पाहता त आधीं काय आहे तें समजावून घ्या'. 'सुधारक आणि मिशनरी हे तुम्हांला त्याची रचना सांगूं शकणार नाहींत!' पण एकदां का तुम्हांला त्याची रचना व विकास समजून आलीं कीं तुमच्या आशावादाला सीमाच राहणार नाहीं!'

## धर्मनिरपेक्ष, शास्त्रीय व सात्त्विक हिंदुत्व

आणि केतकरांच्या राष्ट्रीय आशास्वप्नांत भारतीय जातिसमूहाचें एक भव्य आणि संघटित राष्ट्र बनल्याचेंच केवळ दिसतें असें नाहीं. सिलोन, कंबोडिया यांसारख्या भारतबाह्य संस्कृतिखंडांनाहि आपल्या सांस्कृतिक पूर्वजांचें स्मरण होईल व ते विशाल भारतांत अन्तर्भूत होतील अशी आशा त्यांना वाटे. त्यांच्या या हिंदुत्वविकाससंबंधींची एक गोष्ट लक्षांत ठेवणें जरूर आहे आणि ती म्हणजे त्यांची 'संस्कृतिविकासाची' कल्पना सर्वस्वीं धर्मनिरपेक्ष होती. फार काय, राष्ट्रीय संस्कृतिच्या विकासाला धर्माचा अडथळा होतो असें केतकरांचें स्पष्ट मत होतें. आणि कोणत्याहि समाजाला "Religion" या अर्थानें धर्माची आवश्यकता कितपत आहे याचीच त्यांना शंका होती! या दृष्टीनें ते ऐहिक-पुरुषार्थनिष्ठ होते. 'धर्म' शब्दाचा भारतीय आर्यांच्या वाङ्मयांतील अर्थ आणि "Religion" या शब्दाचा अर्थ या दोहोंतील फरक अशा विषयांवर लिहिणाऱ्या इतरहि 'हिंदुत्व'- सुधारकांनीं ओळखला आहे. स्वामी विवेकानंद, सिस्टर निवेदिता, सावित्रीदेवी, सावरकर, या सर्वांनीं, "खैरूय" ज्या अर्थानें "धर्म" आहे त्या अर्थानें हिंदुत्व हा "धर्म" नाहीं हें सांगितलें आहे. तथापि विवेकानंदांच्या वाङ्मयांतील अद्वैत वेदान्तावरील भर, सावित्रीदेवींचें मूर्तिपूजेतील काव्यमय प्रेम, आणि सावरकरांचा म्लेंच्छासंबंधींचा ऐतिहासिक संताप या बाबतींत केतकर आणि हे तीन हिंदुत्वविवेचक यांत फरक आहे. स्थूलमानानें असें म्हणतां येईल कीं विवेकानंद आणि सावित्रीदेवी यांच्या मानानें केतकरांची हिंदुत्वकल्पना अधिक धर्मनिरपेक्ष आहे; तर सावरकरांच्या मानानें त्यांची हिंदुत्वविकासाची आणि हिंदुत्वसंघटनाची कल्पना अधिक शास्त्रीय आणि सात्त्विक आहे. स्पष्ट सांगायचें तर मुसलमानांसंबंधींच्या इतिहासमूलक क्रोधापासून ती सर्वस्वीं अलिप्त आहे!

स्वातंत्र्य मिळाल्यावर अगर समाजवादाचा स्वीकार केल्यावर, समाजसुधारणेचे प्रश्न उरतच नाहीत अशी ज्यांची कल्पना असेल त्यांची गोष्ट वेगळी. परंतु स्वातंत्र्यप्राप्तीनंतरहि राष्ट्रनिर्मितीचा प्रश्न उरूं शकतो हें ज्यांस दिसत आहे आणि केवळ आर्थिक समतेनें संस्कृतिविकासाचें कार्य पूर्ण होणार नाहीं हें ज्यांस कळत आहे, त्यांस आजचा हिंदु समाज म्हणजे एक अर्धवट लिहिलेला ग्रंथ आहे, असें वाटल्यावांचून राहणार नाहीं. या ग्रंथाचा अर्थ कोणता? किंबहुना लिपि कोणती? व तो पुरा करण्याची रीत कोणती?— हा केतकरांच्या जीवन-कार्याचा विषय होता.

## डॉ. केतकरांची तरल कल्पनाशक्ति

महाराष्ट्रांत जर कशाची उणीव असेल तर ती श्रद्धेची उणीव आहे असें पुष्कळदां म्हणण्यांत येतें. मी असें म्हणेन कीं महाराष्ट्रांत "कल्पनाशक्ती"चा अभाव आहे. पण, कल्पनाशक्ति, Imagination, विनोदबुद्धि वगैरे शब्दांत ज्या व्यापक अर्थाचा अन्तर्भाव होतो त्याचा बोध मराठी शब्दांनीं मराठी वाचकांना होईल कीं नाहीं याची मला जबरदस्त शंका आहे. सामाजिक घटनांचा अर्थ लावण्यास काय कीं वैयक्तिक कृतीचा अर्थ लावण्यास काय, नुसत्या सरळ तार्किक बुद्धीनें भागत नाहीं.—नव्हे ती बुद्धि नेमकी गोत्यांत आणते! इतिहासाचा अर्थ लावण्यास नुसत्या माहितीचा किंवा नुसत्या अनुमानशास्त्राचा उपयोग नसतो; तर "Historical Imagination" चा उपयोग असतो. व्यक्तींचें वैशिष्ट्य आणि त्यांच्या कृतीचें रहस्य



अनुक्रमणिका






# केतकर-कार्याच्या आकलनांतील अडचणी

ओळखण्यासहि या "कल्पकते"चाच उपयोग बुद्धिमत्तेहून आणि विद्वत्तेहून अधिक असतो.

प्राचीन प्रक्रियांचा आणि घटनांचा अर्थ लावतांना स्वतः केतकरांनीं या तरल आणि (बाह्यतः) तर्कविरोधी शक्तीचा उपयोग केला; पण केतकरांच्या कृतींचा अर्थ लावतांना मात्र आपण या शक्तीच्या अभावीं, केतकरांना विक्षिप्त आणि आडमुठे ठरवून आपल्याच अडाणीपणाचें प्रदर्शन केलें!

'ब्राह्मण कन्ये'सारख्या सुंदर कादंबरीच्या गळ्यांत वैजनाथस्मृतीसारखी एक स्मृतीच्या स्मृति कलमवारीनें अडकवून देणें; पोट–जातींसंबंधीं खवचट उल्लेख करणें; शिष्ट वाचकांना वाचतांना लाजल्यासारखें वाटण्याइतकीं 'चावट' वर्णनें योजणें; बुद्ध, विवेकानंद, गांधी यांचे संबंधीं रांगडेपणानें उल्लेख करणें, वगैरे गोष्टी करतांना ते अनवधान नव्हते; तर चांगले 'सावधान' होते! औचित्याचा अथवा आदराचा भंग करून त्यांना जें साधायचें असें, तें औचित्य आणि आदर यांच्या रूढ प्रदर्शनाहूनहि अधिक महत्त्वाचें असें. पण रूढ आदराच्या आणि शिष्टाचाराच्या पलीकडील गोष्टी समजण्यास खरी जिज्ञासा आणि खरी कल्पकता लागते.

खाजगी संभाषणांत गांधीजींना "बनिया" अत एव राजकारणानभिज्ञ म्हणून हिणवणारे आणि Victorious India सारख्या राजकीय ग्रंथांत गांधीजींवर राजकीय अप्रामाणिकपणाचा आरोप करणारे केतकर "निःशस्त्रांचें राजकारण" या पुस्तकांत गांधीजींचीच सात्त्विक भूमिका आपुलकीनें आणि हिरीरीनें मांडतांना दिसतात!

## केतकरांच्या 'व्रात्यपणा'– मागील हेतु

"पण माझ्या राष्ट्राला आणि अखिल मानवजातीला महत्त्वाचें असें कांहीं केतकर सांगत आहेत काय?" हा प्रश्न बहुतेक महाराष्ट्रीयांच्या मनांत प्रमुख नसतो. सार्वजनिक जीवनांत त्यांचा पहिला प्रश्न म्हणजे "माझ्या आवडत्या सार्वजनिक दैवताला–गांधींना, टिळकांना, विष्णुशास्त्रींना-हा मनुष्य वाईट म्हणतो ना? मग याचें म्हणणें ऐकण्याचें कारण नाहीं!"

सार्वजनिक व्यक्तींसंबंधींच्या खवचट उल्लेखांत केतकर नेहमींच एखादें श्रेष्ठ सार्वजनिक उद्दिष्ट साधीत असें मला म्हणायचें नाहीं. कधीं कधीं त्यांत त्यांचे लाडके, (आणि म्हणूनच हट्टी बनलले!) असे पूर्वग्रहहि असत. पं. नेहरू यांना "राजकारणांतील एक अज्ञ पोर" अशा अर्थाची पदवी बहाल करून त्यांचा फोटो मुमूर्षु विद्यासेवकाच्या रोडावलेल्या अंकावर केतकरांनीं छापला होता! पण ज्या स्वप्नाळूपणामुळें जवाहरलालजी हे केतकरांना "दूधखुळे" वाटले असतील, तोच स्वप्नाळूपणा स्वतः केतकर यांनीं 'व्हिक्टोरिअस् इंडिया" या राजकीय ग्रंथांत व इतरत्रहि दाखविला आहे. सात्त्विक ध्येयवादी कार्यकर्त्यास स्वप्नाळू होण्याखेरीज गत्यंतरच नसतें! टागोर, गांधी, रॉय, केतकर, नेहरू या सर्वांवरच हा आरोप करतां येण्यासारखा आहे.

स्वामी विवेकानंद यांनीं "अमेरिकेंत गोपीकृष्णाचरित केल्या"चा आधार घेऊन त्यांचेच शिष्य अमेरिकेंत नैतिक गोंधळ घालीत असा गुंतागुंतीचा पण अनुचित आरोप केतकरांनीं एके ठिकाणीं सूचित केला आहे! व्यक्तिशः मी विवेकानंद यांस अवतारी पुरुष मानणाऱ्या मंडळींपैकीं असूनहि तेवढ्यावरून केतकरांना शिव्या देणाऱ्या मंडळींत दाखल होण्याची मला मुळींच आवश्यकता वाटली नाहीं. केतकर हे ऐहिकनिष्ठ आणि प्रत्यक्षवादी असल्यानें मूळांतच त्यांना अध्यात्माचें वावडें होतें. (–इतिहासाचार्य राजवाडे आणि केतकर यांचा अध्यात्मविरोध हा व्यक्तिशः मी एक उणेपणाच मानतों.–) त्यांतच अमेरिकेंत एकादा बेजबाबदार स्वामी भेटण्याचें निमित्त झालें असेल एवढेंच काय तें!

पण त्यांचे कांहीं खवचट उल्लेख थोडे अप्रिय असले, तरी त्यांच्या प्रचारास ते अधिक उपयुक्त असत. इतिहासाचार्य राजवाडे त्यांच्या मृत्यूनंतर केतकरांनीं त्यांचें एक सुंदर स्वभावचित्र विद्यासेवक मासिकांत लिहिलें होतें. त्यांत राजवाड्यांच्या लोकविलक्षण आचाराचा आणि आहाराची माहिती देऊन, राजवाडे आपल्या संशोधनयात्रेंत हालिवाच्या लाडवांचा सांठा आपल्या संग्रहीं ठेवीत ही गोष्ट केतकरांनीं सांगितली आहे. आणि पुढें खवचटपणानें असेंहि म्हटल्याचें स्मरतें (–या क्षणीं मजपुढें








विद्यासेवकाचे खंड नाहीत–) कीं "आणि असे लाडू करून देणाऱ्या स्त्रिया त्यांना मधून मधून भेटत." राजवाडे यांच्या अकाल–विधुरत्वाचा उल्लेखहि त्याच लेखांत येऊन गेला आहे आणि लाडू करून देणाऱ्या स्त्रियांचा उल्लेखहि केतकर यांनीं थोड्या खवचटपणेंच केला आहे! ब्राह्मणकन्येंत व इतरत्र सार्वजनिक जीवनांत पडलेल्या माणसास विवाहाचीं बंधनें इतरांसारखीं नसावीं असें त्यांनीं केलेलें प्रतिपादन लक्षांत घेतां, वरील खवचट उल्लेखाचा कांहीं वेगळाच अर्थ लागेल. त्यांत राजवाड्यांच्या सारख्या कडक आधुनिक ऋषीसंबंधीं कुशंका निर्माण झाली तरी हरकत नाहीं; पण आमच्या या नाकर्त्या आणि भेदरट समाजाला सामाजिक औदार्याचा एक 'डोस' तर पाजून घेऊं अशीच "ब्रात्य" केतकरांची इच्छा उघड दिसते!

केतकरांचे सामाजिक हेतु आणि वाङ्मयीन पद्धति समजावून घेण्यास विनोदबुद्धीची आणि कल्पकतेची आवश्यकता आहे असें मी म्हणतों, तें यामुळेंच.

"खेडवळ आणि घाबरट अशा समाजाला आधुनिक आणि धीट करण्याकरितां दिलेले धिटाईचे धडे" असें केतकरांच्या लेखनपद्धतीचें वर्णन करतां येईल. त्यांच्या लेखनांत आणि प्रत्यक्ष वर्तनांतहि ही "धीटपाठ" पद्धति (Shock Tactics) नेहमींच असे.

पण स्वतःचा खेडवळपणा आणि घाबरटपणा पाहण्याऐवजीं केतकरांचे देशबांधव केतकरांनाच विक्षिप्त म्हणत व अद्यापहि म्हणतांना आढळतात!

थोडी विनोदबुद्धि, थोडी खुशालचंद वृत्ति, थोडा पोरकटपणा अंगीं असल्याखेरीज विकट समाजशास्त्रीय कूटें सोडवितांना केतकरांनीं दाखविलेली प्रतिभा दाखविणें अशक्यप्राय आहे; आणि राष्ट्रीय आणि वैयक्तिक निराशामय जीवनांत त्यांनीं जो आशावाद टिकवला तो टिकवणें तर त्याहूनहि अशक्य आहे.

### केतकरांची कलात्मक बालवृत्ति

ज्या कलात्मक बालवृत्तीमुळें, अगर "प्रौढत्वी"च्या "शैशवा"मुळें, केतकरांनीं भारतीय पुनर्घटनेच्या अन्धकारमय वाटेवर प्रकाशाचा झोत फेकला, तिचा थोडा तरी अंश अंगीं असल्याखेरीज केतकरांचे सिद्धान्त, केतकरांचे मार्ग, केतकरांचा ब्रात्य विनोद, केतकरांची प्रक्षोभक भाषाशैली, केतकरांची उदार पण 'व्रीडाजनक' सामाजिक नीति, यांपैकीं कशाचाच यथार्थ बोध होणार नाहीं.

".... He (the critic) must not become an intellectual or moral or political bigot as a mere Tory or Radical advocate—the *one-idea'd* champion of a programme. The critic must have much of the dilettante's fine irresponsibility; perhaps even something of the cynic's amused aloofness from the keen competitions of daily life. ... He should know the men of his own day through and through in all their tastes and tempers, and should be even more sensitively aware than they are themselves, of their collective prejudices."

वरील उताऱ्यांत एका अमेरिकन लेखकानें टीकाकाराच्या अंगीं "कला"– भक्ताचा रम्य उनाडपणा, आणि व्यावहारिक धकाधकीपासून "मजेंत दूर राहण्या"ची वृत्ति असणें आवश्यक आहे असें म्हटलें आहे! समाजेतिहासाच्या भाष्यलेखनांतहि केतकरांना या कलात्मक बालवृत्तीचा उपयोग झाला. पण केतकरांचें समाजविश्लेषण, राजकारण आणि व्यक्तिमत्त्व समजावून घेतांना त्यांच्या मानानें खरेखुरे "बाल" असलेल्या आम्हांला मात्र बालवृत्ति दाखवितां येऊं नये आणि विद्वज्जडतेचा आवेग यावा, हें नवल नव्हें का!

---












श्री. शीलवती केतकर

# ' एक जगा ' ची कल्पना

[ श्री. दुर्गा भागवत यांनीं श्री. शीलवती केतकर यांच्या सहकार्यानें 'Hinduism & its Future in the New World Society' ( Publishers : Hind Printing Works, Bombay 4. )हें पुस्तक १९४७ सालीं लिहिलें असून त्यांत डॉ. श्री. व्यं. केतकर यांचे ' हिंदुसमाज व नवीन जागतिक समाजांत हिंदुसमाजाचें भावी स्थान ' यासंबंधींच्या विचारांचें संक्षिप्त संकलन केलें आहे. श्री. दुर्गा भागवत यांचा डॉ. केतकरांच्या संबंधींचा स्वतंत्र लेख याच अंकांत अन्यत्र दिला आहे; त्यांत त्यांनीं डॉ. केतकरांच्या प्रतिभाचक्षूला 'एक जगा'चें दर्शन कसें झालें होतें हें दिग्दर्शित केलें आहे.– वर उल्लेखिलेल्या इंग्रजी ग्रंथाला श्री. शीलवती केतकर यांनीं लहानशी प्रस्तावना लिहिली आहे. त्या प्रस्तावनेंत डॉ. केतकरांच्या ' एक जगाच्या कल्पने 'चा उल्लेख करून श्री. शीलवतीबाईनीं हल्लीं जगांतील थोर विचारवंत व कलावंत यांच्या विचाराचे सूर कसे वहात आहेत याचें सूत्रमय दिग्दर्शन केलें आहे. त्यावरून दिसून येणारी श्री. शीलवतीबाईंची अभ्यासू वृत्ति व व्यापक जागतिक दृष्टिकोण हीं त्यांच्या वयोमानाचा व परिस्थितीचा विचार करतां विशेषच भूषणास्पद वाटतात. त्यांच्या त्या प्रस्तावनेंतील कांहीं भागाचा अनुवाद खालीं दिला आहे.—का. सं. ]

'एक जगा'ची कल्पना आणि जागतिक समाजाचें संयोजन यांवर या शतकाच्या प्रारंभींच एच्. जी. वेल्स यांनीं लिहायला सुरुवात केली. त्यांच्या याविषयींच्या कल्पना पहिल्यांदा अस्पष्ट होत्या. परंतु १९१६ च्या सुमारास त्या स्पष्ट झाल्या व वेल्स ह्यांनीं उत्यांचें ' एक जग ' या विषयाचा पुरस्कार आपल्या सामर्थ्यशाली बहुप्रसू लेखणीनें अत्यंत हिरीरीनें आमरण केला. १९११ सालीं डॉ. केतकर यांनीं आपल्या 'Hinduism' या पुस्तकांत हिंदुसमाजमीमांसेस सुरुवात करून त्या पुस्तकांतील 'जागतिक संस्कृति ' या प्रकरणांत त्याच ' एक जगा'च्या कल्पनेचा पुरस्कार केला आहे.–जगांत शांतता नांदायची असेल तर त्याला एकच एक उपाय जागातिक समाज किंवा विश्वराष्ट्र निर्माण करणें हा होय, असें प्रे. रूझवेल्ट, वेंडेल विल्की यांच्यासारख्या उदारमनस्क दूरदृष्टि विचारवंतांनीं निक्षून प्रतिपादिलें आहे. हीच कल्पना आज सर्वत्र चर्चिली जात आहे–या कल्पनेच्या पुरस्कर्त्यांमध्यें एक अशी अत्यंत प्रभावशाली व आकर्षक व्यक्ति आहे कीं जी आपल्या विशिष्ट क्षेत्रांतून या कल्पनेचा प्रसार अगदीं निराळ्या माध्यमाच्या द्वारें करीत आहे. ती व्यक्ति म्हणजे आंतरराष्ट्रीय कीर्तीचे संगीत–नाट्यक्षेत्रांतील सुप्रसिद्ध नीग्रो कलावंत पॉल रोबसन हे होत. एका जगाच्या कल्पनेचा प्रसार हें त्यांनीं आपलें जीवितकार्य मानलें आहे. नुकतेंच त्यांनीं याबाबत जें एक प्रात्यक्षिक करून दाखविलें त्याची आठवण होते. १९४३ सालीं, लॉस अँजेलिस या शहरीं दहा हजार मजूरांबरोबर त्यांनीं वृंदसंगीताचा यशस्वी कार्यक्रम करून दाखविला; नंतर जगाचा नागरिक या नात्यानें त्यांनीं लोकांच्या निरनिराळ्या भाषांतील –फ्रेंच, स्पॅनिश, रशियन, इंग्लिश, चिनी, हिब्रू भाषांतील–गाणीं अशा कांहीं तन्मयतेनें, अर्थपूर्ण रीतीनें म्हणून दाखविलीं कीं, श्रोत्यांचीं हृदयें थरारून सहानुभूतीनें उचंबळून आलीं ! कारण गीतांची भाषा जरी निराळी होती तरी त्यांतील भावना ही सर्वस्पर्शी, सर्वंकष होती. दुसऱ्या एका प्रसंगीं न्यू यॉर्कमध्यें त्यांचा ४६ वा वाढदिवस साजरा होतेवेळीं, पॉल रोबसन यांनीं 'जग एक होऊन विश्वराष्ट्र







होणें किती आवश्यक आहे, जनतेची या कल्पनेवरील श्रद्धा कशी वाढत आहे' याचें वर्णन करून आफ्रिकन लोकांना स्वयंनिर्णयाचा हक्क देऊन त्यांना जगांत न्याय्य स्थान प्राप्त करून देणें किती अगत्याचें आहे याचें कटाक्षानें प्रतिपादन केलें. पॉल रोबसन यांनीं आपल्या विशिष्ट प्रतिभेचें सामर्थ्य नवीन जागतिक समाजाच्या निर्मितीकरितां वाहिलें आहे. त्यांच्याच शब्दांत सांगावयाचें तर "जगाच्या हल्लींच्या संघर्षप्रधान परिस्थितींत माझ्या कार्याकडे मी तें एक समाजरचनेचें साधन म्हणून पहातों; कलेकरितां कला म्हणून नव्हे! एक कलावंत म्हणून, एक मनुष्य म्हणून माझ्या जीवनाचें एकच स्फूर्तिस्थान आहे: लोकशाहीला प्रेरक अशा शक्तींच्या संवर्धनाची जबाबदारी माझ्यावर आहे आणि त्याकरितां मीं सारखा सामना करीत राहिलें पाहिजे ही जाणीव माझें स्फूर्तिस्थान आहे."

जगांतील विचारवंतांचा सूर असा वहात आहे. भिन्न भिन्न राष्ट्रांच्या रूपानें शकलें झालेल्या जगाला ऐक्याची आवश्यकता जरी कळत असली, तरी ही निर्वाणीची वेळ समजूत जितक्या नेटानें व जोमानें कार्य व्हायला पाहिजे तसें अजून होत नाहीं. हिंदुस्थान आपले अंतर्गत संघर्ष सोडविण्यांत दंग असून त्याला या कार्याकडे लक्ष द्यायला जरी पुरेशी सवड नसली तरी ह्या जागतिक विचाराच्या हांकेची उपेक्षा करून त्याला चालणार नाहीं.

---

## खिलाडू वृत्ति

अमेरिकेमध्ये कॉलेजांत शिकत असतां एक दिवस अध्यापकांची वाट पाहत श्री. केतकर हे उभे होते; तेव्हां वर्गांतील एक विद्यार्थी म्हणाला कीं, "श्री. केतकर हुशार असले तरी त्यांचें शरीर म्हणजे एक 'कोंड्याचा कोथळा' आहे!" तेव्हां 'तें तसें नाहीं हें आपण सिद्ध करून देऊं' असें केतकरांनीं त्यांस आह्वान दिलें आणि तें हसत हसत पत्करून तो दुसरा विद्यार्थी उठून त्यांच्याशीं चार हात करण्यास तयार झाला. इतक्यांत अध्यापकाची स्वारी व्याख्यान देण्यास आली आणि चकित होऊन आंती वर्गांत पाहते तों काय, दोन्ही गडी मल्लयुद्ध व मुष्टियुद्ध यांची गल्लत करून एकमेकांशीं झुंजत आहेत! अध्यापकमहाशय चांगले खिलाडू वृत्तीचे असल्यामुळें त्यांनीं त्यांस प्रोत्साहन दिलें व ते शेवटपर्यंत लढले! तो शेवट म्हणजे, दोघेहि पूर्ण थकून जाऊन विराम पावले आणि टाळ्यांच्या मोठ्या गजरांत त्यांनीं एकमेकांशीं हस्तांदोलन केल्यावर पहिल्या विद्यार्थ्यानें कबूल केलें कीं, श्री. केतकर हे "कोंड्याचा कोथळा" नसून "स्नायूंचा कोथळा" आहे, हें पाहून आपणांस आश्चर्य वाटलें!

— **श्री. शीलवती केतकर** ["डॉ. केतकर: व्यक्तिदर्शन आणि स्मृति" —"लोकशिक्षण" मे–जून १९३७]

## कुटुंब-सौख्य

कुटुंब सौख्याविषयीं विचार करतांना मला असें वाटू लागलें आहे कीं ज्याच्या योगानें घरांतील सर्व व्यक्ती कोणत्या ना कोणत्या कामांत गुंतल्या असतील किंवा वैयक्तिक कष्टसाध्य महत्त्वाकांक्षेच्या मार्गे लागल्या असतील त्या कुटुंबांत सौख्य साधारणपणें अधिक असतें.

—**डॉ. केतकर**: "लोकशिक्षण" मे–जून १९३७ केतकर–अंकांतून.








प्रा. डॉ. वि. म. आपटे

# ऋग्वेदांतील 'भक्तिपंथ'

भक्तीचा उगम शोधण्याकरितां आपणांस ख्रिस्ती किंवा अन्य धर्माकडे पाहण्याची जरूर नाहीं, इतकेंच काय पण हा 'पन्थ' प्रारंभापासूनच संपूर्ण स्वदेशी आहे व ख्रिस्तपूर्वकालींच 'एक मळलेली वाट' या दर्जाप्रत गेला होता हें आतां सर्वमान्य झालें आहे.

## 'भक्ती'चें प्राचीनत्वः प्रचलित समजूत

परंतु 'भक्ति' किती प्राचीन आहे, याबद्दल कांहीं नवीन पुरावा वाचकांपुढें मांडावा हा या लेखाचा उद्देश आहे. प्रचलित समजूत अशी आहे कीं : भक्तिवृक्षाचा फुलोरा महाभारतांतील नारायणीय आख्यान व भगवद्गीता, भागवत-पुराण आणि शांडिल्यसूत्रें यांतच आढळतो; तत्पूर्वी या वृक्षाचीं बीजें आरण्यकांच्या व उपनिषदांच्या उपासनाकांडांत दिसून येतातः भक्ति हा शब्द पहिल्या-प्रथम उपनिषदांत येतो; "प्रवचन, बुद्धि किंवा जाडी विद्वत्ता यांनीं आत्मा 'लभ्य' नसून तो आत्मा ज्याला स्वतः वरील त्यालाच तो 'लभ्य' होय" अशा तऱ्हेचें (भक्तिमार्गाला शोभेल असें) ईश्वरी प्रसादाचें वर्णन (कठ. २. २३; मुण्डक ३. २. ३), 'प्रपत्ति' अथवा 'आत्मसमर्पण' या तत्त्वाचें सूचन (श्वेताश्वतर), 'ब्रह्म हें आनन्दरूप असून सर्व मानवी आनन्दांचें उत्पत्तिस्थान होय' (तैत्तिरीय २. ७; बृहदारण्यक ४. ३. ३२;) इत्यादि विधानें उपनिषदांतच सांपडतात; आरण्यकांच्याहि अगोदर, ऋग्वेदांत वरुण, सवितृ व उषा ह्या देवतांचीं जीं सूक्तें आहेत त्यांतील भावनोत्कटता पाहतां असें वाटतें कीं त्यांत तात्त्विक पार्श्वभूमि-विरहित अशी 'भक्ति' ध्वनित झालेली आहे.

## ऋग्वेदांत भक्तिभावनेचा बहारदार विकास

लेखकाच्या मतें ही प्रचलित समजूत बव्हंशीं बरोबर असली तरी त्यांत दुरुस्ती करावयास हवी. ती अशीः– ऋग्वेदांत 'भक्ति' हा शब्द जरी नसला तरी त्यांत भक्तिभावनेचीं फक्त बीजेंच आढळतात असें नसून त्या भावनेचा बहारदार विकास व रम्य विलास आढळतो व भक्तीचे पुढील कालांत आपणांस परिचित असलेले पुष्कळ प्रकारही ऋग्वेदांत व विशेषतः त्यांतील वरुण सूक्तांत वर्णिलेले आहेत! आतां 'ऋग्वेद' हें जगांतील प्राचीनतम वाङ्मय होय याबद्दल मतभेद नसल्यामुळें आपल्या भक्तिमार्गाचें अतिप्राचीनत्वहि ओघानेंच प्राप्त होतें! म्हणून या दृष्टीनें या लेखांत ऋग्वेदाचें व विशेषतः त्यांतील वरुणसूक्तांचें समालोचन करण्याचें योजिलें आहे.

## वरुणविषयक भक्तिभावना

भक्तिभावाची उत्कटता वरुण-सूक्तांतच विशेषतः दिसून येण्याचें एक कारण ऋग्वेदांतच सांपडतें व तें म्हणजे वरुण हा सर्व देवांत वडील 'ज्येष्ठ' देव (४·१·२)* समजला जातो. वरुण हा 'पिता' आहे (९·७३·३). खुद्द अग्निदेवच त्याला 'पिता' म्हणून संबोधितो (१०·१२४·३,४) सर्व देव वरुणाची मर्जी संभाळतात (४·४२·१,२).

पुढील कालांत ज्याप्रमाणें देवाला अनेक नांवें (चांगल्या अर्थानें!) ठेवतात–(उदाहरणार्थ, विष्णूचीं (विष्णु–) सहस्रनामें)–त्याप्रमाणें वरुणाला अनेक भक्तिसूचक नांवें व विशेषणें ऋषींनीं लावलीं आहेत. वरुण हा 'सुदेव' (चांगला देव ८·६९·१२) 'शिव' (कल्याणप्रद १०·१२४·२), 'पावक'

* कंसांतील आंकडे अनुक्रमें ऋग्वेदांतील मंडल, सूक्त व ऋचा यांच्या क्रमांकाचे निदर्शक होत.










अनुक्रमणिका

( पावन करणारा, १.५०.६ ), श्रुत ( प्रसिद्ध ५.८५.१,५ ), 'सुकीर्ति' ( १.१८६.३ ) व 'उरुशंस' ( दूर दूर ठिकाणीं ज्याची प्रशंसा होते असा, २.२८.३ ) आहे.

अशा या देवाविषयीं भक्ति प्रकट करण्याचे अथवा त्याच्या पूजेचे वा सेवेचे खालील विविध प्रकार आपणांस पुढील कालीं परिचित असे ऋग्वेदांत उल्लेखिलेले आढळतातः– (१) भक्तियुक्त अंतःकरणानें देवापुढें वांकणें अथवा नमस्कार करणें (१. २४. १४; ७. ८६. ४) (२) वरुणाचीं व्रतें पाळणें. कारण, वरुण हा दैवी व्रतांचा अत्यंत मोठा पुरस्कर्ता अथवा 'धृत–व्रत' होय. (३) मनूच्या वेळेपासून प्रचलित असलेल्या पद्धतीनें अग्नि पेटवणें, सोमरस काढून तो ( देवांना ) अर्पण करणें, दर्भ कापून व व्यवस्थित मांडून, त्यावर अन्न हविर्भाग म्हणून ठेवणें, इष्ट देवतेचें स्मरण करून व तिचें आवाहन करून ('हव' १. २५. १०) अग्नींत आहुति टाकणें ( 'हविस्' १.२४.१४; 'हव्य' ७. ८६. २ ) इत्यादि विधी हे तर सर्व देवांना सामान्य अशा सेवेचे प्रचलित प्रकार म्हणून प्रसिद्ध आहेत व ते ऋग्वेदांत निर्दिष्ट आहेतच. देव या यज्ञामुळें सहज वश होतात ( २. २८. १ ). ही देवांची सेवा मोठ्या उत्साहानें व खटपटीनें केली पाहिजे ( ८. ४१. ६ ). वरुणदेवाचें वैशिष्ट्य या बाबतींत असें कीं देवांना दिल्या जाणाऱ्या हविर्भागाप्रमाणें पितरांना अर्पण केल्या जाणाऱ्या 'स्वधा' आहुति सुद्धां तो व यम हे दोघे 'राजे' स्वीकारूं शकतात (१०.१४.७).(४) वाचेनें देवाची सेवा करणें अथवा त्याची प्रार्थना व गुणवर्णन (ऋचांच्या द्वारें) करणें हा अगदीं सर्वपरिचित व प्रसिद्ध मार्ग होय. ह्या प्रार्थनेचे ( अथवा 'स्तोमाचें' ) फारच स्तोम ऋग्वेदांत आहे. तिला नांवेंहि विविध दिलीं आहेत; जसें:–'ब्रह्म', 'गिरा', 'सूक्त', 'मति', 'मन्म', 'धी', 'प्रशस्ति', 'स्तोम', 'कीर्ति' वगैरे. ही प्रार्थना वा स्तुतिपर कविता कशी असावी याबद्दल व्यक्त केलेल्या अपेक्षा फारच मनोरंजक आहेत ! प्रार्थना 'शुद्ध' असावी (७.८८.१), ती उदात्त, गंभीर, व देवाला 'आवडणारी' अशी असली पाहिजे (५.८५.१), ती 'नवी' असावी (१.१०५.१५); पण नवी असलीच पाहिजे असें नाहीं; पूर्वजांनीं रचलेल्या व परंपरेनें आलेल्या प्रार्थनेची सुद्धां शिफारस केलेली आढळते ( ८.४१.२ ) ! आपल्या कवितेंत (वरुण-गुण )– संकीर्तन सुंदर व्हावें ही ऋषीची मोठी महत्त्वाकांक्षा असते ( २.२८.१ ) ! 'स्तोम' ( स्तुति ) कसा असावा तर वरुणाच्या अगदीं हृदयाच्या आंतल्या गाभ्यांत जाऊन बसावा ( ७.८६.८ ) ! प्रार्थनेच्या प्रचण्ड प्रभावाविषयीं कवीला इतका विश्वास वाटतो कीं जगांतलि सर्व विद्यमान वस्तूंपेक्षां तीं जास्त विशाल होवो अशी आशा तो व्यक्त करतो ( २.२८.१ ) ! अशी ही प्रभावी प्रार्थना बहुधा उषःकालीं म्हटली जाते ( २.२८.२ ).

## ऋग्वेदांत दिसून येणारे 'चतुर्विध' भक्त

ह्या अनेकविध पूजेनें वा सेवेनें प्रसन्न झालेला वरुण भक्तांना **यथोचित** फलें (बक्षिसें अथवा देणग्या ) देतो. ह्या देणग्यांचे विविध प्रकार, इष्ट वस्तुप्रदानार्थ ज्या निरनिराळ्या प्रार्थना ऋग्वेदांत आहेत, त्यांमध्यें सहजच नमूद झाले आहेत; कारण भक्तांची प्रार्थना देव सफल करतो हें ऋग्वेदांत गृहीतच धरलेलें आहे ! (१) धन अथवा संपत्ति हें एक महत्त्वाचें बक्षिस होय ( 'रै' ७. ८६. ७). हें धन कसें असावें ? तर तें दुर्दम्य नसावें, सहज स्वाधीन राहणारें, अथवा हातांतून निसटून न जाणारें ( 'सुयम' २. २७. १७ ) असावें. म्हणजे ह्यांत ध्वनि असा निघतो कीं हें धन म्हणजे मुख्यतः 'गोधन अथवा अश्वधन' असावें ! वरुण व मन्यु या दोन देवता लढाईतील लुटींत मिळणारें **दोन प्रकारचें** धन देतात ( 'उभयम्' १०. ८४. ७. हे 'दोन' प्रकार म्हणजे बहुधा 'गाई व घोडे' या द्विविध स्वरूपाचे सूचक होत ). "प्रेमळ आश्रयदात्याची अथवा उदार मित्रांची वाण आम्हांला पडूं नये" ( २. २७. १७ ); "वरुण हा श्रीमान् यजमानाला उत्तेजन देतो " ( ५. ४८. ५ ) इत्यादि उल्लेख धनरूप देणगीचेंच महत्त्व दर्शवितात. "वरुण हा समृद्धि अगदीं आमच्या उदरांत आणून सोडतो" ( १.२५. १५ ), हें वचन पाहिलें म्हणजे 'विठोबा तोच कीं जो आमच्या पोटोबाला तृप्त ठेवतो' अशी एक नवीन म्हण








( मराठींतील एका सुप्रसिद्ध म्हणींत फरक करून ) बनवावीशी वाटते ! ( २ ) दुसरी देणगी म्हणजे प्रदीर्घ व सुयंत्र जीवित. " ( सूर्यप्रकाश ) पाहण्या साठीं शंभर शरद् ( ऋतु ) आम्हांला ( जगूं ) दे, पूर्वजांचें सुयंत्र जीवित आम्हांला उपभोगूं दे " ( २.२७.१० ). आयुष्य वाढविण्याकरितां केलेल्या प्रार्थना पुष्कळच आहेत ( १. २५. १२ इत्यादि ). परंतु त्यांतील एक दोन मागण्या वैशिष्ट्यपूर्ण आहेत ! एक तर वर दर्शविल्याप्रमाणें दीर्घ आयुष्यांत " सु-सूत्रपणा ( सुयंत्रता ) अनुशासित असूं दे " हा आग्रह ( २. २८. ९ ) ! व दुसरें म्हणजे आयुष्याचे दिवस हे 'सुदिन' असावेत ( ७. ८७. ८ ), ही दीर्घायुष्यविषयक प्रार्थनेला जोडलेली पुस्ती ! ( ३ ) तिहेरी रक्षण देणारें आश्रयस्थान ('शर्मन्') अथवा कायमचें वसतिस्थान ('ध्रुवा क्षितिः') वरुणानें द्यावें अशा कांहीं प्रार्थना आहेत ( २.३८. ३; ७. ८८. ७; ८. ४२. २; १०. ६६. ५ ). ( ४ ) " घोड्यांना सामर्थ्य देणारा, गाईच्या आंचळांत दूध उत्पन्न करणारा व पर्वतशिखरावर सोमवल्ली निर्माण करणारा वरुणच होय" (५.८५. २). त्याचें व्रतपालन करणाऱ्याला सौभाग्य प्राप्त होतें. ( २. २८. २ ). " हे वरुणा ! **योग** व **क्षेम** या दोन्हींत आमचें कल्याण होवो " ( ७.८६.८ ). ( ५ ) वरुणाचा कृपाप्रसाद ही तर अर्थातच अत्यंत मौल्यवान् देणगी होय. " वरुणाची कृपा ('सुमति') ही विस्तृत व खोल आहे" (१.२४.९ ). सर्व देवांमध्यें वरुण हा देणग्यांचा मोठा सांठा म्हणून इतका प्रसिद्ध आहे कीं सवितृ व भग ह्या दोन देवांना देणग्या देण्याचें सामर्थ्य वरुणापासूनच प्राप्त झालेलें आहे ( ५. ४८. ५ ).

वरील प्रार्थनांत व्यक्त झालेल्या आकांक्षा पाहतां भगवद्गीतेंत जे चतुर्विध भक्त उल्लेखित आहेत ('आर्त, जिज्ञासु, अर्थार्थी व ज्ञानी') त्यांपैकीं ' अर्थार्थी ' हा ( भक्तांचा ) वर्ग ऋग्वेदांत पुष्कळ मोठा आहे हें उघड होतें.

आतां भक्तांचा जो ' आर्त ' वर्ग त्याचें ऋग्वेदांतील वर्णन पाहूं या : भक्ताला जमिनीवरील, पाण्यामधील ( थोडक्यांत म्हणजे कोणत्याहि ) संकटांतून बाहेर पडण्याचा मार्ग वरुणच दाखवितो. कारण तो मार्गज्ञ (' गातुविद्' १. १०५. १४ ) आहे. संकटकालीं समुद्रांतून सुखरूप पैलतीराला नेणारी नाव वरुण देतो ( ७. ४२. ३ ). त्यानेंच वसिष्ठाला नावेवर चढविलें (७. ८८. ४) दुःखाचा ('अंहस्'चा) नाश व निर्भयता हीं वरुणाच्या कृपेनें प्राप्त होतात ( २. २८. ६; ६. ३. १ ). " जर आमचा एकादा सगासोयरा, संबंधी वा आप्त यानें स्वप्नांत येऊन आम्हांस भीति दाखविली किंवा संकटाची पूर्वसूचना दिली अथवा जर चोर वा लांडगा आमच्यावर हल्ला करण्याचें मनांत आणील तर त्या सर्वांपासून आमचें रक्षण कर" ( २. २८. १० ). सर्व द्वेष्ट्यांच्या द्वेषापासून ( ४. १. ४ ) व स्वतः भक्तानें किंवा त्याच्या नांवानें दुसऱ्या कोणी केलेल्या ऋणापासून मुक्ति ( २. २८. ९ ) वरुणच देतो.

आतां ' जिज्ञासू ' भक्तांकडे वळूं या ! " आम्ही मानव ('पुरुष') असल्यामुळें आम्हांला वरुण देवाचें ज्ञान होत नाहीं ! " ( ५. ४८. ५ ); " जसे पक्षी ( उत्सुकतेनें ) आपल्या घरट्याकडे उडत जातात, तसे माझे विचार श्रेयस्कर अशा वरुणाच्या शोधार्थ उड्डाण करतात" ( १. २५. ४ ). " गाई ज्याप्रमाणें गोठ्याकडे धांवत जातात, त्याप्रमाणें माझे विचार सर्वद्रष्टा जो वरुण त्याची ( त्याच्या प्राप्तीची ) इच्छा धरून दूरपर्यंत मजल मारीत असतात (१.२५.१६ ).

वरुणाशीं समझोता व्हावा, त्याची कृपा व्हावी म्हणून तळमळ व्यक्त करणारीं भावनासूचक विधानें ( कीं जीं आपल्याला परिचित असलेल्या भक्तिपंथांत भक्त नेहमीं करतो ) ऋग्वेदांत ठिकठिकाणीं आढळतात. उदाहरणार्थ, " हे अग्ने ! वरुणाशीं आमचें सरळ करून दे" (४. १. ५). " वरुणानें मजवर दया करावी म्हणून मी त्याला हांक मारीत आहे." ( ६. ५०. १ ). " वरुणदेवा ! दासाप्रमाणें मी तुझी सेवा करावी ( असें मला वाटतें )" ( ७. ८६. ७ ).

वरील दोन परिच्छेदांतलि वचनांवरून वाचकांना हें कळून चुकलें असेल कीं देवाविषयीं केवळ दरारा व भीति भक्ताला वाटते असें नसून स्वयंस्फूर्त व निरपेक्ष कौतुक व प्रेमहि वाटतें ! आतां भगवद्गीतेंत उल्लेखिलेला **सर्वांत श्रेष्ठ** असा जो 'ज्ञानी' भक्तांचा










वर्ग त्याचें दर्शन आपल्याला ऋग्वेदांत होतें कीं नाहीं तें पाहूं या. त्याला ओळखण्याचें बाह्य लक्षण कोणतें ? देवाशीं त्याचें 'सख्य' 'आत्मनिवेदना'-पर्यंत पोंचलेलें असून सुद्धां, देवाशीं त्याचा दाट परिचय असूनहि अतिपरिचयजन्य अवज्ञेऐवजीं देवाविषयीं त्याची प्रीति व आदर हीं वृद्धिंगतच होत असतात. वरुणाशीं संभाषणाची इच्छा धरून ऋषि म्हणतो "तुझें प्रिय 'मधु' तुझ्याकरितां तयार करून ठेविलें आहे, तर ये, होत्याप्रमाणें तें प्राशन कर व तूं तें प्राशन करीत असतां आपण बोलूं या" (१·२५·१७). वरुणाचा सहवास व्हावा ही इच्छा कवीच्या मनांत इतकी उत्कट असते कीं तद्विषयक दिवास्वप्नें त्याचीं सारखीं चालू असतात! "त्या सर्वदर्शनीय वरुणाला मीं आत्तांच (म्हणजे यज्ञांत आवाहन केल्यावर) प्रत्यक्ष माझ्या समोर पाहिलें नव्हे का ? त्याचा रथ पृथ्वीवर उतरलेला एवढ्यांतच मीं पाहिला कीं हो! येथें माझ्याजवळ बसून तो माझी वाक्सेवा गोड करून घेवो" (१·२५·१८). दुसरा ऋषि वरुणाच्या साक्षात्काराची ग्वाही पुढील शब्दांत देतो: "वरुणाचें दर्शन मला (आत्तां) घडलें, अग्नीचें तोंड तेंच वरुणाचें, असा मला भास झाला!" (७·८८·२). "हे वरुणा! आम्ही तुझे आवडते (भक्त) झालों पाहिजे" (५·८५·८). "हे वरुणा! हे आदित्यांनो! (–हे वरुण, मित्र, अर्यमा इत्यादि अदितीचे पुत्र होत–) आम्हांला क्षमा कराच, तुमची मैत्री आम्हांला लाभो!" (२·२८·३). "ज्याप्रमाणें गाईंना गोठ्यांत व घोड्यांना तबेल्यांत बांधून ठेवतात तसें वरुणदेवाला आपण (आपल्या प्रेमपाशांत) बांधून ठेवूं या" (८·४१·६).

## एक भक्तिरस–पूर्ण सूक्तरत्न

सातव्या मंडलांतील ८६ वें सूक्त तर भक्तिरसानें ओथंबलेलें असें काव्यरत्नच होय! वरुणप्रेमानें वेडावलेला वसिष्ठ ऋषि म्हणतो: "मी स्वतःशींच बोलतों आहे बरें का! वरुणाच्या अगदीं आंतल्या (हृदयाच्या) भागांत मी केव्हां अधिष्ठित होईन बरें ? माझें हव्य तो प्रसन्न चित्तानें घेईल का ? तें त्याला आवडेल का ? प्रसन्नचित्त असा मी त्याच्या कृपेला केव्हां बरें पात्र होईन ?" (७·८६·२). "माझ्या हातून पाप तरी कोणतें झालें ? हा प्रश्न विचारीत मी निरनिराळ्या ज्ञानी लोकांकडे गेलों; ते सर्व एकमुखानें म्हणाले 'हें बघ, हा वरुणदेव तुझ्यावर रागावला आहे' (७·८६·३). [संकटनिवारक, बंधमोचक वरुणाला शोधून काढण्याची ह्याच प्रकारची तळमळ पहिल्या मंडलांतील एका ऋचेंत (१·२४·१२) व्यक्त झाली आहे: "रात्रीं काय किंवा दिवसां काय, मला (लोक) हेंच सांगतात! माझ्या अंतःकरणांतील स्फूर्ति (आंतल आवाज) सुद्धां हेंच सांगतेः (यज्ञांत बळी देण्याकरितां) बांधलेल्या शुनःशेपानें ज्याला हांक मारिली तोच वरुण राजा आम्हांला मुक्त करील"] "वरुणा! माझ्या हातून असें कोणतें भयंकर पाप झालें कीं तूं या तुझ्या सख्याला–तुझी स्तुतिस्तोत्रें गाणाऱ्याला–मारायला उठावेंस ? सांग, काय पाप झालें तें मला सांग; म्हणजे तें पाप धुऊन टाकून निर्मळ अन्तःकरणानें मी तुझ्यापाशीं धांव घेईन" (७·८६·४). "पापें आम्हीं स्वतः केलेलीं असोत किंवा आमच्या वाडवडिलांनीं केलेलीं असोत त्या सर्व पापांपासून या वसिष्ठाची सोडवणूक –(गो–) वत्साची ज्याप्रमाणें दाव्यापासून सुटका करितात त्याप्रमाणें—कर" (७·८६·५). "वरुणदेवा! तो अपराध मी जाणूनबुजून केलेला नव्हता रे! कोणाच्या तरी फूसलावणीमुळें म्हणा किंवा सुरापानामुळें, क्रोधामुळें, द्यूतापायीं किंवा अविवेकानें तो झाला असावा! कित्येकदां वडील माणसें (सुद्धां) धाकट्या माणसांच्या पापाला जबाबदार असतात! फार काय, झोपेंत सुद्धां पाप होण्याचें टळत नाहीं!" (७·८६·६). या सूक्तांत (७·८६) वरुणानें केलेल्या प्रार्थना वरुणानें सफल केलेल्या दिसतात. कारण ७·८८ या सूक्तांत वरुणानें वसिष्ठाला 'ऋषि' करून घेतल्याचें व आधिभौतिक स्वरूपांत त्याला स्वतःशीं सहवास व संभाषण यांचा लाभ दिल्याचें काव्यमय वर्णन आहे. "वरुणानें वसिष्ठाला 'ऋषि' केलें व वरुणाचीं स्तुतिस्तोत्रें गाण्याचा खास अधिकार त्याला मिळाला. आम्हीं (मी-वसिष्ठ-व वरुण) दोघे नावेंत बसलों व मग ती नाव समुद्राच्या मध्यभागापर्यंत आम्हीं वल्हविली; आणि मग समुद्राच्या लाटांवर आरूढ होऊन, खालीं-








वर इकडून तिकडे, एकाद्या पाळण्यांत किंवा झोंपाळ्यावर बसल्याप्रमाणें आम्ही संचार करीत असतांनाची ती शोभा काय वर्णावी ! ” (७–८८. ३ व ४). मध्यंतरीं केव्हां तरी एकदां वरुणाची वसिष्ठावर खप्पा मर्जी झाल्याचें दिसतें; कारण वसिष्ठ आश्चर्यचकित होऊन वरुणाला विचारतो: “ कुठें गेली बरें ती आपली दाट मैत्री कीं जिच्या धुंदींत आपण आनंदानें एकत्र राहत होतों ? तुला आठवतें कां कीं हजार दरवाजे असलेल्या तुझ्या प्रचंड राजवाड्यांत त्या वेळीं माझा (अनिरुद्ध) संचार एके काळीं चालू असे ! ” (७.८८.५). “ हे वरुणा ! एके काळीं जो तुझा जिवलग मित्र, अगदीं तुझा आप्त समजला जात असे त्यानें चुकून केव्हां तरी एकदां पाप केलें तर त्यानें संपूर्ण प्रायश्चित्त घेतलेंच पाहिजे काय ? अरे ! तुझीं स्तुतिस्तोत्रें गाणाऱ्याचें तूं रक्षण करावयास नको का ? ” (७. ८८ .६). आठव्या मंडलांत (८.२८.६) एक कळकळीची प्रार्थना आहे: “ हे सम्राटा ! माझ्या अंतःकरणांतील भीति काढून टाक ! माझ्यावर अनुग्रह कर. तुझ्या इच्छेबाहेर डोळ्यांची उघडझांप करण्याचेंहि सामर्थ्य कोणालाहि नाहीं ! ”

### “ बुद्धियोग ” देणारा वरुण

सर्वांत आश्चर्यकारक गोष्ट अशी कीं भागवत धर्मांत व तदनन्तर प्रसिद्ध असलेलें भक्तिमार्गांतील एक तत्त्व “ ददामि बुद्धियोगं तं येन मामुपयान्ति ते। ” (‘ जी बुद्धि भक्ताला ईश्वराकडे नेते ती बुद्धि ईश्वरच त्याला देतो ’) हें सुद्धां ऋग्वेदांत आढळतें व तें बीजरूपानें नव्हे तर पूर्ण विकसित अशा स्वरूपांत ! “ हृदयांत सामर्थ्य (‘क्रतु’) वरुणच उत्पन्न करतो ” (५. ८५. २). “ सूक्त रचणाऱ्या कवीची प्रतिभा व काव्यकौशल्य वरुण पाजळीत असतो ” (८. ४२. ३). “ (गुराखी लोक) ज्याप्रमाणें कळपांतील गाईंची काळजी घेतात त्याप्रमाणें माणसाच्या बुद्धीची जोपासना वरुण करतो ” (८. ४२. १). “ प्रार्थनामंत्रांचा कर्ता (‘ ब्रह्मकृत् ’ १०. ६६. ५) वस्तुतः वरुणच होय; कारण हृदयांत विचारांचा प्रादुर्भाव तोच करवितो व मग एक नवी (ईश्वरविषयक सूक्तरूपी) सत्यकथा निर्माण होते ! ” (१. १०५. १५). “ हे मित्रावरुणा ! तुमच्या नेतृत्वाखालीं राहून मला कुमार्ग टाळतां येऊं द्या ” (२. २७. ५). वरुणानें वसिष्ठाला ‘ ऋषि ’ व ‘ स्तोता ’ या पदवीला चढविलें ह्या उपरिनिर्दिष्ट (७. ८८. ३) ऋचेचा ग्रंथ या अर्थानें छान लागतो !

वर दिलेल्या पुराव्यावरून वाचकांना एक गोष्ट कळून चुकली असेल; ती ही कीं भक्तिमार्गाचा उद्गम व विकास यांचा भरतखंडांतील इतिहास फारच जुना व मोठा आहे व जगांतील **प्राचीनतम** वाङ्मयांत (ऋग्वेदांत) त्याचा विकास दृग्गोचर होत असल्यामुळें त्याचें मूळ शोधण्याकरितां अन्य धर्मांच्या इतिहासाकडे पाहणें हें **अशास्त्रीय** ठरेल.

---

### “ स्वैर विहंग ”

My heart beats her waves at the shore of the world
and writes upon it her signature in tears with the words, “ I love thee ”.

—R. Tagore, “ Stray Birds ”.

हृदयांत प्रगटते तरल तरंगावली
धडकते धावुनी विश्वकिनाऱ्यावरी
अन् तिथें स्वाक्षरी करी हृदय अश्रूनें
लिहुनिया मनोगत शब्दांच्या सांगातीं :
‘ मम प्रीति–उपायन तुझ्या वाहिलें पायीं ’

—श्री. **मा. गो. काटकर**, सोलापूर.









अनुक्रमणिका

# हिमालयाची हांक

श्रवणिं ये गभीर हांक कवण सुंदराची
काय गहन असह सह्यशैलगव्हरांची ?

नाभींतुन प्रणव उठे
रोमांतुन कोंभ फुटे
झुळझुळती दरवळती कंपनें स्वरांचीं ॥ १ ॥

ध्यानांतिल सिद्ध मुनी
कोरित अनुपम लेणीं
करिति वज्रलेप नर्तनें नटेश्वराचीं ॥ २ ॥

रत्नांचे द्रव स्रवती
स्वप्निल रस लवलवती
त्यांवरती फुलति गुजें यक्षकिन्नरांचीं ॥ ३ ॥

डुगडुगतो आदिताल
नाचे कटिबद्ध काल
डमरूंतुनि उपनिषदें घुमति शंकराचीं ॥ ४ ॥

वळल्या गंगायमुना
आतुर माहेरपणा
हिमगिरिंतुन हांक मला परमसागराची
श्रवणिं ये गभीर हांक भुवनसुंदराची ॥५॥

वेरूळ-अजंठ्याच्या प्रवासांत
१०-११-४८

बा. भ. बोरकर












श्री. शंकर विनायक ठकार

# हातकागदाचें उज्ज्वल भवितव्य

" Hand-made paper has a regular demand to-day, owing to its special characteristics of strength, writing qualities and durability, and the industry, though small, is not likely to die out altogether, owing to the superiority of quality over machine-made papers."

—Sheldon Leicester, 1924.

" At the present day, papers with the Whatman watermark (made by the old hand-made process) are, without doubt, the most well-known and highly esteemed papers in the world."

—H. A. Maddox, 1939.

"English hand-made paper is still looked upon as the best paper obtainable."

—Edward A. Dawe, 1939.

" It cannot be denied that paper of unrivalled superiority is made by hand at the present day.... The production of hand-made paper in England is not limited by the demand, but by the scarcity of skilled labour."

—Carl Hoffman.

" The ancient art of making hand-made paper has been revived by Mr. Dard Hunter in this country (U. S. A.) and has always been pursued to a small extent in Italy and other European countries. It should be emphasised that contrary to popular impression in some quarters, that hand-made paper is not superior to paper made in modern mills,--quite the contrary."

—G. S. Witham, 1942.

" So late even as 1801 English paper was entirely hand-made."

—Sir George Wyatt.

" मजबुती, लेखनसौंदर्य व टिकाऊपणा या विशिष्ट गुणांमुळें आज हातकागदाला नियमित मागणी आहे हा धंदा अल्प प्रमाणांत चालूं असला तरीहि, यंत्रोत्पादित कागदांपेक्षां जें उच्च दर्जाचें गुणवैशिष्ट्य हातकागदांत असतें त्यामुळें तो धंदा अजिबात मरून जाण्याजोगा नाहीं."

—शेल्डन लीस्टर.

" व्हॉटमनची खूण असलेला व हस्तकौशल्यानें तयार केलेला कागद हाच निःसंशय आजच्या काळांत सर्व जगांतला अत्यंत नामांकित व अत्यंत आवडता कागद होय." —एच्. ए. मॅडॉक्स

" इंग्लिश हातकागद हा कोठेंहि मिळण्याजोग्या सर्व कागदांत अद्यापहि उत्तमांतला उत्तम कागद समजला जातो." —एडवर्ड ए. डॉवे

" अप्रतिम व अत्युच्च दर्जाचा कागद आज हातानें बनविला जात आहे ही गोष्ट नाकारतां येणार








नाहीं... इंग्लंडमधील हातकागदाची पैदास मागणीच्या अभावीं मर्यादित झालेली नसून कलावान् कारागिरांच्या तुटवड्यामुळेंच मर्यादित झालेली आहे."

—कार्ल हॉफमन्

"अमेरिकेमधील हातकागदाच्या प्राचीन कलेचें पुनरुज्जीवन मि. डार्ड हंटर यांनीं केलें आहे, व अल्प प्रमाणांत इटलींत व इतर युरोपियन देशांत आजतागायत त्या कलेची उपासना नित्य होत आहे. कांहीं भागांत अशी समजूत आहे कीं, हातकागद हा अर्वाचीन कागदी गिरण्यांत होणाऱ्या कागदापेक्षां अधिक सरस नसतो. पण वस्तुस्थिति याच्या अगदीं विरुद्ध आहे."

—जी. एस्. विथॅम

"अगदीं १८०१ पर्यंत इंग्लंडमधील कागद हा सर्वस्वीं हातकागदच होता."

—सर जॉर्ज वॅट

'साहेबाचा शब्द म्हणजे प्रमाण' अशा समजुतीनें वरील उतारे मीं दिले नसून यंत्रसज्ज पाश्चात्य देशांतहि हातकागदाला आज एक विशेष मानाचें स्थान आहे हें वाचकांस विदित करण्यासाठींच दिले आहेत.

मुंबई इलाखा ग्रामोद्योग-समितीच्या महाराष्ट्र विभागातर्फे, पुणें येथें जें हातकागद–संशोधन–केंद्र चालविलें जात आहे, त्याचें काम दिवसेंदिवस अधिकाधिक आशादायी व यशस्वी होत आहे हें नमूद करण्यास आनंद वाटतो. पण अशा कार्याचें आजच्या काळांत काय वैशिष्ट्य आहे हें समजल्याशिवाय अशा कार्याचें महत्त्व लक्षांत येणार नाहीं,

कागदाचा उपयोग दिवसेंदिवस खूपच झपाट्यानें वाढत आहे, व कागद ही चीज मानवी जीवनास अन्नवस्त्राचे खालोखाल अपरिहार्य अशी वाटूं लागली आहे. कागदाचा प्रत्यक्ष-अप्रत्यक्ष उपयोग करावा लागत नाहीं असा एकहि मनुष्य आज बहुधा सांपडणार नाहीं. हें विधान सकृद्दर्शनीं कितीहि विचित्र व अतिशयोक्तीचें वाटलें तरी तें सत्य आहे हें कबूल करावें लागेल. कागद सृष्टींत नसतांना लोकांचा व्यवहार कसा चालत असेल असा मोठ्या कुतूहलाचा प्रश्नहि मनापुढें उभा राहतो. ज्यांना लिहिण्या-वाचण्याचें काम पडतें अशा आबालवृद्ध स्त्री-पुरुषांना कागद लागतो ही गोष्ट सहज लक्षांत येते; पण जे निरक्षर आहेत किंवा आंधळे आहेत अशा लोकांना कागदाची काय जरूर ? असा प्रश्न कोणी विचारल्यास त्यांना इतकेंच उत्तर देतां येईल कीं वाण्याच्या दुकानांतील मीठ-मिरची घेण्यासाठीं किंवा भूक शमविण्यासाठीं डाळमुरमुरे घेणाऱ्यालाहि कागदाची आवश्यकता असते हें विसरून चालणार नाहीं. इतकेंच नव्हे तर जगांतल्या आंधळ्या लोकांनाहि कागद लागतो. त्यांना लिहिणें-वाचणें शिकवण्यासाठीं जी ब्रेल सिस्टिम नांवाची लेखनपद्धति सुरू झाली आहे त्या पद्धतीनुसार शिक्षण घेऊन बड्या बड्या परीक्षा देणारे व पदव्या मिळविणारे विद्वान् अंध आज जगांत आहेत व त्याचा नमुना पुण्यासच पाहणें झाल्यास येथील अंधशाळेंत कोणालाहि पहावयास मिळेल. अशा अंधांना कागद लागतो हें निराळें सांगणें नकोच.

या गोष्टी लक्षांत घेतल्यास कागद ही चीज अन्नवस्त्राच्या खालोखाल अपरिहार्य बनली आहे हें विधान मुळींच अतिशयोक्तीचें वाटणार नाहीं, किंबहुना तें निरपवाद सत्य होय.

## पूर्वेतिहास

एक काळ असा होता कीं, ज्ञान तोंडीच दिलें जाई; व पाठांतरामार्फतच त्याचा पिढ्यानुपिढ्या प्रसारहि होत राही. वेद, उपनिषदादि प्राचीन ज्ञान शतकानुशतकें पाठांतरामार्फतच दिलें गेलें. पुढें जसजसें हें व इतर ज्ञान कमी-अधिक कायम स्वरूपांत लिहून ठेवण्याची आवश्यकता भासूं लागली, तसतसें हें ज्ञान शिलालेख, ताम्रपट, इत्यादिकांच्या द्वारा लिहून ठेवलें जाऊं लागलें. ईजिप्तमधील पिरॅमिडमधील प्राचीन वस्तु-संशोधनांत असें आढळून आलें आहे कीं नाईल नदीच्या काठीं जाड, तिकोनी व लव्हाळ्यासारख्या वनस्पतीच्या पातळ पापुद्र्यावर खिस्तपूर्व तीन-साडे तीन हजार वर्षांपूर्वी मजकूर लिहून ठेवला जाई. या वनस्पतीला 'पॅपिरस' म्हणत. 'पेपर' हा शब्द त्यावरूनच रूढ झाला. चीन देशांत रेशमावरहि लिहिलें जाई. तात्पुरत्या लिखाणासाठीं झाडांच्या सालींचाहि उपयोग केला जाई. पूर्वीच्या क्रमिक पुस्तकांत 'बोलका ढलपा'








# हातकागदाचें उज्ज्वल भवितव्य

या मथळ्याखालीं जी गोष्ट जुन्या पिढींतल्या विद्यार्थ्यांनीं वाचली असेल त्या गोष्टीचा प्रसंग झाडाच्या सालींचा उपयोग केला जाई त्या काळचाच असावा. लेखनाची आवश्यकता जसजशी अधिक भासूं लागली तसतशा झाडांच्या साली साहजिकच गैरसोयीच्या वाटूं लागल्या; हिंदुस्थानपुरतेंच बोलणें झाल्यास दक्षिणेकडील कल्पक लोकांनीं ताडपत्रांचा उपयोग सुरू केला व उत्तर हिंदुस्थानांतील लोकांनीं भूर्जपत्राचा उपयोग सुरू केला. माझ्या लहानपणीं माझीं दोन-तीन वर्षें मद्रासला गेलीं. पुण्यांतील तात्या पंतोजींच्या शाळांतून मूळाक्षरें किंवा अक्षरशः 'धुळाक्षरें' शिकणाऱ्या बालगोपालांच्यासाठीं प्रत्यक्ष धूळपाट्यांचा उपयोग अल्प प्रमाणांत चालू असल्याचें मीं माझ्या बालपणीं जसें पुण्यांत पाहिलें होतें, तसेंच मद्रासमधील तात्या पंतोजींच्या शाळांतून खिळ्यासारख्या अणकुचीदार टोकानें कोरून लिहिलेलें ताडपत्रावरील लिखाण विद्यार्थ्यांकडून वाचून घेतलें जाई, हेंहि माझ्या पाहण्यांत आलें होतें. अर्थात् शिलालेख, ताम्रपट, लाकडांचे ढलपे, धूळपाट्या, ताडपत्र, किंवा भूर्जपत्र हीं कांहीं टिकाऊ व सोयीचीं साधनें नव्हत हें उघडच आहे. तथापि, हीं साधनें ज्या हेतूनें व ज्या दृष्टीनें जन्मास आलीं त्याच हेतूच्या सिद्ध्यर्थ कागदाचाहि जन्म झाला. या बहुमोल वस्तूला जन्म देण्याचें श्रेय चीन देशाला आहे. त्साई लून हें ह्या चिनी संशोधकाचें नांव असून तंतुमय वनस्पतीपासून कागद तयार करण्याच्या कल्पनेचें श्रेय जगांत त्यालाच देण्यात येतें व अशा वनस्पतितंतुजन्य कागदाचा संशोधनकाल इ. स. १०५ समजला जातो. ब्रिटिश ज्ञानकोशांत तर असें नमूद करण्यांत आलें आहे कीं, असा कागद तयार करण्याची कृति चिनी लोकांस इसवी सनापूर्वी २०० वर्षें तरी माहीत होती. श्री. बापूराव शिवराम नाईक यांनीं आपल्या 'कागद' नामक पुस्तकांत म्हटलें आहे कीं, "चिनी कागदाच्या पूर्वींहि हिंदुस्थानांत कागद तयार होत असे. इ. स. पूर्वी ३२७ मध्यें शिकंदर हिंदुस्थानांत आला; त्याच्याबरोबर आलेल्या निऑर्कस यानें लिहून ठेवलेल्या लिखाणावरून हें सिद्ध होतें. रुईचीं पानें कुटून कागद तयार करण्याची कला हिंदुस्थानांत माहीत होती."

वनस्पतींच्या तंतूंपासून कागद तयार होऊं शकतो ही गोष्ट ध्यानीं घेऊन चीन देशांतल्या कल्पक लोकांनीं तंतुमय वनस्पतींची खास लागवड केली. अशा तंतूंपासून त्यांनीं इतका उत्तमोत्तम कागद काढला कीं संसारांत लागणाऱ्या नानाविध उपयुक्त व शोभेच्या वस्तू बनवितां येतील इतका सुंदर, मजबूत व चिवट कागद निर्माण केला. म्हणूनच मारवाडांत किंवा स्वीडन, नॉर्वेआदि देशांत एके काळीं जसा सूत कांतण्याचा चरखा लग्नाची देणगी म्हणून मुलीला देण्याची रीत होती, तशीच चिनी स्त्रियांबरोबर कागदनिर्मितीसाठीं लागणारा कच्चा माल देणगीदाखल देण्याची रीत चीनमध्यें रूढ होती. जपानमध्यें तर शेतकरी लोक कागदास योग्य अशा तंतुमय वनस्पतींचीं मुद्दाम पिकें काढतात व शेतीच्या कामांतून मुक्त झाल्यावर रिकामपणीं घरबसल्या उत्तमोत्तम कागद तयार करतात. एकट्या टोकियो शहरांत इ. स. १८७५ मध्यें ३६०० ठिकाणीं कागद तयार होत होता व कोणत्याहि ठिकाणीं ४-५ पेक्षां अधिक कारागीर नव्हते. सर्व जपान-देशभर अशाच गृहोद्योगद्वारा कागदाची प्रचंड पैदास होत असते.

नेपाळ-व-भूतानमध्येंहि फारच उच्च दर्जाचा हातकागद अद्यापहि पैदा होत असतो; तिकडे कोंवळ्या बांबूपासून अत्यंत चिवट व फारच पातळ कागद तयार करतात; ह्या कागदाचा तर असा विशेष गुण सांगतात कीं त्याला कीड, कसर लागत नाहीं!

इटली देशांतील फॅब्रिॲनो शहरानें शेंकडों वर्षांपासून आपल्या हातकागदाचें वैशिष्ट्य आजतागायत अबाधित राखलें आहे असें म्हणतात. इंग्लंडमधील करन्सी नोटांचा कागद इ. स. १७२५ पासून पोर्टल नांवाच्या कारखानदाराकडून हातकागद म्हणूनच तयार होत असतो. मूळचे पोर्टल बंधू फ्रान्समधील छळाला कंटाळून निर्वासित म्हणून इंग्लंडमध्यें आले होते. १६८५ सालांत घडलेल्या या धामधुमींत इंग्लंडमध्यें इतरहि अनेक कागद-कारागीर दाखल झाले होते.








कागदाचा हा समग्र इतिहास मनोरंजक आहे. पण त्यांत प्रस्तुत मुद्द्याची गोष्ट इतकीच कीं करन्सी नोटा, दस्तऐवज इत्यादि टिकाऊ स्वरूपाच्या कामाकरितां हातकागदाचीच कास धरावी लागते व अशा कागदाला सांप्रतच्या यंत्रयुगांतहि इतकी मागणी आहे कीं प्रारंभीं दिलेल्या अवतरणांपैकीं एकांत नमूद केल्याप्रमाणें सांप्रत अशा कारागिरांचा तुटवडा जाणवूं लागला आहे.

सर्वसामान्य समजुतीप्रमाणें जगांतल्या कागद करण्याच्या कलेला चिनी लोकांनीं जन्म दिला व त्याचा युरोप-हिंदुस्थानांत प्रसार करण्याचें कार्य मुसलमानांमार्फत पुढें झालें. कागदाचा हा प्रवास व इतिहास कितीहि रम्य असला तरी त्या तपशिलांत जाण्याचा मोह प्रस्तुत लेखापुरता आवरलाच पाहिजे. येथें इतकेंच नमूद केलें म्हणजे पुरे कीं, कागदासारखी उपयुक्त वस्तू हातीं लागल्यापासून सर्व जगांत जरी कागदाची पैदास व प्रगति झपाट्यानें होऊं लागली तरी, व युरोप–अमेरिकेंत कागदाच्या गिरण्या जरी चालू झाल्या तरीहि, अगदीं अर्वाचीन कालापर्यंत वनस्पतिजन्य तंतूंचा, चिंध्यांचा किंवा रद्दी कागदांचा लगदा तयार करीपर्यंतचें काम फार तर यंत्राच्या द्वारा होई; पण प्रत्यक्ष कागदाची पैदास हस्तोद्योगांतच मोडण्याजोगी होई. सर जॉर्ज वॅट् यांनीं आपल्या "Commercial Products of India" ('हिंदुस्थानचें व्यापारी उत्पादन') नामक ग्रंथांत असें स्पष्ट नमूद केलें आहे कीं, "अगदीं १८०१ पर्यंत इंग्लंडमधील कागद हा सर्वस्वीं हात-कागदच होता." (So late even as 1801 English paper was entirely hand-made-" quoted by Shri Satish Chandra Dasgupta in "Hand-made Paper," page 9) आज जगांत कागदाच्या शेकडों गिरण्या जरी निघाल्या असल्या तरीहि आज जगांत हातकागदाला एक विशिष्ट सन्मानाचें स्थान आहे ही गोष्ट अवश्य नमूद करण्याजोगी आहे; प्रारंभीं जे उतारे उद्धृत केले आहेत त्यांवरून ही गोष्ट लक्षांत येण्याजोगी आहे.

अशा परिस्थितींत हिंदुस्थानांतील हातकागदाच्या धंद्यालाहि सन्मानाचें स्थान मिळवून देण्याचा खटाटोप करणें ही गोष्ट हास्यास्पद नाहीं येवढें तर कबूल होईल ना?

## कागदी पुरे

आतां, हिंदुस्थानच्या बाबतींत कागदाची स्थिति काय होती व आहे याचा थोडा परामर्श घेऊं.

जगांतल्या प्रत्येक व्यक्तीला अन्न व वस्त्र लागतें. पण जगांतल्या प्रत्येक देशांत या वस्तूंची पैदास घरोघर व गांवोगांव होऊं शकत नाहीं; या वस्तूंच्या पैदाशीचें विकेंद्रीकरण जगांतल्या कित्येक देशांत तर होणें अशक्यच आहे. पण हिंदुस्थान हा असा देश आहे कीं येथें अन्न, वस्त्र आदि अनेक जीवनोपयोगी वस्तूंची पैदास स्वभावतःच शतकानुशतकें विकेंद्रित झालेली आहे; तशीच कागदाचीहि पैदास विकेन्द्रित होण्यास या देशांतील वातावरण फार अनुकूल आहे. तंतुमय वनस्पतींपासून कागद तयार करतां येतो ही गोष्ट माहीत झाल्यापासून या देशांतील शेकडों ठिकाणीं हजारों कारागीर या धंद्यांत मग्न झाले. नाना प्रकारच्या तंतुमय वनस्पती या कामासाठीं वापरण्यांत येऊं लागल्या; इतकेंच नव्हे तर तुटके व सडके दोर, दोरखंडें, गोणपाट व पोतीं, फार काय फाटक्या चिंध्या व तुटके कागदहि कागद करण्याच्या कामासाठीं वापरण्यांत येऊं लागले. अर्थातच कित्येक शहरांतून या कारागिरांच्या वस्तींना 'कागदी पुरा' अशीं नांवेंहि पडलीं.

मुसलमानांच्या अमदानींत या धंद्याला खूपच उत्तेजन मिळालें, ही गोष्ट नाकबूल करतां येणार नाहीं. कागदाच्या कारागिरांनीं मुसलमानी धर्म पत्करला, कीं मुसलमानधर्मीय लोकांनींच हा धंदा मोठ्या प्रमाणांत चालविला हें ठरविणें इतिहासज्ञांचें काम आहे. सामान्यपणें आढळून येतें तें हेंच कीं कागदाची पैदास करणारे बहुसंख्य लोक मुसलमानच आहेत. या धंद्यांत स्त्रिया व मुलें यांना करण्यासारखींहि अनेक कामें असल्यामुळें कुटुंबेंच्या कुटुंबें या धंद्यांत वंशपरंपरेनें काम करीत आलीं असल्याचें आढळून येतें. हा धंदा पंजाबमध्यें फारच भरभराटीस चढला. असें सांगतात कीं जहांगीरच्या कारकीर्दींत एकट्या सियालकोटमध्यें सुमारें ९ लाख रुपये किंमतीचा कागद पैदा झाला. शीखांच्या अमदानींत तर एकट्या सियालकोटमध्यें दरसाल सुमारें










१॥ लाख रु. किंमतीचा कागद तयार होई. हिंदुस्थानांतील इतर प्रांतांतहि, अगदीं उत्तरेपासून दक्षिणेपर्यंत सर्वत्र अनेक ठिकाणीं कागदाचे लहानमोठे कारखाने अनेक शतकांपासून चालत होते. उत्तरेकडे सेरामपूर कागद, मध्य हिंदुस्थानांत दौलताबादी व एरंडोली कागद, दक्षिणेकडे जुन्नरी कागद असे कांहीं कांहीं ठिकाणांचे कागद तर फारच नामांकित होते.

पाश्चात्य देशांतील यांत्रिक शोधांमुळें व परकीय सत्तेच्या व्यापारविषयक अन्यायी, आक्रमक व आपमतलबी धोरणामुळें इतर अनेक धंद्यांप्रमाणें कागदाच्या धंद्याचीहि बेसुमार गळचेपी झाली. तरीहि लक्षांत घेण्याजोगी गोष्ट ही आहे कीं हातकागदाच्या कांहीं विशिष्ट गुणांमुळेंच अनेक अन्यायांना तोंड देऊन व राजाश्रयाच्या अभावींहि हिंदुस्थानांतील हातकागद आजतागायत जीव धरून राहिला आहे. शिवाय हस्तव्यवसायास अनुकूल अशीच आपल्या देशाची परंपरा व परिस्थिति आहे; तसेंच कागदाच्या व्यवसायाचें स्वरूपहि ह्या धंद्याचें विकेंद्रीकरण होण्यास अनुकूल आहे. ह्या गोष्टी खऱ्या असल्या तरीहि सांप्रतच्या काळांत हस्तोद्योग व ग्रामोद्योग यांना काय स्थान आहे? असा प्रश्न डोक्यांत उभा राहतोच.

### यंत्रयुगांत हस्तक्षेप ?

प्रश्न असा आहे कीं, आजच्या यंत्रयुगांत ही हस्तोद्योगाची लुडबुड कांय कामाची? यंत्रयुगाच्या प्रचंड चक्रांत हस्तक्षेप केल्यास हात तुटण्याचाच संभव नाहीं का? आजच्या युगांत कागदाचा खप प्रचंड प्रमाणांत वाढला आहे. अशा वेळीं कागदाची पैदास हस्तोद्योग वा ग्रामोद्योग यांच्या द्वाराच करण्याचा आग्रह धरणें राष्ट्रहिताच्या व व्यावहारिक दृष्टीनें तरी कितपत इष्ट व आवश्यक आहे?

हा प्रश्न म्हणजे यंत्रोद्योग विरुद्ध ग्रामोद्योग किंवा यंत्रोद्योग विरुद्ध हस्तोद्योग अशा व्यापक प्रश्नाचाच एक भाग होय. अर्थात् सदर व्यापक प्रश्नाचा निकाल लावला म्हणजे त्याच्या अंतर्गत अशा या प्रश्नाचा निकाल लागलासें होईल हें उघडच आहे. पण सदर व्यापक प्रश्नाचा सविस्तर ऊहापोह करण्याचें हें स्थळ नसल्यामुळें येथें एक-दोन मुद्द्यांचा खुलासा केला म्हणजे तूर्त पुरेसें होइ.

पहिला मुद्दा हाच कीं हस्तोद्योग किंवा ग्रामोद्योग यामध्यें यंत्रांना मज्जाव असतो ही जी सामान्य समजूत आहे ती बरोबर नव्हे, हें लक्षांत घेणें जरूर आहे. ग्रामोद्योगांचें किंवा हस्तोद्योगांचें यंत्रांशीं भांडण नसून, यंत्रांचे गुलाम बनण्याच्या वृत्तीशीं व यंत्रांचे गुलाम बनविणाऱ्या परिस्थितीशीं भांडण आहे. यंत्रांचे पुरस्कर्ते जर यंत्रांचे गुलाम न बनतां किंवा यंत्रयुगांतील एक परस्वाधीन यंत्र न बनतां यंत्रालाच गुलाम बनवून मानवसमाजाच्या हितार्थ त्याला वांकवतील, तर ती गोष्ट ग्रामोद्योगवाल्यांना व हस्तोद्योगवाल्यांना मान्यच होईल. यंत्रांमुळें मानव्य खच्ची न होतां मनुष्याचे श्रम जर थोडेफार वांचत असतील तर तशीं यंत्रें ग्रामोद्योगवाल्यांना व हस्तोद्योगवाल्यांना आक्षेपार्ह वाटणार नाहींत. उदाहरणार्थ-चरखा, तेलघाणा, तकली, फार काय चाकू, कातरी, सुरी हीं सुद्धां यंत्रेंच नव्हत काय? पण त्यांच्याशीं आम्हां ग्रामोद्योगवाल्यांचें भांडण नाहीं. पण हेंहि लक्षांत ठेवलें पाहिजे कीं, आमचें अडेल म्हणून आमचें या वस्तूशीं भांडण नाहीं अशी लाचारीपणाची वृत्ति याच्या मुळाशीं नसून या वस्तू किंवा हीं यंत्रें अशीं आहेत कीं मनुष्य त्यांचा गुलाम न बनतां आपल्या सेवेला तीं जुंपू शकतो; म्हणूनच तीं यंत्रें असूनहि ग्रामोद्योगाच्या कार्यांत तीं बसूं शकतात. हा मुद्दा विशद करण्याचें कारण असें कीं हातकागदाला उत्तेजन देण्याचा व तो धंदा जिवंत ठेवण्याचा ग्रामोद्योग-समितीचा जो खटाटोप चालू आहे त्याच्या मुळाशीं कांहीं हेकटपणा, आडमुठेपणा, अंध पुराण-प्रियता किंवा विश्वाच्या प्रगतीच्या घड्याळाचे कांटे मागें खेंचण्याची वेडी आशा, असें कांहीं तरी आहे, असें कोणीहि न मानतां त्या खटाटोपाच्या मुळाशीं एक विशिष्ट विचारसरणी आहे व ती विचारसरणी मानव्य जिवंत ठेवणारी व सर्वोदयकारी आहे असा आमचा विश्वास आहे ही गोष्ट प्रत्येकानें लक्षांत घेतली पाहिजे.

याशिवाय आणखीहि एक मुद्दा विशद केल्याशिवाय हातकागदाच्या व्यवसायाचें हितकारित्व लक्षांत येणार नाहीं. उपयुक्ततेच्या दृष्टीनें कागदाची







तुलना अन्न–वस्त्राशीं वर केलीच आहे; पण पैदाशीच्या बाबतींतहि ही तुलना करणें बोधप्रद होईल. मानवी गरजा भागविणाऱ्या अन्न व वस्त्र या वस्तू विकेंद्रीकरणाच्या द्वारा पैदा करणें हेंच जसें मानवांच्या ऐहिक सुखाला व मानव्याला पोषक आहे, तसेंच कागदाची पैदासहि विकेंद्रीकरणाच्या द्वारा करणें मानवी हिताला व मानव्याला पोषक आहे असें थोड्या विचारांतीं सहज लक्षांत येईल.

महात्मा गांधींच्या डोळ्यांसमोर जें रामराज्य होतें व जी आदर्श समाजरचना होती त्या रामराज्याची व त्या अहिंसक समाजाची प्रस्थापना करण्यास हस्तोद्योग व ग्रामोद्योग जारीनें सर्वत्र सुरू झाले पाहिजेत.

हातकागदाचा धंदा हा अशाच पैकीं एक धंदा आहे हें पुढील विवेचनावरून लक्षांत येईल:— (१) कागद तयार करण्यास लागणारा कच्चा माल देशांत सर्वत्र मिळतो; (२) कागद तयार करण्याची कृति इतकी सुटसुटीत आहे कीं, ती सहज हस्तगत करतां येते; (३) या कार्यास लागणारी साधनसामग्री अल्प असून शिवाय ती कोठेंहि सहज बनवितां येते; (४) भांडवल फारच थोडें लागतें आणि (५) स्त्रिया व मुलें यांनाहि या कामीं पुष्कळच मदत करतां येण्याजोगी असते.–या सर्व गोष्टी लक्षांत घेतल्या म्हणजे हा धंदा विकेंद्रीकरणास अर्थात् ग्रामोद्योग म्हणून चालविण्यास अत्यंत योग्य आहे असेंच आढळून येईल.

## कागदाचे प्रकार

कागदाच्या विविध प्रकारच्या उपयोगानुसार कागदाचे गुणधर्महि निरनिराळे असावे लागतात हें उघडच आहे.

जाड–पातळ, चिवट–ठिसूळ, पांढरा–रंगीत, लिहिण्याचा–टिपण्याचा, बांधण्याचा–वेष्टणाचा, छापण्याचा–खरडण्याचा, गाळण्याचा–चोळण्याचा, पुस्तकांचा–वृत्तपत्रांचा, नकलांचा–स्टेन्सिलचा, पेन्सिलीचा–शाईचा, घासण्याचा–पुसण्याचा–अशा अनेक प्रकारांच्या कागदांची व्यवहारांत गरज लागते. ज्या त्या कामास खास उपयोगी असाच कागद तयार केला गेला तरच त्याचा योग्य तो स्वीकार समाजाकडून होईल. उदाहरणार्थ, वृत्तपत्रांसाठीं वापरण्यांत येणारा कागद जर करन्सी नोटा, दस्तऐवज इत्यादिकांसाठीं वापरला तर काय परिणाम होईल हें सांगणें नकोच. हातकागद जो अत्यंत प्रतिकूल परिस्थितींतहि टिकून राहिला तो त्याच्या अंगच्या विशिष्ट टिकाऊपणामुळेंच होय; गिरण्यांत तयार झालेल्या कागदावर आपले जमाखर्च लिहून ठेवले तर ते अल्पावधींतच हवेंत विरून जातील याची जाणीव आपल्याकडील व्यापाऱ्यांना व सावकारांना होती. म्हणूनच स्वार्थाकरितां का होईना, पण त्यांनींच जुन्नरी व एरंडोली कागद जगविला ही गोष्ट कबूल करणें भागच आहे.

प्रारंभीं दिलेल्या अवतरणांवरून हें लक्षांत येईल कीं यंत्रें, गिरण्या, कारखाने यांच्या परिभाषेंत बोलणारे व वावरणारे यूरोप-अमेरिकेंतील कागद–तज्ज्ञ व कागद–कारखानदार एकमुखानें मान्य करतात कीं, आजच्या यंत्रयुगांत सुद्धां हातकागदांत जे विशिष्ट गुण असतात ते यंत्र-कागदांत दृष्टोत्पत्तीस येत नाहींत. त्यामुळेंच कित्येक गिरण्या-कारखान्यांतून नकली हातकागद तयार केले जातात व हातकागदांच्या चाहत्यांची फसवणूक केली जाते. अशी फसवणूक केली जाऊं म्हणून इंग्लंडमध्यें एक कायदा करण्यांत आला आहे. (खादीच्या बाबतींत हिंदुस्थान सरकारला असाच एक कायदा करावा लागला आहे याचें स्मरण वाचकांस असेलच.)

सांगण्याचा इत्यर्थ असा कीं, जोंपर्यंत हातकागदांत कांहीं विशिष्ट गुणधर्म शाबूत राहतील तोंपर्यंत हातकागदाच्या धंद्याला मरण नाहीं ही गोष्ट निर्विवाद आहे. हातकागदाच्या बनावटींत जी एक खुबी आहे व त्यांत हस्तकौशल्याची जी चुणूक आहे ती गिरण्यांतील कागदांत उतरणें शक्य दिसत नाहीं असें पाश्चात्य यंत्रविशारदांचें मत आहे. यंत्रांच्या द्वारा कागदनिर्मितीचें प्रमाण किती जरी वाढलें व कित्येक मैल लांबीच्या व कित्येक टन वजनाच्या गुंडाळ्या जरी गिरण्यांत निर्माण होत राहिल्या तरीहि गिरण्यांच्या धूमधडाक्यामुळें त्यांतून निर्माण होणारा कागद कमकुवतच होणार; शिवाय पैदास वाढवण्याच्या मोहांत व चढाओढींत सांपडलेले कारखानदार व गिरणीवाले स्वाभाविकपणेंच चिंध्या, ताग आदि निवडक कच्च्या मालाच्या ऐवजीं इतर हलका कच्चा माल वापरणार; शिवाय








आणखी विशेष असें कीं यंत्रांतून जाणाऱ्या प्रवाही लगद्याला एकाच दिशेनें गति मिळाल्यामुळें लगद्यांतील तंतू समांतरच राहतात. पण हौदांतील जलमिश्रित कागद–तंतू सफाईनें चाळणीवर घेऊन कौशल्यानें त्या चाळणीला चालना देणाऱ्या कुशल कारागिराच्या हातचलाखीमुळें चाळणींतील तंतू एकमेकांत उभे–आडवे गुरफटले जातात व त्यामुळेंच आणि त्यानंतरच्या वाळवण्याच्या वगैरे प्रक्रियेमुळेंच हातकागद गिरणीच्या कागदापेक्षां अधिक चिवट व टिकाऊ होतो. हा मुद्दा खादीवाल्यांच्या लक्षांत चटकन् येण्याजोगा आहे. गिरणीच्या पेळूंतील तंतू समांतर असतात. पण हातपेळूंतलि तंतू एकमेकांत गुरफटलेले असतात. यामुळेंच गिरणीच्या कापडापेक्षां खादी अधिक टिकाऊ असते असा अनुभव आहे.

अर्थात् हातकागदाचें वैशिष्ट्य याच कृतींत आहे. लगदा तयार करीपर्यंतचें काम यांत्रिक पद्धतीनें केलें तरीहि ही मुख्य कृति हातानें केली म्हणजे तो कागद 'हातकागद' ही संज्ञा प्राप्त होण्यास पात्र ठरतो. यूरोप-अमेरिकेंतील कित्येक गिरण्यांतून अशाच संज्ञेचा हातकागद तयार होतो व पुण्याच्या हातकागद-संशोधनकेंद्रांतहि लगदा तयार करण्याचें श्रमाचें काम यांत्रिक पद्धतीनेंच केलें जातें. जुन्नर व एरंडोल येथील कागद-निर्मितीचें काम पुण्याच्या संशोधन-केंद्राच्या देखरेखीखालीं व मार्गदर्शनाखालीं होत असून तेथील कागदहि पुण्याच्या संशोधन-केंद्रांतील कागदाप्रमाणेंच नांवलौकिक मिळवण्याजोगा आकर्षक होईल अशी उमेद आहे. ही उमेद म्हणजे कल्पनासाम्राज्य नसून नुकताच चिंध्यांपासून केलेला दस्तैवजी कागदाचा जो नमुना जुन्नरहून हातीं आला आहे त्यावरून ही उमेद सफल होणार यांत शंकाच वाटत नाहीं. हा नमुना केवळ नमुना नसून हा कागद व्यापारी प्रमाणांत पुरवठा करतां येईल इतका निघूं लागला आहे हीहि गोष्ट लक्षांत घेतली पाहिजे. जुन्या पद्धतीनें कागदाची पैदास करण्याचा धंदा ज्यांनीं वंशपरंपरेनें चालविला तेच लोक आज नव्या पद्धतीचा यशस्वी रीतीनें अंमल करूं लागल्याचें कदाचित् हें हिंदुस्थानांतील पहिलेंच उदाहरण असेल.

हलक्या दर्जाच्या कच्च्या मालापासून तयार होणाऱ्या बाजारी गिरणी-कागदाशीं किंमतीच्या बाबतींत चढाओढ करणारा हातकागद तयार करावयाचा हें धोरण आत्मघाताचें होईल; कारण हातकागद किंबहुना सर्व देशी माल म्हणजे गचाळ व टाकाऊ माल असा प्रवाद रूढ झाल्यास ती परिस्थिति हस्तकौशल्याची विटंबना करणारी व ग्रामोद्योगांचा घात करणारीच नव्हे काय ? हस्तकौशल्याच्या जोरावर तयार होणारा कागद आज जगांत मानाचें स्थान पटकावून बसला आहे ही गोष्ट यंत्रसंपन्न यूरोप–अमेरिकेंतील शास्त्रज्ञ व कारखानदारहि ज्याअर्थी कबूल करीत आहेत, त्याअर्थीं शेंकडों वर्षांपासून आपल्या देशांत चिकाटीनें चालू असलेल्या या कौशल्याचें संगोपन आपण करावयास नको काय ?

## देशांतील हातकागदविषयक प्रगति

हातकागदाच्या पैदाशीच्या बाबतींत आज हिंदुस्थानांत काय परिस्थिति आहे हें अजमावण्यासाठीं मीं वर्धा येथील अखिल–भारत–ग्रामोद्योग–संघाशीं पत्रव्यवहार करून त्यांनीं सुचविलेल्या १६ ठिकाणीं पत्रें पाठवून माहिती मागवली; त्यांपैकीं फक्त ७ ठिकाणांहूनच थोडीफार माहिती मिळाली. या सर्व माहितींतून निघालेला कांहीं निष्कर्ष खालीं नमूद करीत आहे.—

( १ ) बंगालमध्यें सोदपूर येथें जी ' खादीप्रतिष्ठान ' नांवाची सुप्रसिद्ध संस्था आहे, ज्या संस्थेनें ग्रामोद्योगाच्या क्षेत्रांत व इतर राष्ट्रसेवेंत बहुमोल कामगिरी बजावली आहे व ज्या संस्थेनें दे. भ. सतीशचंद्र दास गुप्त यांचा हातकागदावरील माहितीपूर्ण ग्रंथ प्रकाशित केला आहे, त्या संस्थेमध्यें बांबूपासून उत्कृष्ट प्रतीचा कागद तयार होत असे. त्याला मागणीहि भरपूर होती. पण गेल्या महायुद्धापासून वाहतुकीच्या अभावीं कच्चा माल मिळणें अशक्य झाल्यामुळें तें काम त्या संस्थेस अजीबात बंद करावें लागलें आहे.

( २ ) जयपूरकडील संगनेर केंद्रामार्फत दरसाल निरनिराळ्या प्रकारचा सुमारें ६००० रीम कागद अंदाजीं किंमत दीड लाख रुपयांचा तयार होतो. तिकडे यंत्रसामग्री वापरीत नसत. पण लगदा







(पल्प) तयार करण्यासाठीं नुकताच एक बीटर खरीदण्यांत आला आहे.

(३) अमरावतीच्या 'अशोक पेपर-मिल्स 'चे श्री. वि. शि. हातोले दरसाल सुमारें रु. १०००० किंमतीचा कागद तयार करतात. भरपूर सरकारी मदत मिळाल्यास 'पल्प' मोठ्या प्रमाणावर तयार करून तो खेड्यापाड्यांत घरोघर पोंचवून जपान-प्रमाणें हा धंदा खूप विकेंद्रित स्वरूपांत चालविता येण्यासारखा आहे असें ते म्हणतात.

(४) जुन्नर व एरंडोल येथें फार पूर्वीपासून हातकागदाचा धंदा चालू आहेच; पण अलीकडे पुण्याच्या संशोधन केंद्रामार्फत त्या दोन्ही ठिकाणीं अनेक सुधारणा झाल्या असून तेथें आतां उत्तम दर्जाचा कागद तयार होऊं लागला आहे. पैदाशीचें मानहि वाढत्या प्रमाणावर आहे.

(५) त्रावणकोरचे डायरेक्टर ऑफ इंडस्ट्रीज म्हणतात कीं हा धंदा बेताबाताच्या प्रमाणावरच चालणें शक्य आहे व हा व्यापारी धोरणावर टिकण्याजोगा नसून देशभक्तीच्या आधारानेंच टिकण्याजोगा आहे.

(६) पुण्याच्या हात-संशोधन-केंद्रांत दिवसें-दिवस फार भारी दर्जाचा व विविध कामासाठी उपयोगी असा कागद तयार होत असून त्या केंद्राचे चालक श्री. गोंधळेकर यांचा असा अभि-प्राय व अनुभव आहे कीं मामुली हातकागद गिर-णीच्या व परदेशच्या कागदाशीं किंमतींत टिकणें शक्य नाहीं. पण फिल्टर पेपर, ब्लॉटिंग पेपर, ड्रॉइंग पेपर, बॉन्ड पेपर इत्यादि स्वरूपाचा विशिष्ट व भारी दर्जाचा कागद गुणांतच नव्हे तर किंमतीं-तहि परदेशी मालाला यशस्वी रीतीनें टक्कर देऊं शकतो.

## भावी आकांक्षा

या सर्व परिस्थितीवरून आपण बोध घ्यावयास नको का ? आजच्या यंत्रयुगांत हातकागदाचा धंदा जगलाच तर तो आपल्या गुणांच्या जोरावरच जगेल व हे गुण टिकविण्याकरितां व वाढविण्या करितां खूप संशोधन व खटपट व्हावयास पाहिजे. हें सर्व जरी खरें असलें तरीहि या कामीं यश मिळ-विण्यासाठीं सरकारी संरक्षणाची व मदतीचीहि आवश्यकता आहे हें समजण्यास पुण्याच्या या हात कागद-संशोधन-केंद्राचा थोडा पूर्वेतिहास पाहिला म्हणजे पुरें.

कॉंग्रेस मंत्रिमंडळ प्रथम अधिकारावर आल्यानंतर अखिल-भारत-ग्रामोद्योग-संघातर्फे पुण्याचें हातकागद-संशोधन-केंद्र १९४० सालीं स्थापन झालें. चार वर्षेपर्यंत या केंद्राचें काम श्री. कृ. बा. जोशी ह्या निष्णात कागदतज्ज्ञाच्या देखरेखीखालीं समाधान-कारकपणें चाललें होतें व तेथील कामाबद्दल अनेक अधिकारी व तज्ज्ञ यांनीं खूप समाधान प्रकट केलें होतें. पण पुढें एकाएकीं १९४५ सालीं हें केंद्र कां बंद करण्यांत आलें हें त्या वेळच्या ९३ कलमी सरकारलाच ठाऊक !

पुढें १९४६ सालीं कॉंग्रेस-सरकार पुन्हां अधि-कारावर आल्यानंतर या केंद्राचें पुनरुज्जीवन झालें व या केंद्राचा कारभार मुंबई सरकारनें नेमलेल्या ग्रामोद्योग-समितीनें आपल्या हातीं घेतला. मूळच्या योजनेंत एका विशिष्ट बाबतींत फेरफार करावा असें अनुभवानें ठरलें व ती बाब हीच कीं हें केंद्र केवळ संशोधनात्मक न राहतां पैदास-केंद्रहि व्हावें. अर्थात् पूर्वी रोज चिंध्यांपासून ४० रत्तल लगदा तयार होत होता, तो तदनंतर रोज १०० रत्तल होऊं लागला व आतां तर त्याहीपेक्षां अधिक प्रमाणांत लगदा तयार होत आहे; इतकेंच नव्हे तर आतां कागदाचा खप त्याच्या गुणाच्या जोरावरच होऊं लागला असून ठिकठिकाणाहून इतक्या मागण्या येत आहेत कीं त्या पुरवतां येत नाहींत ! सरकारी संरक्षण व मदत अधिक लाभल्यास यापेक्षांहि अधिक झपाट्यानें प्रगति करतां येईल.

कॉंग्रेस-सरकारच्या अल्पावधींतील अल्पशा उत्तेजनामुळेंहि महाराष्ट्रांतील एरंडोल व जुन्नर येथील कागदी पुरे गजबजले आहेत; तसेंच वऱ्हाड, मध्यप्रांत, संयुक्तप्रांत, बंगाल, बिहार, जयपूर, नेपाळ वगैरे अनेक प्रांतांतील हात-कागद-कारखा-न्यांची अलीकडे चांगली भरभराट होऊं लागल आहे. या सर्व ठिकाणीं दरसाल एकूण सुमा चार लाख रत्तल कागद तयार होतो.

जुन्नर व एरंडोल या दोन्ही ठिकाणच्या कागद-कारखानदारांना मार्गदर्शन करण्याचें कार्य पुण








येथील हातकागद-संशोधन-केंद्रामार्फत होत असतें. या संशोधन-केंद्राचे मुख्य कार्यकर्ते श्री. गोंधळेकर हे या शास्त्रांतले एक चांगले तज्ज्ञ व मेहनती गृहस्थ आहेत. त्यांच्या व त्यांच्या सहकाऱ्यांच्या परिश्रमांमुळें सांप्रत या केंद्रांत उत्तमोत्तम प्रकारचे कागद पैदा होत आहेत. उत्तम प्रकारच्या कागदांत जे जे गुणधर्म असावे लागतात त्या सर्व गुणांनीं संपन्न असे कागद तयार करण्याच्या कामीं या केंद्राला उत्तरोत्तर अधिकाधिक यश प्राप्त होत आहे. श्री. गोंधळेकर यांचें येथील ट्रेनिंग कॉलेजमध्यें नुकतेंच एक बोधप्रद व्याख्यान झालें. त्यांत त्यांनीं अल्प भांडवलाच्या जोरावर शाळकरी मुलांना सुद्धां उत्तम कागद पैदा करण्यास शिकवणें किती सुलभ आहे हें प्रत्यक्ष प्रयोग करूनच पटवून दिलें.

हातकागद किती मजबूत असतो तें दाखविण्यासाठीं त्यांनीं एका १८''×२३'' लांबीरुंदीच्या कागदावर एका २५ वर्षें वयाच्या शिक्षकाला उभें करून चोहों कोपऱ्यांनीं त्याला उचललें तरीहि तो कागद फाटला नाहीं! हें प्रात्यक्षिक पाहणाऱ्या सर्वांनाच महदाश्चर्य वाटलें व अत्यानंद झाला हें सांगणें नकोच. विशेषतः मुलांच्या पालकांना तर खूपच आनंद झाला. कारण, आधींच भयंकर महाग झालेलें शिक्षण, शाळांत लागणाऱ्या अनंत एक्झरसाईज–बुकांच्या भरमसाट किंमतीमुळें अधिकच महाग झाल्याचें पालकांना जाणवत आहे! 'बेसिक' शिक्षणांत कागद करण्याच्या शिक्षणाचा जर अंतर्भाव केला तर पालक अशा बेसिक शिक्षणाचे खास पुरस्कर्ते बनतील हें उघड नाहीं काय?

थोड्याच दिवसांपूर्वी पुणें येथील हात-कागद-संशोधन-केंद्रांत तयार झालेला हातकागद विलायती कागदाशीं तुलना करतां कसा काय ठरतो हें शास्त्रीय दृष्ट्या परीक्षिण्यासाठीं डेहराडून येथील सरकारी प्रयोगशाळेंत पाठविला होता. ब्रिटनमध्यें तयार झालेला अत्युत्तम कागद व येथून पाठविलेला कागद यांचें जें शास्त्रीय तुलनात्मक परीक्षण डेहराडून येथें करण्यांत आलें त्यावरून येथील कागद सर्व दृष्टींनीं अधिक सरस ठरला असल्याचा रिपोर्ट तिकडील अधिकाऱ्यांकडून आला आहे. हें तौलनिक परीक्षण खालीलप्रमाणें लिहून आलें आहे:—

[ कागदाचें शास्त्रीय दृष्ट्या परीक्षण करतांना पुढील चार बाबींचा विचार केला जातो ]

| | हातकागद | |
|---|---|---|
| | इंग्लिश | पुण्याचा |
| (अ) एका चौरस मीटरचें किती ग्राम वजन? (२८॥ ग्राम=१ औंस; १ मीटर = ३९ इंच) | १०८·६ | १०८·२ |
| (आ) ताठ कागद धरल्यास त्यावर किती वजन सहन करण्याची त्याची शक्ति आहे? | ३७·१३ | ७६·१९ |
| (इ) दोहोंबाजूंनीं ताणल्यास ताण सहन करण्याची शक्ति किती? | ६६७० | ७७२३ |
| (ई) किती वेळां घड्या केल्या असतां फाटतो? | ५२५ | २३५३ |

( घड्या घालण्याचें व मोजण्याचें काम यंत्रानें होतें.)

हातकागद व गिरण्याचे कागद यांच्याबद्दलचे जे शास्त्रीय ग्रंथ आहेत त्यांत 'कागदाची परीक्षा' हें एक स्वतंत्र प्रकरण असतें. कारण जाडी, सफाई, रंग, टिकाऊपणा, चिवटपणा, वजन, कच्चा माल, किंमत इत्यादि अनेक दृष्टिकोनांतून 'कागदाची परीक्षा' करावयाची असते. समान कार्यासाठीं पैदा केलेल्या कागदाचीच अर्थात् तुलना केली जाते. वृत्तपत्रीय कागदाची तुलना नोटांच्या कागदाशीं कशी करतां येईल? तशी तुलना करणें हास्यास्पद होईल हें उघडच आहे. अशा प्रकारें तुलना करूनच पुण्याच्या हातकागद-केंद्रांतील कागद सरस ठरला आहे!

आपल्या देशांतील उद्योगधंद्यांची वाढ व्हावी, विशेषतः हरप्रकारचे उद्योगधंदे बुडाल्यामुळें ओसाड पडलेलीं ग्रामें पुनरपि तेजःपुंज व्हावींत अशी सदिच्छा बाळगणाऱ्या सर्वांनीं हातकागदाच्या धंद्याला सक्रिय उत्तेजन देण्यासाठीं शक्य तितका हातकागदच वापरण्याचा निश्चय करावा अशी विनंति केल्याशिवाय राहवत नाहीं. तसेंच मुंबई-इलाखा-ग्रामोद्योग-समितीनें हातकागदाच्या पैदाशीबाबत पुढची जी दिशा कशी आंखली आहे ती वांचकाच्या माहितीसाठीं येथें नमूद केल्याशिवायहि हा लेख पुरा करवत नाहीं.








मुंबई-इलाखा-ग्रामोद्योग-समितीनें आपल्या ता. २ मे १९४८ च्या सभेंत कागदाच्या पंच-वार्षिक योजनेबाबत विचार करून सरकारकडून सव्वापांच लाख रुपयांची मदत मिळावी अशी मागणी करणारा ठराव पास केला आहे. योजनेचें स्वरूप असें आहे कीं, कागद तयार करण्यासाठीं लागणारा कच्चा माल सर्वत्र मिळण्याजोगा असल्यामुळें कागदाचा लगदा यांत्रिक पद्धतीनें करण्याचें केंद्र प्रत्येक जिल्ह्यांत एकेक असावें. हातकागदाचें खास वैशिष्ट्य लगदा तयार केल्यानंतरच्या क्रियेमध्येंच आहे हें वर नमूद करण्यांत आलेंच आहे. कच्च्या मालापासून लगदा तयार करण्याचें कामहि फार तर बैलाच्या साहाय्यानें केलें जावें, तेथेंहि यंत्राचा उपयोग करूं नये असें कित्येकांचें म। आहे. पण हें काम निव्वळ दगदगीचें असल्यामुळें तेवढे मानवी श्रम वांचविण्यासाठीं यांत्रिक बीटरच्या साहाय्यानें लगदा तयार करण्यांत येऊन तो हातकागद तयार करणाऱ्या कुशल कारागिरांच्याकडे पाठविण्यांत यावा असें धोरण तूर्त पत्करण्यांत आलें आहे. असा लगदा तयार करण्याचें काम ग्रामोद्योग-समितीखेरीज पण ग्रामोद्योग समितीस मान्य अशा संस्थांनीं केल्यास साधनसामग्रीसाठीं लागणाऱ्या खर्चापैकीं अर्धा खर्च ग्रामोद्योग समितीनें द्यावा. तसेंच रद्दीपासून किंवा पुरवण्यांत येणाऱ्या लगद्यापासून कागद तयार करणारांना साधनसामग्रीसाठीं कराव्या लागणाऱ्या खर्चापैकीं निम्मी पण जास्तींत जास्त रु. ५०० पर्यंतची मदत समितीनें करावी व शिवाय कागद-उत्पादनावरहि १० टक्के मदत देण्यांत यावी. अशा प्रकारें कच्च्या मालापासून लगदा व लगद्यापासून कागद तयार करण्याकरितां वगैरे मदत देण्यासाठीं म्हणून पांच वर्षांत एकंदर सव्वापांच लाख रुपयांपर्यंत रक्कम लागेल असा समितीचा अंदाज आहे; व तेवढी रक्कम सरकारनें मंजूर करावी अशी शिफारस समितीकडून सरकारला करण्यांत येणार आहे. शिवाय बेसिक शिक्षणाच्या रूपानें शाळांतूनहि हा व्यवसाय चालू करतां येण्यासारखा असल्यानें तसा प्रयत्न करण्यांत यावा. हा जसा एक भाग या योजनेंत आहे, तसेंच नवीन होतकरू कारागिरांनाहि या धंद्याचें शिक्षण देण्याची या योजनेंत तरतूद राहणार आहे. या सर्व गोष्टी लक्षांत घेतल्यास ही योजना किती हितकर होणार आहे हें सहज लक्षांत येईल.

ग्रामोद्योग, हस्तोद्योग, गृहोद्योग आदि स्वरूपाच्या कार्यकौशल्यास चालना देण्यास कटिबद्ध व वचनबद्ध असलेलें सांप्रतचें स्वराज्य-सरकार अशा स्वरूपाची योजना त्यांच्यापुढें रीतसर दाखल होतांच सत्वर मंजूर करील, व शेंकडों वर्षांपासून चालत आलेला हा धंदा बुडाल्यामुळें हताश झालेल्या हजारों कारागिरांच्या घरांत आनंद खेळविण्यास मदत करून आपल्या देशांतील हातकागदास देशांत व जगांत सन्मानाचें स्थान मिळवून देण्याचें श्रेय संपादन करील अशी आशा व उमेद प्रकट करून हा लेख पुरा करतों.

———

## ग्रामोद्योग आणि विज्ञान

परवशतेंतून शेतकऱ्याला सुटायचें असेल तर त्याला वस्त्राच्या बाबतींत स्वावलंबी व्हायला पाहिजे. हें तेव्हांच होणार जेव्हां चरखा वैज्ञानिक पद्धतीनें चालविला जाईल. आम्हीं ग्रामोद्योग आणि खादी यांची गोष्ट करतों तेव्हां लोकांना वाटतें कीं आम्हांला विज्ञान नको आहे! ही चुकीची समजूत आहे. आम्हीं तर जीवनासाठीं विज्ञानाचा अधिकांत अधिक उपयोग करूं चाहतों. आम्हीं जें अहिंसेचें नांव घेतों त्याचें कारण हेंच कीं आम्हीं वैज्ञानिक आहों. विज्ञानाची आम्हांला प्रगति करावयाची आहे आणि म्हणूनच आम्हीं अहिंसेचा आग्रह धरतों.

— **आचार्य विनोबा**, उदयपूर येथील प्रवचनांतून (२७-१०-४८) [ 'सेवक' १५-३-४९ ]








श्री. प्र. शं. फाटक

# कलाप्रकटनाचीं कांहीं माध्यमें

कलाविषयीं सर्वसाधारणतः कोणत्याहि प्रश्नाची चर्चा करतांना तिची निर्मिति व तिचा आस्वाद या गोष्टीकडे प्रामुख्यानें लक्ष द्यावें लागतें. कलानिर्मितीचा बहुतेक विचार कलावन्ताच्या बाजूनें करावा लागतो. याउलट कलास्वादाचा बहुतेक विचार रसिकांच्या दृष्टींतून करावा लागतो.

कलानिर्मितीविषयीं विचार करतांना तिची प्रेरणा, कलावन्ताच्या मनावरील त्या प्रेरणेचे संस्कार, कलावन्तांचें व्यक्तित्व, कलानिर्मितीस लाभलेलें माध्यम वगैरे अनेक उपप्रश्नांचा विचार करावा लागतो. या अनेक उपप्रश्नांपैकीं कलाप्रकटन व त्यास लाभलेलीं माध्यमें या दोन गोष्टींची चर्चा करण्याचा प्रयत्न प्रस्तुत लेखांत केलेला आहे.

कलाप्रकटनासाठीं सध्यां उपयोगांत आणलीं गेलेलीं माध्यमें अनेकविध आहेत.[१] साहित्यांत कला शब्दांचें स्वरूप घेतें; संगीतांत ती स्वरांतून व्यक्त होतें. चित्रांत ती रेषांतून व शिल्पांत ती मूर्तींतून प्रकट होते. आणि अलीकडे छायालेखनासारखे नवीन शोध लागल्यामुळें छायाप्रकाशासारखीं नवींनवीं क्षेत्रें तिला मोकळीं होऊं लागली आहेत.

या इतक्या विविध तऱ्हांच्या माध्यमांतून व्यक्त होत असतांना त्या त्या माध्यमांत अभिप्रेत असलेल्या गुणधर्मांचे संस्कार तिच्यावर होत जातात व शेवटीं तिचें स्वरूप त्या त्या माध्यमाप्रमाणें वेगळें होत जातें. या प्रत्येक माध्यमानुसार तिच्या शेवटीं व्यक्त होणाऱ्या स्वरूपांत फरक पडलेला दिसतो. या माध्यमांच्या वैशिष्ट्याबद्दल व त्या वैशिष्ट्यांच्या कलानिर्मितीवर होणाऱ्या परिणामांबद्दल कांहीं चर्चा करावयाची आहे.

विवेचनाच्या सोयीसाठीं चार ठळक असे कलाप्रकार आपण लक्षांत घेऊं. ते असेः संगीत, काव्य, चित्र आणि शिल्प. या चारहि कलाप्रकारांचीं वैशिष्ट्यें व त्यांतून कलानिर्मितीवर पडणारीं बंधनें यांचा विचार आपणांस करावयाचा आहे.

पण त्याआधीं एक गोष्ट आपणांस गृहीत धरावी लागेल. या संबंध लेखांत 'काव्य' हा शब्द वापरतांना त्याचें अक्षरस्वरूप ध्यानांत घेतलेलें नाहीं; फक्त वाक्स्वरूपच लक्षांत घेतलेलें आहे. अर्थात् अक्षरस्वरूपांत काव्याला लागूं पडणारीं वैशिष्ट्यें या ठिकाणीं गृहीत धरलेलीं नाहींत.

---

१ "Because objects of arts are expressive, they are a language. Rather they are many languages. For each art has its own medium and that medium is especially fitted for one kind of communication" (पृष्ठ १०७)—
—'Art as Experience' John Dewey.

"They cannot understand that the immediate problem for the artist may be to express himself within a square or a circle or a cube, to balance certain harmonies, to reconcile certain dissonances, to achieve certain rhythms, or to conquer certain difficulties of medium, as well as to catch a likeness."—पृष्ठ ६६, 'Art'- Clive Bell.








## संगीत व काव्य : अल्पजीवी निराकार माध्यमें

आतां या माध्यमांच्या वैशिष्ट्याकडे वळण्यास हरकत नाहीं. प्रथम आपण संगीत घेऊं. स्वर हा संगीताचा आत्मा आहे. आणि तो संपूर्णतया या ध्वनिरूप आहे. या ध्वनिरूपतेमुळें स्वराला दोन गुणधर्म प्राप्त झाले आहेत. पहिला गुणधर्म असा कीं त्याला दृश्य वा स्पृश्य असें कोणतेंच स्वरूप नाहीं. इतर माध्यमांशीं तुलना करितां तो निराकारच म्हणावयास हरकत नाहीं. दुसरा गुणधर्म असा कीं तो अत्यन्त अल्पजीवी आहे. ऐकतां ऐकतांच तो हवेंत विरून जातो. आणि त्याचा वस्तुरूप असा कोणताच ठसा मागें उरत नाहीं. ( आतां ध्वनिलेखनामुळें स्वराला शाश्वतता प्राप्त करून देणें शक्य झालें आहे ही गोष्ट वेगळी; पण त्यामुळें शाश्वतता हा स्वराचा मूळ गुणधर्म होऊं शकत नाहीं. ) जो कांहीं परिणाम राहतो, तो फक्त श्रोत्यांच्या मनांतच राहतो. त्यामुळें त्या परिणामाचें स्वरूप अत्यन्त व्यक्तिनिष्ठ असें असतें. कलेचें एक माध्यम या दृष्टीनें संगिताकडे पाहतांना त्याचें निराकारत्व आणि अल्पजीवित्व या दोन्ही गोष्टी लक्षांत ठेवाव्या लागतील.

थोडयाफार फरकानें संगिताचीं हींच लक्षणें काव्यालाहि लागूं पडतात. संगिताचें अधिष्ठान स्वरावर तर काव्याचें शब्दांवर. प्रथम गृहीत धरल्याप्रमाणें, आपण या ठिकाणीं काव्याचा वाक्स्वरूप अर्थ ध्यानांत घेत असल्याकारणानें त्याला ध्वनीचे दोनहि गुणधर्म लागूं पडतातः तो निराकार आहे व अल्पजीवीहि आहे. निर्माण होतांक्षणींच तो नाहींसा होतो.

मात्र या ठिकाणीं स्वर आणि शब्द यांतील एक सूक्ष्म फरक लक्षांत घ्यावयास पाहिजे. प्रत्येक शब्दाला भाषाशास्त्राला अनुसरून विशिष्ट असा एक अर्थ ठरविला गेलेला असतो. त्यामुळें शब्द जरी नाहींसा झाला तरी त्याच्याबद्दल श्रोत्यांच्या मनांत एक विशिष्ट अर्थवाचक स्मृति कायम राहते. स्वराची गोष्ट तशी नाहीं. एका विशिष्ट स्वरानें ठराविक असा बोध होत नाहीं. इतर स्वरांच्या अनुरोधानें तो वापरावा तेव्हांच त्याला कांहीं तरी अर्थ प्राप्त होतो. त्या मानानें काव्यांतील शब्दाला स्वतंत्र, वैयक्तिक असा कांहीं अर्थ आहे. तेव्हां बोधाच्या दृष्टीनें शब्द स्वरापेक्षां अधिक नियमित, अर्थवाहक आणि म्हणून अधिक वस्तुनिष्ठ आहे. हा एक सूक्ष्म पण महत्त्वाचा भेद सोडून दिला तर काव्याच्या आणि संगीताच्या वैशिष्ट्यांत या दृष्टीनें फारसा फरक दिसत नाहीं.

## चित्र व शिल्प यांचीं माध्यमें

काव्याकडून आपण चित्र या कलाप्रकाराकडे वळलों कीं मात्र माध्यमांत फार मोठे फरक झाल्याचें दृष्टीस पडतें. संगीत आणि काव्य यांप्रमाणें चित्र हें अनिर्बंध आणि निराकार असें नाहीं आणि म्हणून पहिल्या दोन माध्यमांप्रमाणें त्याचें स्वरूप तेवढें अल्पजीवीहि नाहीं.

पहिल्या दोन माध्यमांची अवस्था निर्गुण नसली तरी निराकारच होती असें म्हटलें तरी चालेल. त्यांच्याशीं तुलना करतां चित्र अगदीं भिन्न वाटतें. चित्राची मूलभूत कल्पना जी रेषा, तिचें आलेखन कुठल्या तरी पृष्ठभागावर व्हावें लागतें. याचाच अर्थ असा कीं चित्र हें माध्यम, साकार आणि ज्याला आपण इंग्रजींत concrete म्हणतों त्या प्रकारचें आहे. त्यामुळें तें पहिल्या दोन माध्यमांपेक्षां अधिक वस्तुरूप आहे.

हा मुख्य फरक झाला. दुसरा फरक असाः काव्यांत शब्दाला ज्याप्रमाणें अर्थाचें बंधन असतें, त्याप्रमाणेंच चित्रांतील रेषासमूहाला लांबीचें आणि रुंदीचें बंधन असतें.

कलावन्तापासून वेगळ्या असलेल्या या वस्तुनिष्ठतेमुळें चित्राला पहिल्या दोन कलाप्रकारांपेक्षां एक वेगळेंच वैशिष्ट्य ओघानेंच प्राप्त होतें. संगीतांतून व्यक्त होणारी कला ऐकतां ऐकतांच नाहींशी होते; काव्यांतून व्यक्त होणारी कला फक्त अर्थरूपानें स्मृतींत शिल्लक राहते. मात्र चित्रांतून प्रकट होणारी कला चित्र काढून झाल्यावर देखील आहे त्या स्वरूपांत पूर्णपणें शिल्लक राहते. पहिल्या दोन कलाप्रकारांना आपण अल्पजीवी म्हटलें तर चित्राला आपणाला त्या मानानें चिरस्थायी कलाप्रकार समजतां येईल.

शिल्पकलेच्या बाबतींत हेच फरक अधिक ठसठशीतपणें प्रत्ययाला येतात. चित्र हें पृष्ठभाग, लांबी

आणि रुंदी एवढ्यांनींच मर्यादित असतें. शिल्पकलेंत त्याच्या जोडीला आणखी जाडीचें बंधन पडतें. त्यामुळें सर्व माध्यमांत शिल्प जास्त साकार आणि म्हणून सर्वांत जास्त वस्तुनिष्ठ आहे ही गोष्ट ध्यानांत व्यावयास हवी. कारण त्यांत वापरलेलें माध्यम खऱ्या अर्थानें साकार असतें.

कलेच्या या चार माध्यमांचीं वैशिष्ट्यें आपण पाहिलीं; त्यावरून कांहीं गोष्टी नमूद करण्यासारख्या दिसतात. संगीतांतून शिल्पाकडे जसजसें यावें तसतशी माध्यमांतील व्यक्तिनिष्ठता कमी होऊं लागते, वस्तुरूपतेचें प्रमाण वाढत जातें. त्याचप्रमाणें माध्यम अधिकाधिक चिरस्थायी होत जातें. आणि गुणधर्मांतील फरकांमुळें प्रत्येक माध्यमांतून कलेच्या प्रकटनक्षमतेवर मर्यादा घातल्या जातात. त्या मर्यादा कोणत्या व प्रत्यक्ष कलानिर्मितीवर त्यांचा परिणाम काय होतो यांचा विचार आपणांस करावयाचा आहे.

परन्तु हें पाहण्यापूर्वी कलाविषयक अशा कांहीं सर्वसामान्य कल्पना आपणांस अधिक स्पष्ट करून घेतल्या पाहिजेत. त्याखेरीज कलानिर्मितीशीं निगडित असलेल्या प्रश्नांची सुलभ चर्चा आपणांस करतां येणार नाहीं. कलेची सुटसुटीत अशी व्याख्या सांगणें जरी अशक्य असलें तरी तिची सर्वसामान्य कल्पना देणारें लक्षण सांगणें अवघड ठरणार नाहीं व त्या दृष्टीनेंच पुढील विधानाचा अर्थ ध्यानांत घ्यावयाचा आहे. आपल्या मनांतील भावना वा कल्पना कांहीं विशिष्ट माध्यमाच्या द्वारा, कांहीं ठराविक रीतीनें प्रकट झाल्या कीं त्याला आपण कला समजतों.[२] ( Art is a conscious expression of aesthetic emotion ). हें विधान कलेस सर्वांशीं नसलें तरी बहुतांशीं लागूं पडण्याजोगतें आहे व तेवढ्यापुरताच त्याचा अर्थ मर्यादित आहे.

वर केलेल्या चर्चेत आपण माध्यमांचे विशेष पाहिले. आतां कला ज्या रीतींनीं त्यांतून प्रकट होते, त्या रीती या माध्यमांच्या वैशिष्ट्यांशीं कशा संबद्ध आहेत हें पाहावयाचें आहे.

### कलेच्या प्रकटनावर माध्यमांचे परिणाम

कलावंताच्या मनांत असलेली भावना वा कल्पना एका अर्थानें निर्गुण व निराकार (abstract) अशी असते. तिची प्रेरणा ही जरी कदाचित् बाह्य वस्तु असली तरी प्रत्यक्ष कलावन्ताच्या मनांत ती फक्त कांहीं जाणिवेच्याच स्वरूपांत वास करीत असते. ती ज्यांतून प्रकट होते त्यास आपण माध्यम म्हणतों व तिच्या आविष्कारास कला असें समजतों. संगीतांतून ज्या वेळेस ही भावना वा कल्पना व्यक्त होते त्या वेळेस तिला लाभलेलें माध्यम जवळजवळ मूळ भावनेइतकेंच निराकार असतें. वर वर्णन केल्याप्रमाणें त्यांत वस्तुनिष्ठता आजिबात नसते. काव्यांतून व्यक्त होतांना तिच्यावर शब्दांच्या अर्थाचें बंधन पडतें; चित्रांतून व्यक्त होतांना लांबीरुंदीचें व शिल्पांतून व्यक्त होतांना आणखी जाडीचें अशीं बंधनें तिच्यावर पडतात. त्यामुळें तिच्या प्रकटनसौकर्यावर परिणाम होतो तो असा: संगीतांतून प्रकट होतांना तिला लाभलेलें माध्यम जवळजवळ तिच्याइतकेंच निराकार आहे. त्यामुळें मूळ भावनेचें स्वरांत रूपांतर होत असतांना तिचीं लक्षणें बदललीं तरी तिचा मूळ गुणधर्म बदलत नाहीं. आणि त्यामुळें तिच्यांत असलेल्या तरलतेचा जसाच्या तसा अनुवाद माध्यमांतून होतो. त्यामुळें मूळ भावनेचें बदललेल्या स्वरूपांत, म्हणजे स्वरांत, पण संपूर्ण असें दर्शन होतें. माध्यमाचा व मूळ भावनेचा धर्म एकच असल्यानें कलेचें निदर्शन अत्यंत सुलभ व आणि संपूर्ण असें होतें.

संगीतांतून काव्याकडे येतांना आपण स्वराऐवजीं शब्दाचें माध्यम वापरूं लागतों. अगोदर विवेचन केल्याप्रमाणें स्वर व शब्द यांत या कारणापुरता फारसा फरक नाहीं. जो आहे तो एवढ्याचपुरता कीं शब्द हा अर्थावर अधिष्ठित असल्यामुळें स्वरापेक्षा

२ " And note well this further point: artists try to express emotion, not to make statements about its ultimate or immediate object."
—पृष्ठ ५७ " Art " by Clive Bell.








जास्त वस्तुरूप आहे. मूळ कल्पनेंतील वा भावनेंतील तरलता पूर्णपणें वाहून नेण्याचें सामर्थ्य शब्दांत नसेल तर शेवटीं निर्माण होणारी कला मूळ भावना वा कल्पना जशीच्या तशी प्रतिबिंबित करूं शकणार नाहीं. कलावंत ज्या भाषेंत आपली कला सांगणार तींत इतके विपुल शब्द हवेत, आणि त्यांचो अर्थ प्रकट करण्याची शक्ति एवढी चांगली हवी कीं मूळ भावनेच्या अत्यंत सूक्ष्म अशा छटा देखील त्यांच्यांतून आहेत तशा उतरविल्या जातील. सुसंपन्नतेच्या या कसोटीला पूर्णपणें उतरणाऱ्या भाषा सांपडणें अवघड आहे. म्हणून भावनांच्या सूक्ष्मतर छटांचा शब्दांत अनुवाद करणें कठिण आहे. मात्र तें अशक्य आहे असें मात्र नव्हे.

## चित्र व शिल्प : माध्यमांची मर्यादित शक्ति

चित्रकलेच्या बाबतींत मात्र कलाप्रकटनाचा एक वेगळाच नमुना दृष्टीस पडतो. पहिल्या दोन माध्यमांपेक्षां येथें स्वीकारलेलें माध्यम वस्तुरूप आहे आणि म्हणूनच त्याची प्रकटनक्षमता लांबीरुंदी, पृष्ठभाग वगैरे बंधनांनीं मर्यादित आहे. या ठिकाणीं कलावंताला आपल्या भावनांचा आविष्कार कांहीं तरी बाह्य प्रसंग वा विषय अशा साधनांच्या आधारें करावा लागतो. याचाच अर्थ असा कीं, एकादा उचित विषय वा प्रसंग निवडून त्यावर आपल्या भावनांचा आरोप करून मग त्या त्याला दाखवाव्या लागतात. तशी गोष्ट पहिल्या दोन कलाप्रकारांत होत नाहीं.

हें एकाद्या उदाहरणानें जास्त स्पष्ट करून सांगतां येईल. कलावंताला आपली शोकभावना व्यक्त करावयाची आहे असें आपण समजूं. संगीताच्या बाबतींत भावानुकूल अशा स्वरांनीं तो ती भावना आहे त्या आर्ततेनें व्यक्त करूं शकेल. काव्यांत अर्थवाही शब्दांचा उपयोग करून तो त्या भावनेची प्रचीति आणून देऊं शकेल. कदाचित् त्या भावनेचें वर्णन हाच त्याच्या काव्याचा विषय होऊं शकेल. चित्रकलेंत मात्र ही भावना तेवढ्या सुलभतेनें प्रतीत होणार नाहीं. आपल्या भावनांचें प्रकटन नुसत्या रेषासमूहानें त्याला करतां येणार नाहीं. कारण बोधाच्या दृष्टीनें त्याच्या एकट्याखेरीज इतरांना ती निरर्थक वाटण्याचा संभव आहे. त्याकरितां त्यानें आपल्या दुःखभावनेला सदृश अशा भावना निर्माण करणारा प्रसंग चित्रित करून त्यांत आपल्या दुःखी मनाचें प्रतिबिंब पाडलें पाहिजे. तरच त्याचा हेतु अल्पांशानें का होईना पण साध्य झाला असें म्हणतां येईल. कारण येथें स्वतःच्या भावनेच्या अत्यंत तरल छटांचें निदर्शन पहिल्या दोन कलाप्रकारांच्या मानानें अधिक अवघड होऊन बसतें. एकादी गोष्ट प्रत्यक्ष पद्धतीनें सांगणें जितकें सुलभ जातें तितकें सौकर्य निवेदनाच्या अप्रत्यक्ष पद्धतीनें येणें कठिण. कारण त्या ठिकाणीं आपण आपल्याला अजिबात परक्या अशा वस्तूवर वा प्रसंगावर आपल्या भावनेचा आरोप करून ती लांबी, रुंदी, पृष्ठभाग वगैरेंनीं बद्ध असलेल्या चौकटींत मांडतों. ज्याची रचनाच इतकी क्लिष्ट आहे अशा माध्यमांतून, आपल्या भावनेंत होणारे फेरबदल, तिचा वाढणारा व ओसरणारा आवेग, तिच्या विविध अशा नाजूक छटा, तिचा गतिमान् गुणधर्म यांचें यथार्थ दर्शन प्रायः अशक्यच ठरतें. असा प्रयत्न केल्यास मूळ भावना जराशा भ्रष्ट स्वरूपांत प्रतिबिंबित होण्याचाच संभव जास्त. म्हणून आपण ज्याला निव्वळ आत्मप्रकटीकरण म्हणून समजतों त्या प्रकाराच्या कलेस चित्राचें माध्यम फारसें मानवत नाहीं असें म्हणणें स्वाभाविक ठरतें.

जी गोष्ट चित्राला लागू पडते तिचीच पुनरावृत्ति शिल्पाच्या बाबतींत जरा आधिक्यानेंच होते. या ठिकाणीं मूर्तिरूपांतून प्रकट पावणाऱ्या कलेवर चित्रापेक्षांहि जास्त बंधनें पडतात. ज्या गोष्टींच्या साहाय्यानें शिल्पकार आपल्या भावनांचें प्रकटन करूं पाहतो त्या गोष्टींच्या निवडीवर आपोआपच एक मर्यादा पडते. चित्रकार कांहीं प्रसंग वा निसर्गदृश्यें यांचा उपयोग आपल्या भावना सांगण्याकडे करूं शकतो; पण तेंहि स्वातंत्र्य शिल्पकाराकडून हिरावून घेतलेलें आहे. त्याला फक्त मानवी व प्राणिजीवनविषयक आकृतींतून आपली कल्पना वा भावना दर्शवितां येते. वर्ण्यविषयाच्या निवडीवर हें एक फारच मोठें बंधन पडल्यामुळें, व चित्राला लागू पडणारीं सर्व बंधनें येथें असल्यानें मूळ भावनेची








तरलता तेवढ्या स्वच्छपणें शिल्पांत प्रतिबिंबित होत नाहीं.

चित्र आणि शिल्प या कलाप्रकारांचा उपयोग अशा प्रकारें भावनांचें स्थूल व स्थिर असें स्वरूप दर्शविण्याकडेच होतो. त्यांतून भावनांचें स्थायी असें स्वरूप दाखवितां येतें; पण त्यांतील सूक्ष्म आणि तरल अशा छटांचें निवेदन संगीत व काव्य यांजकडूनच होतें.

## कलेच्या दुर्बोधतेचें एक कारण

अत्यन्त व्यक्तिनिष्ठ असे भावनेचे उद्रेक ज्या वेळेस चित्र आणि शिल्प यांतून वाट काढण्याचा प्रयत्न करतात त्या वेळेस निर्माण होणारी कला ही बहुतेक वेळां अत्यन्त दुर्बोध व प्रचलित सौंदर्यकल्पनांशीं विसंगत अशी होण्याचा संभव असतो. सर्वसामान्य रसिकांस तिचा कांहींच अर्थबोध होत नाहीं. आणि तिचें रसग्रहण त्या कलावन्ताशीं समानधर्म असणाऱ्या कांहीं थोड्या रसिकांकडूनच होतें. आज ज्याला 'कलेंतील नवमतवाद' ( Modern Art ) म्हणून संबोधतात त्यांत निर्माण होणाऱ्या कलेचें स्वरूप बव्हंशीं असेंच दुर्बोध असण्याचें प्रमुख कारणही हेंच आहे. त्यांतील कलाकृति सर्वसामान्य रसिकाच्या दृष्टीनें निरर्थक व असुन्दर भासण्याचा संभव असतो. कारण त्या चित्रांतून कलावंताला जो भाव व्यक्त करावयाचा असतो त्याचें निदर्शन त्या चित्रांतून बऱ्याच वेळां अस्पष्ट आणि भ्रष्ट स्वरूपांत झालेलें दिसतें. अर्थात् चित्राच्या अर्थाचें आकलन न झाल्यामुळें तें केव्हांहि निरर्थकच वाटणार यांत नवल नाहीं. ज्या माध्यमांची प्रकटनाची शक्तीच मर्यादित, त्यांतून अगदीं पूर्णपणें वैयक्तिक अशा भावच्छटांचें केलेलें निदर्शन इतरांच्या दृष्टीनें दुर्बोधच रहाणार.

या साऱ्या विवेचनाचा रोख संगीत व काव्य हीं शिल्प व चित्र यांपेक्षां श्रेष्ठ आहेत असें ठरविण्याकडे मात्र मुळींच नाहीं. कारण या लेखांत लक्षांत घेतलेली कला ही आत्मनिवेदनपर आणि म्हणून व्यक्तिनिष्ठ अशी आहे. आणि आत्मप्रकटीकरण हा कलेचा महत्त्वाचा प्रकार ठरला तरी तो तिचा एकच एक प्रकार होऊं शकत नाहीं. कलेचा वस्तुनिष्ठ, वर्णनात्मक, आणि आलंकारिक (decorative) असा जो प्रकार आहे तो या लेखांत विचारांत घेतलेला नाहीं. तसेंच व्यक्तिनिष्ठता व वस्तुनिष्ठता यांच्या सीमेवर असलेल्या कलेचाहि यांत विचार केलेला नाहीं. त्यामुळें वरील सर्व विवेचन एका विवक्षित मर्यादेची जाणीव ठेवूनच केलें आहे. आणि म्हणून तें तेवढ्यापुरतेंच खरें मानावें लागेल.

---

## दानाचा व शीलाचा परमप्रकर्ष

बौद्ध धर्मांत सहा 'पारमिता' सांगितल्या आहेत. 'पारमिता' म्हणजे पारंगतता, कळसाला जाणें, पराकाष्ठा. दानपारमिता, शीलपारमिता, क्षान्तिपारमिता, वीर्यपारमिता, ध्यानपारमिता, आणि प्रज्ञापारमिता अशा सहा 'पारमिता' होत. त्यांपैकीं दोन-दान आणि शील-या खालीं दिल्या आहेत.

फलेन सह सर्वस्वत्यागचित्ते जनेऽखिले। 'दानपारमिता' प्रोक्ता तस्मात्सा चित्तमेवतु ॥१०॥

सर्व जनांस फलासहित सर्वस्वाचें दान करणारें चित्त, त्यालाच "दानपारमिता" म्हणतात. म्हणून ती (पारमिता) चित्तरूपीच आहे ( चित्ताबाहेर नाहीं. )

मत्स्यादयः क्व नीयन्तां मारयेयं यतो न तान्। लब्धे विरतिचित्ते तु 'शीलपारमिता'मता ॥११॥

मीं 'मत्स्यादि प्राणी मारूं नयेत' याकरितां त्यांस कोठें तरी लपवून ठेवावें कीं काय? परंतु माझें चित्त ( प्राणघातादि सर्व गर्हणीय कृत्यांपासून ) उपरत झालें म्हणजे तीच 'शीलपारमिता' समजावी.

—'शांतिदेवाचे बोधिचर्यावतार'—प्रा. कोसंबी 'धर्मचक्र' जानेवारी १९४९








प्रा. देवदत्त अ. दाभोलकर

# जागतिक अर्थकारणांतील प्रवाह

## महायुद्धापूर्वीचा आर्थिक संघर्ष

दुसऱ्या महायुद्धापूर्वी ग्रेट ब्रिटन, फ्रान्स, अमेरिका ( U. S. A. ), इटाली, जपान, जर्मनी व रशिया हींच मुख्यत्वेंकरून औद्योगिक दृष्ट्या प्रगत अशीं राष्ट्रें होतीं. जगांतील एकूण प्रदेशापैकीं शेंकडा ६७.५ क्षेत्रफळ यांच्या वर्चस्वाखालीं होतें. एकूण जागतिक आंतरराष्ट्रीय व्यापारांतील सुमारें शेंकडा पन्नास व्यापार यांच्या हातीं होता. एकूण जागतिक उत्पन्नापैकीं शेंकडा ६७ इतकें उत्पन्न यांच्या वांट्याला येत होतें व जगांतील निरनिराळ्या राष्ट्रांच्या तिजोरींतील एकूण सुवर्णनिधीपैकीं शेंकडा ७७ सुवर्ण यांच्या तिजोरींतून होतें. जगाच्या एकूण लोकसंख्येपैकीं शेंकडा २६ लोक या राष्ट्रांत राहात होते. या राष्ट्रांखेरीज इतरहि कांहीं शाही राष्ट्रें होतीं. अशीं राष्ट्रें म्हणजे हॉलंड, बेल्जम, पोर्तुगाल, स्पेन आदि होत. परंतु जगाच्या अर्थकारणांत या राष्ट्रांचें वा त्यांच्या साम्राज्याचें तौलनिक महत्त्व फारसें नव्हतें. वरील ग्रेट ब्रिटन आदि प्रगत राष्ट्रांतहि सर्वांचा सर्वांगीण विकास सारखाच झाला होता असें नाहीं. त्यांची तुलना लेखाच्या शेवटीं नं. १ च्या कोष्टकावरून स्पष्ट होईल.

तें कोष्टक पाहिल्यानंतर आणखीहि कांहीं गोष्टी ध्यानांत घेणें जरूर आहे, त्या अशा:

(१) रशियाखेरीज वरील इतर सर्व राष्ट्रांचा विकास भांडवलशाही पद्धतीनें होत होता. रशियाच्या वर्चस्वाखालील प्रदेशाचा आंकडा हा सर्वस्वीं प्रत्यक्ष रशियाच्या आकारमानाचा निदर्शक आहे. इतर सर्व राष्ट्रें भांडवलशाहीच्या विकासक्रमांत अपरिहार्यपणें येणाऱ्या साम्राज्यशाहीच्या टप्प्यापर्यंत आलीं होतीं; परंतु यांतहि अंतर्गत विकासासच खूप वाव असल्यामुळें अमेरिका राजकीय साम्राज्यशाहीच्या बाजूला वळली नाहीं व त्यामुळें तिचें साम्राज्य असें फारच लहान होतें. जर्मनीचें साम्राज्य पहिल्या महायुद्धानंतर पूर्णपणें हिरावून घेण्यांत आल्यामुळें जर्मनीचेंहि कांहीं साम्राज्य नव्हतें. इटली व जपान यांनीं आपलीं साम्राज्यें मुख्यत्वेंकरून १९३० नंतरच्या काळांतच मिळविलीं होतीं. इंग्लंड व फ्रान्स हीं मात्र सनातन शाही राष्ट्रें होतीं. या राष्ट्रांच्या मानानें त्यांच्या साम्राज्याचें महत्त्व या लेखाच्या शेवटीं दिलेल्या नं. २ च्या कोष्टकावरून दिसून येईल.

इटाली, जपान व जर्मनी हीं राष्ट्रें साम्राज्य कमविण्याच्या मार्गावर होतीं. साम्राज्यधन्य व साम्राज्यशून्य राष्ट्रांच्या या संघर्षांतच दुसऱ्या महायुद्धाचें बीज होतें.

( २ ) राजकीय साम्राज्यशाहीपासून फिलिपाइन्स बेटांखेरीज इतरत्र अमेरिका अलिप्त असली, तरी अमेरिकेचें आर्थिक वर्चस्व सर्वत्र वाढत होतें. पहिल्या महायुद्धापूर्वीं आंतरराष्ट्रीय भांडवलाच्या व्यवहारांत अमेरिका हें ऋणको राष्ट्र होतें. पहिल्या महायुद्धानंतर तें धनको बनलें व त्याच्या आर्थिक सत्तेची कमान उत्तरोत्तर चढतच राहिली.

( ३ ) दोन महायुद्धांतील मध्यंतरींच्या काळांत रशियाचा बाह्य जगाशीं तादृश कांहींहि आर्थिक संबंध राहिला नाहीं. आन्तरराष्ट्रीय आर्थिक संबंधाचे मुख्य मार्ग दोन– ( अ ) आन्तरराष्ट्रीय व्यापार व (ब) आन्तरराष्ट्रीय भांडवलाची गुंतवण. या दोन्हीहि गोष्टींपासून रशिया अलिप्त होता. इतर राष्ट्रांतील आर्थिक घडामोडींचे परिणाम त्यामुळें रशियावर होऊं शकले नाहींत. १९२९ ते १९३३ या कालांत सर्व जग महामंदीच्या तडाख्यांत सांपडलें असतां रशियाला त्या मंदीची झळ लागूं शकली नाहीं. रशियाच्या पंचवार्षिक योजनांचा कार्यक्रम












पुढें पुढें चालूच होता. १९२५ नंतर १९३९ पर्यंत-च्या काळांत रशियाचें राष्ट्रीय उत्पन्न पांच पटींनीं वाढलें असें रशियनांचें म्हणणें आहे व तें बहुतांशीं खरें असावयास हरकत नाहीं.

( ४ ) जगांतील अंकित राष्ट्रेंहि या महायुद्धाच्या मध्यंतरींच्या काळांत राजकीय दृष्ट्या अधिकाधिक जागृत व संघटित होऊं लागलीं होतीं. आपली आर्थिक व राजकीय अगतिकता त्यांना अधिका-धिक तीव्रतेनें जाणवूं लागली होती. विशेषतः आशिया खंडामध्यें शाही राष्ट्रांच्या अधिराज्याला प्रखर प्रतिकार होत होता.

## महायुद्धानंतरचे महत्त्वाचे बदल

अशा परिस्थितींत दुसरें जागतिक महायुद्ध सुरूं झालें. जर्मनी, जपान व इटाली यांनीं इतर राष्ट्रां-कडून साम्राज्यें हिसकावून घेण्यासाठीं केलेला तो प्रयत्न होता. दोस्त राष्ट्रांचा विजय झाला. परंतु पुन्हां युद्धपूर्वकालीन व्यवस्थेकडे जाणें मात्र सर्वस्वीं अशक्य होऊन बसलें. युद्धानें सर्व क्षेत्रांत घडवून आणलेली उलथापालथच इतकी भयंकर होती कीं जुन्या जगाची घडी पार विस्कटून गेली होती. ती पुन्हां पूर्ववत बसविणें कोणाच्याहि शक्तीबाहेरचें होतें. महायुद्धानें खालील महत्त्वाचे बदल घडवून आणलेः—

( १ ) जगाची उत्पादनशक्ति एकदम फारच घटली. विशेषतः युरोपमधील राष्ट्रांना हा आघात फारच मोठ्या प्रमाणांत बसला. युद्धाच्या पूर्वी सर्व राष्ट्रें १९२९ ते १९३३ च्या जागतिक मंदीच्या परिणामांतून बाहेर आलेलीं होतीं. १९२९ हें मानवर्ष धरलें ( १९२९ चें उत्पन्न १०० असें मानलें ) तर १९३७ मधील औद्योगिक उत्पन्नाचें प्रमाण निरनिराळ्या राष्ट्रांत पुढील प्रमाणांत होतें : ग्रेट ब्रिटन १२४, फ्रान्स ८२, अमेरिका १०३, इटाली १००, जपान १६९, जर्मनी ११७, रशिया २९२. युद्धकालांत मात्र एका अमेरिकेखेरीज इतर सर्व युध्य-मान राष्ट्रांचें उत्पन्न घटलें. १९३७ हें मानवर्ष धरलें तर १९४७ मध्यें वरील राष्ट्रांचें औद्योगिक उत्पन्न असें होतें : ग्रेट ब्रिटन १०९ (ग्रेट ब्रिटननें युद्धानंतरच्या काळांत आपलें उत्पादन सांवरलें), फ्रान्स ९५, अमेरिका १६५, इटाली (उपलब्ध नाहीं), जपान २४, जर्मनी ४४. रशियाचा आंकडा उप-लब्ध नाहीं. परंतु रशियाचेंहि उत्पन्न पुष्कळच घटलें असलें पाहिजे, हें उघड आहे.

युद्धामुळें झालेला विनाश व अव्यवस्था हींच अर्थात् या घटीच्या बुडाशीं होतीं. युद्धांत सुमारें एक कोटी सैनिक मृत्युमुखीं पडले असावेत असा अंदाज आहे. यांपैकीं सुमारें एक-तृतीयांश जर्मन व एक-तृतीयांश रशियन होते. इतर नागरिकहि सुमारें ८० लाख पर्यंत मारले गेले असावेत. यां-पैकीं दोन-तृतीयांशाहून अधिक लोक पोलंडमधील होते. प्रत्यक्ष मालमत्तेचा व उत्पादनाच्या साधनांचाहि नाश फारच भयंकर प्रमाणावर झाला. एकट्या रशियाचीच दहा हजार कोटी डॉलर्स किंमतीची मालमत्ता धुळीला मिळाली.

( २ ) युद्धाच्या पूर्वीच्या काळाच्या मानानें इंग्लंडची आर्थिक व इतर परिस्थिति फारच खालावली. युद्धकाळांत खर्च भागविण्यासाठीं आपलें परदेशांत गुंतविलेलें भांडवल इंग्लंडला विकावें वा गहाण टाकावें लागलें. हिंदुस्थानच्या स्टर्लिंग ठेवीसारख्या ठेवींच्या कर्जाचा इंग्लंडवरील बोजा वाढला व भांडवल गुंतविण्यासाठीं सोयीचें स्थान या दृष्टीनें असलेलें साम्राज्याचें महत्त्व कमी झालें. साम्राज्यांतील लोकहि राजकीय दृष्ट्या जागृत होऊन प्रखर प्रतिकार करूं लागल्यामुळें केवळ शस्त्रबळानें आपलें राज्य टिकवून धरणें इंग्लंडला खर्चाचें होऊं लागलें व व्यापारी दृष्ट्याहि हिताचें वाटेना. अशा परिस्थितींत 'सर्वनाशे समुत्पन्ने अर्धं त्यजति पण्डितः' या न्यायानें सत्ता गेली तर निदान सख्य तरी कायम राखावें व शक्य तों लाभ साधावा या हेतूनें इंग्लंडनें आपल्या साम्राज्यांतील हिंदुस्थान, ब्रह्मदेश आदि अंकित राष्ट्रें स्वतंत्र केलीं. जगांतील सर्वांत मोठ्या साम्राज्याच्या बहुतांश भागाचा असा साहजिक लय झाला.

( ३ ) अमेरिकेचें आर्थिक वर्चस्व अमर्याद वाढलें. इंग्लंडचें युद्धापूर्वीचें महत्त्व फारच कमी झाल्यामुळें अमेरिकेच्या तोंडीचें कोणतेंच भांडवलशाही राष्ट्र उरलें नाहीं. आपल्या ऋणांनीं जगाला बांधून टाकण्याचें धोरण अमेरिकेनें युद्धकालांत यशस्वी-



अनुक्रमणिका






पणें चालविलें. जुलै १९४० पासून जून १९४७ पर्यंत अमेरिकेनें खालील अर्थव्यवहार केले होते:

| | | |
|---|---|---|
| उधार–उसनवार मदत | ४९४० | कोटी डॉलर्स |
| कर्ज | ७३५ | ,, |
| UNRRA मधून दुःख-निवारण व पुनर्रचनेसाठीं | ६६० | ,, |
| इतर | ३८० | ,, |
| | ६७१५ | कोटी डॉलर्स |

याशिवाय मार्शल योजनेप्रमाणें युरोपला द्यावयाची मदत ती वेगळीच. या वर्षी (१९४८–४९) या योजनेप्रमाणें युरोपला मिळावयाची मदत ५३० कोटी डॉलर्सची आहे. ही मदत अर्थातच पश्चिम युरोपांतील अमेरिकेच्या पंखाखालील राष्ट्रांनाच केवळ मिळावयाची आहे.

(४) आजवर बाजूला पडलेला रशिया प्रामुख्यानें जागतिक राजकारणाच्या आघाडीवर आला. रशियन क्रान्तीनंतर कम्युनिस्ट पक्षामार्फत रशिया आपल्या राजकारणांत हस्तक्षेप करील अशी अनेक राष्ट्रांना भीति होती. परंतु असा प्रत्यक्ष प्रभावी भाग दुसऱ्या महायुद्धापूर्वी रशियानें घेतला नाहीं. स्पॅनिश क्रान्तियुद्धाच्या कालांत जर्मनी-इटालीशीं झालेल्या चकमकींत रशियाचें राजकारण अयशस्वी ठरलें. परंतु आतां यानंतर मात्र रशिया-कडे दुर्लक्ष करतां येण्यासारखें नाहीं. सध्यांच्या एकूण राजकीय अशांततेच्या व आर्थिक अनवस्थेच्या काळांत कम्युनिझम केव्हां, कोठें व कसा पसरेल हें सांगतां येत नाहीं. युरोप व आशिया हीं दोन्हींहि खंडें या दृष्टीनें कम्युनिस्ट आक्रमणाला सुलभ आहेत. याच आक्रमणाला पायबंद घालणें हें जागतिक भांडवलशाहीचें अमेरिकन नेतृत्वाखालीं आज एक महत्त्वाचें काम होऊन बसलें आहे.

(५) जगांतील दलित राष्ट्रेंहि आज स्वस्थ बसावयास कबूल नाहींत. आपल्या राष्ट्राला राज-कीय स्वातंत्र्य मिळावें व त्याचा आर्थिक अभ्युदय व्हावा ही मनीषा सर्व अंकित राष्ट्रांनीं बाळगली आहे. आशियांतील जागृतीचीं चिन्हें तर स्पष्टच आहेत. यापुढील जागतिक अर्थकारणांत या राष्ट्रांना अगदींच डावलून चालणार नाहीं; त्यांचें आर्थिक शोषण तर पूर्वीइतकें सुलभ रीतीनें यानंतर कधींच करतां येणार नाहीं ही गोष्ट आतां उघड झाली आहे. अप्रगत राष्ट्रांच्या औद्योगिक प्रगती-विषयींच्या इच्छेला योग्य तो मान देणें आज इंग्लंड-अमेरिकेला आवश्यक होऊन बसलें आहे. आंतरराष्ट्रीय व्यापारसंघटनेचीं (International Trade Organization) तत्त्वें ठरवितांना, मागा-सलेल्या राष्ट्रांना आपल्या औद्योगीकरणाला अनुरूप असें व्यापारी धोरण आंखण्याची मुभा असावी हें तत्त्व हिन्दुस्थान आदि राष्ट्रांच्या आग्रहावरून मान्य करण्यांत आलें.

अमेरिकेचें आर्थिक वर्चस्व, रशियाचा कम्युनिझमचा प्रचार, इंग्लंडची आपलें आसन स्थिर करण्यासाठीं चाललेली धडपड, युरोपच्या पुनर्घटनेसाठीं आंखलेल्या योजना व अंकित व अप्रगत राष्ट्रांची स्वातंत्र्याची व औद्योगिक अभिवृद्धीची इच्छा–याच आजच्या अर्थकारणांतील महत्त्वाच्या गोष्टी आहेत. या दृष्टीनें विचार करतांना रशिया इंग्लंड व अमेरिका यांची जगांतील आजची भूमिका समजावून घेतली कीं पुरेसें आहे.

## रशिया व पूर्व युरोप

दुसऱ्या महायुद्धांत रशियाच्या झालेल्या हानीचा उल्लेख वर आलेलाच आहे. त्याविषयीं कांहीं अधिक तपशीलहि देतां येईल. युद्धकालांत नाझींच्या आक्र-मणाखालीं आलेल्या रशियन भूप्रदेशांत रशियाच्या एकूण लोकसंख्येपैकीं शेंकडा ४० लोक राहात होते. औद्योगिक उत्पन्नापैकीं शेंकडा ३३ व शेतकी उत्पन्नापैकीं शेंकडा ४७ त्या भागांतून मिळत असे. युद्धकालांत कोळशाचें उत्पन्न ६० टक्क्यांनीं घटलें. ६० लक्ष घरांचा विध्वंस झाला व अडीच कोटी लोकांचा निवारा नाहींसा झाला.

अशा परिस्थितींत रशियानें पुनर्घटनेला सुरुवात केली. युद्ध संपतांच चौथी पंचवार्षिक योजना (१९४५–५०) आंखण्यांत आली. १९४० हें मानवर्ष धरलें तर १९५० मध्यें एकूण उत्पादन १४८ असावें अशी या योजनेची अपेक्षा आहे. ही अपेक्षा बहुतांशीं पूर्ण केली जाईल असाच आजचा रंग दिसतो. याखेरीज पूर्व युरोपांतील रशियाच्या कक्षेंत येणाऱ्या राष्ट्रांनींहि आपआपल्या योजना रशियन पद्धतीनुसार आंखल्या आहेत. शेतजमिनी



अनुक्रमणिका








ची फेरवाटणी व महत्त्वाच्या उद्योगधंद्यांचें राष्ट्रीयीकरण हा या योजनांतील महत्त्वाचा भाग आहे. रशियाइतकी नैसर्गिक समृद्धि नसल्यामुळें अर्थातच या राष्ट्रांना कांहीं वस्तू आंतरराष्ट्रीय व्यापारानें मिळवाव्या लागतील. अमेरिका–रशिया संघर्षामुळें पूर्व व पश्चिम युरोपांतील व्यापार कांहींसा आटला आहे. परंतु तरीहि रशियाच्या पाठबळावर हीं राष्ट्रें आपल्या योजना पार पाडूं शकतील असें दिसतें. अमेरिकेची आर्थिक मदत अर्थातच या राष्ट्रांना मिळत नाहीं. यापुढें या राष्ट्रांना आर्थिक मदत देऊन त्यांना रशियाच्या गटांतून फोडण्याचा प्रयत्न अमेरिका करील असें वाटतें. रशियाच्या कक्षेंतील अशीं राष्ट्रें म्हणजे आल्बानिया, बल्गेरिया, झेकोस्लाव्हाकिया, फिन्लंड, हंगेरी, पोलंड, रुमानिया व युगोस्लाव्हिया हीं होत. या राष्ट्रांतील योजनांची स्थिति खालील कोष्टकावरून समजून येईल. हीं सर्व राष्ट्रें शेतीप्रधान आहेत व युद्धकालांत त्यांना प्रत्यक्ष हानि बरीच सोसावी लागलेली होती, या गोष्टी मात्र लक्षांत ठेवणें जरूर आहे.

| राष्ट्र | योजना वर्षें | योजना खर्च कोटी डॉलर्स | योजनेच्या शेवटच्या वर्षी उत्पन्न (युद्धपूर्व उत्पन्न १००) |
|---|---|---|---|
| बल्गेरिया | २ | १९ | १६७ |
| झेकोस्लाव्हिया | २ | १४० | १०३ |
| हंगेरी | ३ | ५२ | १०१ |
| पोलंड | ४ | ३४० | ११६ |
| युगोस्लाव्हिया | ५ | ५५७ | १९३ |

अशा रीतीनें पूर्व युरोप व रशिया येथें कम्युनिस्ट नियोजनांच्या तत्त्वावर आर्थिक पुनर्रचना चालू आहे.

## इंग्लंडमधील ‘ समन्वयाचा ’ प्रयोग

इंग्लंडची आजची भूमिका कांहींशी गुंतागुंतीची आहे. १९३९ मध्यें इंग्लंडचें सुमारें ४०० कोटी पौंड भांडवल परदेशांत गुंतलेलें होतें. या भांडवलावरील व्याज व नफा हीं इंग्लंडच्या उत्पन्नाचीं महत्त्वाचीं साधनें होतीं. आपल्याला लागणाऱ्या आयातमालाची किंमत अर्थातच इंग्लंडला आपला माल निर्यात करून द्यावी लागते. निर्यात कमी पडल्यास तूट भरून काढण्यासाठीं परदेशीं गुंतविलेलें भांडवल विकणें भाग पडतें. युद्धापूर्वीचीं कांहीं वर्षें इंग्लंडला आंतरराष्ट्रीय देण्याघेण्याच्या तोंडमिळवणींत अशी वार्षिक सुमारें पांच कोटी पौंडांची तूट पडत असे. त्यामुळें वर्षाला सुमारें पांच कोटी या गतीनें इंग्लंडच्या परदेशीय भांडवलाच्या घटीला सुरुवात झालेलीच होती. परंतु या गतीनें इंग्लंडचें परदेशीय भांडवल संपुष्टांत यावयास पाऊणशें वर्षें तरी सहज लागलीं असतीं. महायुद्धाच्या अफाट खर्चानें हें सगळें भांडवल डोळ्यांदेखत नाहींसें झालें. त्यामुळें व्याज व नफा या रूपानें येणारें उत्पन्नहि थांबलें व तुटीच्या वेळेचा आधारहि पण तुटला. आतां आयातीची किंमत देण्यासाठीं निर्यात कशी व किती वाढवावी हा इंग्लंडला एक बिकट प्रश्न येऊन पडलेला आहे. मागासलेल्या राष्ट्रांची औद्योगिक प्रगति होत जाईल तसतसा हा प्रश्न अधिकाधिकच बिकट होत जाईल. कारण इंग्लंडची निर्यात मुख्यत्वेंकरून तयार झालेल्या मालाचीच आहे व इतर राष्ट्रांच्या औद्योगीकरणानंतर ही मागणी घटणें अर्थातच साहजिक आहे. युद्धोत्तर परिस्थितींत टिकाव धरावयाचा तर आपल्या आर्थिक व्यवस्थेंत महत्त्वाचे फेरबदल करणें इंग्लंडला अपरिहार्य आहे.

दुसऱ्याही एका दृष्टीनें इंग्लंडच्या अर्थकारणाकडे पाहणें आज अगत्याचें आहे. मजूर सरकार अधिकारावर आल्यानंतर लोकशाही समाजवादाच्या प्रयोगाला इंग्लंडमध्यें सुरुवात झाली. आजवर बँक ऑफ इंग्लंड, कोळशाच्या खाणी, वाहतुकीचीं साधनें, विद्युदुत्पादनाचा धंदा यांचें राष्ट्रीयीकरण झालें. परंतु या सर्व गोष्टींत राष्ट्रीयीकरणाच्या मार्गांतील अडथळे महत्त्वाचे असे नव्हते. कोळशाच्या खाणी व वाहतुकीचीं साधनें यांच्या बाबतींत तर उत्पादन-क्षमता वाढविण्याच्या दृष्टीनें राष्ट्रीयीकरण अपरिहार्यच होतें. या धंद्यांचें राष्ट्रीयीकरण भांडवलदारांना इतर धंदे चालवितांना उपकारकहि ठरेल. खरी कसोटी यापुढेंच यावयाची आहे लोखंड, पोलाद या धंद्यांच्या राष्ट्रीयीकरणाचा कार्यक्रम मजूर सरकारनें आतां उचलला आहे. ब्रिटिश



अनुक्रमणिका






भांडवलदार, कॉन्झर्वेटिव्ह पक्ष यांनीं आपला तीव्र विरोध सुरू केला आहे. अमेरिकेनेंहि आपला विरोध सूचित केलेला आहे. काय होतें तें दिसेलच. लोकशाही व समाजवाद यांचा समन्वय साधण्यांत इंग्लंड यशस्वी होतें काय हा खरोखरीच जगाच्या दृष्टीनें आज एक जिव्हाळ्याचा प्रश्न आहे.

तें कसेंहि असलें तरी आणखी कांहीं वर्षें तरी मदतीसाठीं इंग्लंडला अमेरिकेच्या दाराशीं गेलें पाहिजे हें निश्चित आहे. न जावें, तर इंग्लंडमधील राहाणीचें मान खूपच खालीं नेण्यावांचून गत्यंतर नाहीं. तेव्हां अमेरिकेच्या कांहीं अटी सांभाळून का होईना, परंतु मिळेल ती अमेरिकेची मदत घ्यावी असेंच आजचें इंग्लंडचें धोरण आहे. अशी मदत करण्यांत आज अमेरिकेचाहि स्वार्थ आहे. रशियाला विरोध हें अमेरिकन राजकारणाचें आजचें आदि-सूत्र आहे. तिसऱ्या महायुद्धाचा प्रसंग ओढवलाच तर रशियाविरुद्ध करावयाच्या चढाईसाठीं इंग्लंडचें महत्त्व किती आहे तें वेगळें स्पष्ट करावयास नको. कारण युरोपवरील रशियाच्या प्रत्यक्ष आक्रमणाच्या वेळीं इंग्लंडमधूनच प्रतिकाराची योजना करावी लागेल. १९४६ मध्यें अमेरिकेनें इंग्लंडला ३७५ कोटी डॉलर्सचें कर्ज दिलें. अमेरिकेनें इंग्लंडला दिलेल्या मदतीमुळें इंग्लंड कांहीं बिकट दिवस पार पाडूं शकलें व त्यामुळें मजूर-सरकारला लोकक्षोभ कांहींसा कमी सहन करावा लागला ही गोष्ट खरी आहे, यामुळेंच अमेरिकेनें आपला पैसा ओतून इंग्लंडमधील समाजवादी सरकारचें आसन मात्र स्थिर केलें अशी टीका करण्यांत येते. परंतु रशियन कम्युनिझमपेक्षां इंग्लंडचा नेमस्त समाजवाद अमेरिकेला हजारपटींनीं बरा वाटतो व इंग्लिश लोक तर किती तरी अधिक ओळखीचे व ऋणानुबंधाचे वाटतात. तेव्हां अशा मदतींत विशेष नवल असें कांहींच नाहीं व यापुढेंहि अशी मदत केली जाईल अशी अपेक्षा करावयास हरकत नाहीं.

## अमेरिकेचें आर्थिक अधिराज्य

अमेरिकेचें आर्थिक अधिराज्य ही रशियन कम्युनिझमच्या प्रसाराइतकीच युद्धोत्तर कालांतील सर्वश्रेष्ठ घटना आहे. जगाला लागणाऱ्या वस्तूंच्या पुरवठ्याचें मुख्य केंद्र आज तरी अमेरिका हेंच आहे व आणखी कांहीं वर्षें तरी या परिस्थितींत बदल होईल असें दिसत नाहीं. इंग्लंडला अमेरिकेची मदत हवी आहे; युरोपमधील राष्ट्रांचें पुनरुत्थान तर त्याच मदतीवर अवलंबून आहे. सर्व मागासलेलीं राष्ट्रेंहि आपल्या औद्योगीकरणाला यंत्रसामग्री मिळावी म्हणून अमेरिकेच्याच मुखाकडे आशेनें डोळे लावून बसलेलीं आहेत. अमेरिकेकडून मिळणाऱ्या मालाचा पुरेपूर परत मोबदला देण्याच्या परिस्थितींत एकहि राष्ट्र नाहीं. सर्वत्र आढळणारी डॉलर्सची चणचण ही याचेंच द्योतक आहे. अमेरिकेकडून मिळणारी देणगी वा कर्ज या भोंवतींच बहुतेक राष्ट्रांच्या आशा आज घोटाळत आहेत.

युद्धोत्तर कालांत आंतरराष्ट्रीय व्यापाराला चालना मिळावी, राष्ट्रांना आपलें उत्पादन वाढविण्यासाठीं मदत व्हावी व पुन्हां एकदा आर्थिक प्रगति सुरू व्हावी म्हणून आंतरराष्ट्रीय चलननिधि ( International Monetary Fund ) व आंतरराष्ट्रीय पतपेढी ( International Bank ) या दोन संस्था स्थापन करण्यांत आल्या. आंतरराष्ट्रीय चलननिधींतून आंतरराष्ट्रीय व्यापारासाठीं लागणारें चलन मिळणें कांहींसें अधिक सुकर केलें आहे. हुंडणावळीचे दर स्थिर नसले तर व्यापारास अडचण निर्माण होते. म्हणून तेहि या निधीमार्फत शक्य तितके स्थिर करावयाचे आहेत. आंतरराष्ट्रीय पतपेढीचें अधिकृत भांडवल १००० कोटी डॉलर्स आहे. सभासद राष्ट्रांना आर्थिक योजनांसाठीं स्वतः कर्जें देणें व आपल्या पतीवर दुसरीकडून मिळवून देणें हें या संस्थेचें कार्य आहे. या दोनहि संस्था अमेरिकन मदतीवरच मुख्यत्वेंकरून उभ्या आहेत व त्यांच्या घटनेंत व कार्यांत अमेरिकेचें वर्चस्व स्पष्टपणें दिसून येतें.

जगाचें अर्थकारण आज अमेरिकेवर अवलंबून आहे. व अमेरिकेचें धोरण रशियन राजकारणानुसार बदलत आहे. कम्युनिझमच्या प्रसाराची भीति असेल तेथें तेथें अमेरिका पैसा खर्च करावयास तयार आहे. कम्युनिझमला विरोध ही अमेरिकन आर्थिक साहाय्याची मुख्य अट आहे. पश्चिम युरोपांतील सोळा राष्ट्रांना मार्शल योजनेप्रमाणें जवळ जवळ दान












म्हणून अपरंपार मदत करावयास अमेरिका तयार आहे. पूर्व यूरोपांतील राष्ट्रांनाही, तीं रशियन गटांतून फुटत असतील तर, अशी मदत मिळेल. आन्तरराष्ट्रीय पतपेढींतून कर्जें देतांनाहि याच कम्युनिझम्-विरोधाच्या निकषावर पक्षपात करण्यांत आला. मागासलेल्या राष्ट्रांनाहि अमेरिकेची मदत मिळवावयाची असेल तर त्यांनीं तिची राजकीय मतप्रणाली स्विकारली पाहिजे व आर्थिक वर्चस्व मान्य करावयास पाहिजे. मागासलेलीं राष्ट्रें कदाचित् हेंहि मान्य करतील. परंतु अमेरिकेचें आर्थिक धोरण नेहमीं विवेकानें व जगहिताच्या दृष्टीनें आंखलें जाईल असा निर्वाळा मात्र अमेरिकेनें दिला पाहिजे; नाहीं तर अभ्युदयासाठीं आज अमेरिकेचें आर्थिक वर्चस्व पत्करावयाचें व अमेरिकेंत १९२९–३० प्रमाणें मंदी आली कीं आपणहि तिच्याबरोबर त्या भोंवऱ्यांत सांपडावयाचें अशी जगाची अनुकंपनीय स्थिति होऊन जाईल. या स्थितीपासून अमेरिकेचाहि अंतिम फायदा नाहीं; परंतु हें तिला उमगेल तर ना!

(९–१२–४८)

कोष्टक नं. १ (पान ५३० पहा)

## राष्ट्रांचा आर्थिक विकास

| राष्ट्र | वर्चस्वाखालील प्रदेश | आयात व्यापार | निर्यात व्यापार | उत्पन्न | सरकारकडील सुवर्णनिधि | परदेशीं गुंतविलेलें भांडवल | माणशीं उत्पन्न |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | (आंकडे जागतिक शेंकडेवारीचे आहेत) | | | | | (कोटी पौंड) | (पौंडांमध्यें) |
| ग्रेट ब्रिटन | ३३ | १९ | १२ | ८ | ११ | ३७० | ५६ |
| फ्रांस | ८ | ६ | ४ | ६ | १४ | ७३ | ३६ |
| अमेरिका (U.S.A.) | ७ | ११ | १३ | ३३ | ४७ | २६० | ११३ |
| इटाली | ३ | २ | २ | २ | – | * | २१ |
| जपान | २ | ४ | ३·६ | ३ | २ | २० | १३ |
| जर्मनी | ·५ | ८ | ९ | ७ | – | २३ | ३९ |
| रशिया | १४ | – | – | ८ | ३ | – | ३६ |

* निश्चित आंकडा उपलब्ध नाहीं. परंतु आठ कोटी पौंडांहून कमी.
सर्व आंकडे १९३६ किंवा नजीकच्या वर्षांतील आहेत.

कोष्टक नं. २ (पान ५३० पहा)

## साम्राज्य–विभागणी. मार्च १९३८

| राष्ट्र | राष्ट्राचा विस्तार लक्ष चौरस मैल | राष्ट्राची लोकसंख्या कोटी | साम्राज्यविस्तार | साम्राज्य लोकसंख्या |
|---|---|---|---|---|
| | | | यात शाही राष्ट्राचाही समावेश होतो. | |
| ग्रेट ब्रिटन | ·९४ | ४·७ | १८० | ५१·८ |
| फ्रान्स | २·१ | ४·२ | ४८ | ११ |
| इटली | १·१ | ४·२ | १४·७ | ५·१ |
| जपान | १·५ | ६·९ | १० | २०·५ |

(लष्करी वर्चस्वाखालील मुलुखासह)








प्रा. म. अ. मेहेंदळे

# शाकुंतलांतील प्रतीक : भ्रमर

'नवभारता'च्या सेप्टेंबर १९४८ च्या अंकांत शाकुंतलांतील मृगप्रतीकाबद्दल लिहितांना प्रस्तुत लेखकानें असें दाखवण्याचा प्रयत्न केला आहे कीं कालिदासाला राजाच्या स्त्रींविषयक अस्थिर वृत्तीची जाणीव आपणांस वरवर वाटते त्यापेक्षां पुष्कळच होती. दुष्यंतानें शकुंतलेच्या जो कांहीं कालपर्यंत त्याग केला, त्याचें समर्थन करण्यासाठीं त्यानें दुर्वास मुनीच्या शापाचा प्रसंग आणून राजा शकुंतलेला फक्त कांहीं काळ विसरला असें दाखवण्यांत यश मिळविलें खरें. पण तेवढ्यानें कालिदासाचें स्वतःचें समाधान झालें व दुष्यंतानें शकुंतलेचा खरोखरी त्यागच केला होता ही गोष्ट तो विसरला, असें मात्र होत नाहीं. दुर्वासाच्या शाप नसता तरी राजा शकुंतलेला विसरून जाण्याची केवढी तरी मोठी शक्यता होती. आणि ह्या दुःखांतून तिला वांचविण्यासाठींच त्यानें नाटकाच्या सुरुवातीला मृगप्रतीकाचा उपयोग करून राजाच्या मनांत अरण्यमृग व आश्रममृग ह्यांच्या रूपानें कोठलीहि नागरकन्या व शकुंतला यांच्यांतील फरक ठसाविण्याची चातुर्यानें योजना केली. वैखानस ज्या वेळीं नाटकाच्या सुरुवातीलाच राजाला सांगतो कीं 'हा आश्रममृग असल्यानें तूं याला मारूं नयेस,' त्याच वेळीं कालिदास त्याला बजावीत असतो कीं 'शकुंतला ही आश्रमकन्यका असल्यानें तिच्याशीं तूं अस्थिर प्रेमाचा प्राणघातक खेळ खेळूं नकोस.'!

## राजासाठीं भ्रमराचें प्रतीक

हेंच मृगप्रतीक प्रेक्षकांच्या डोळ्यांत अधिक ठळकपणें भरावें म्हणून कालिदासानें भ्रमरप्रतीकाचा उपयोग केला आहे. मृगाच्या प्रतीकाचा उपयोग ज्याप्रमाणें शकुंतलेसाठीं केला त्याचप्रमाणें भ्रमराच्या प्रतीकाचा उपयोग राजासाठीं केला आहे. ह्या प्रतीकामुळें राजाचें मन भ्रमरासारखेंच अस्थिर असल्याचें प्रेक्षकांच्या सहजपणें नजरेस येतें.) कालिदास हा एक दरबारी कवि असल्यामुळें त्याला नाटकांत राजे लोकांविषयीं लिहितांना कांहीं संयम पाळावा लागत असणें शक्य आहे. त्यामुळें उघडपणें त्याला दुष्यंतावर भ्रमरवृत्तीचा आरोप ठेवून त्याच्या चंचल वृत्तीबद्दल दोष देतां येणें शक्य नव्हतें. तथापि वस्तुस्थिति मात्र अशी होती कीं ज्याप्रमाणें भ्रमर हा सारखा मधुपान करीत एका फुलावरून दुसऱ्या फुलावर उडत असतो त्याप्रमाणें राजा देखील नित्य नवनवीन स्त्रियांवर अनुग्रह करीत असे. शाकुंतल नाटकांत अंतीं असें सुचविलें आहे कीं, शकुंतलेशीं पुनर्भेट झाल्यावर राजाची ही नावीन्याविषयींची ओढ थांबली; कारण कीं तत्पूर्वीच्या विरहावस्थेंत त्याच्या शारीरिक प्रेमाची उच्च अशा दिव्य प्रेमांत परिणति झाली होती. तथापि, दुष्यंताच्या पूर्वीच्या जीवनांतील अस्थिरपणाचें निमित्त करून कालिदासानें सर्वच राजेलोकांची त्यांच्या प्रेमाच्या बाबतींतील थिल्लरपणाबद्दल सहाव्या अंकांत थोडी कानउघाडणी केली आहे. अर्थात् हें त्यानें उघड उघड केलेलें नसून त्यासाठींच त्यानें नाटकांत भ्रमरप्रतीकाचा उपयोग केला आहे.

## राजाची भ्रमरवृत्ति सुचविणारे प्रसंग

पहिल्याच अंकांत राजाच्या नजरेस शकुंतला पडल्यानंतर कांहीं वेळानें एक भुंगा तिला त्रास देऊं लागतो. शकुंतला वृक्षादिकांना पाणी घालण्याचें काम तिच्या सख्यांसह करीत असतां एका फुलावर स्वस्थ बसलेला भ्रमर पाण्याच्या सिंचनानें तेथून उडून शकुंतलेच्या तोंडाभोंवतीं घिरट्या घालूं लागतो,








ह्यामुळें घाबरून जाऊन शकुंतला तेथून दूर सरकते; पण तो भ्रमर कांहीं तिला सोडीत नाहीं. मधूनच तो शकुंतलेच्या डोळ्याला जवळ जवळ स्पर्श करी, तर मधूनच कांहीं गोड गुपित सांगणाऱ्या मित्राप्रमाणें तो तिच्या कानाजवळ गुंजन करी. हातानें ती त्याला बाजूस सारण्याचा कसून प्रयत्न करीत असतांना सुद्धां त्या पठ्यानें एकदां तिच्या अधरालाहि स्पर्श केला! ह्या सर्व गोष्टींमुळें शकुंतलेची अगदीं गोंधळल्यासारखी स्थिति झाली आणि ती गंमत तिच्या सख्या व राजा दुष्यंत मोठ्या खोडकरपणें पाहात होते. पण शकुंतलेच्या प्रेमांत राजा आधींच पडला असल्यामुळें त्याला थोड्याच वेळांत त्या भुंग्याबद्दल हेवा वाटूं लागतो. उघड उघड दिसणाऱ्या अडचणी जर त्या वेळीं राजाच्या मार्गांत नसत्या तर त्या भुंग्याचें अनुकरण करण्याची राजाची खूप इच्छा असावी असें वाटण्याइतकें तन्मयतेनें राजानें भुंग्याचें वर्णन केलें आहे. ह्यानंतर थोड्याच वेळानें ह्या भ्रमरबाधेचें निमित्त होऊन राजा शकुंतलेसमोर प्रकट होतो. ही घटना पुस्तकांत वाचण्यापेक्षां जेव्हां रंगभूमीवर प्रत्यक्ष दृष्टीस पडत असेल तेव्हां शकुंतलेशीं लगट करणाऱ्या एका भुंग्याचें तेथून उडून दूर जाणें व त्याच वेळेस त्याच्या ऐवजीं राजानें तेथें पुढें सरसावणें ह्यांतील राजाचें भ्रमरस्वरूप प्रेक्षकांच्या मनांत आल्याशिवाय राहाणार नाहीं.

ह्याहूनहि अधिक स्पष्ट असा प्रसंग तिसऱ्या अंकांत आला आहे. तेथें राजानें स्वतःच्या तोंडानेंच स्वतःची भ्रमराशीं तुलना केली आहे. पहिल्या अंकांतील प्रसंगामुळें राजाच्या भ्रमराशीं वृत्तिसाम्याविषयीं जी एक कल्पना प्रेक्षकांच्या मनांत पुसटपणें येऊन गेली होती, तिला अधिक उठाव ह्या उपमेनें आणला आहे. दुष्यंत व शकुंतला या दोघांनीं परस्परांवरील प्रेम स्पष्ट शब्दांत व्यक्त केल्यावर अनसूया व प्रियंवदा त्यांचें अभिनंदन करतात. नंतर त्या सख्या एक सबब काढून तेथून दूर होतात व दुष्यंत व शकुंतला अगदीं एकटीं अशीं प्रथमच रंगभूमीवर येतात. दुष्यंत, शकुंतलेनें गांधर्वविवाहास अनुकूल व्हावें म्हणून, तिला विनवितो व पुढच्याच क्षणीं तिला आलिंगन देण्याचा प्रयत्न करतो. त्या वेळीं त्याच्या हातून सुटण्याची धडपड करीत असतां आपल्याला तेथून जाऊं देण्याविषयीं शकुंतला राजाला विनंति करते. आणि त्याच वेळेस राजा आपलें खरें स्वरूप तिच्यापुढें प्रगट करतो. भ्रमरानें पहिल्या अंकांत शकुंतलेशीं केलेली लगट पाहिल्यापासून राजाच्या मनांत ज्या इच्छा निर्माण झालेल्या असतात त्या सर्व पूर्ण करण्याच्या तो तयारींत असतो. शकुंतलेला तो स्पष्टच सांगतो कीं एकाद्या भ्रमरानें ज्याप्रमाणें अगदीं ताज्या फुलांतील रस चाखावा त्याप्रमाणें तुझ्या ह्या अधरांतील रसपान केल्यावर मगच मी तुला येथून जाऊं देईन. पहिल्या अंकांत प्रथम भ्रमराला पुढें आणून कालिदासानें ज्या भावी गोष्टीबद्दल सूचन केलें आहे त्याच गोष्टी आतां राजाच्या बाबतींत प्रत्यक्षपणें घडत असलेल्या प्रेक्षकांच्या नजरेस येतात.

पांचव्या अंकाच्या सुरुवातीच्या श्लोकांत तर दुष्यंताच्या चंचल मनोवृत्तीचें अगदीं उघड उघड दर्शन घडतें. राजाची हंसपदिका नांवाची राणी त्या श्लोकांत मोठ्या कौशल्यानें भ्रमरप्रतीकाचा उपयोग करून राजाला त्याच्या स्वैर वृत्तीबद्दल दोष देते. पहिल्या व तिसऱ्या अंकांत जेथें भ्रमरप्रतीकाचा उपयोग केल्याचें वर दाखविलें आहे, तेथें राजाचें भ्रमराशीं फक्त साम्य सूचित केलें आहे अगर स्पष्ट शब्दांत सांगितलें आहे. पण हंसपदिकेच्या श्लोकांत तर नाटककारानें एक पाऊल पुढें टाकून राजाचें भ्रमराशीं जवळ जवळ ऐक्यच दाखविलें आहे. हंसपदिका ही एके काळीं राजाची मोठी आवडती राणी होती; पण आतां राजाचें मन वसुमतीवर बसल्यामुळें ती त्याची नावडती झाली होती. अगदीं सहजासहजीं राजानें तिला दुर्लक्षिली होती. राजाच्या वृत्तींतील ह्या फरकाला उद्देशून हंसपदिका आपल्या गाण्यांत म्हणते: "हे भ्रमरा, तुला नित्य नवीन रस चाखण्यास आवडतो. मागें तूं आम्रमंजरीचा आस्वाद किती तन्मयतेनें घेत होतास, पण आतां तिला तूं सपशेल विसरला आहेस. कारण आतां तुला कमळांत राहणें आवडूं लागलें आहे!" शकुंतला तपोवनांतून दुष्यंताकडे यावयास निघाल्यावर लगेच हा श्लोक प्रेक्षकांच्या कानीं पडत असल्यामुळें शकुंतलेच्या भावी स्थितीवर व राजवाड्यांतील स्त्रियांच्या जीवनावर हा श्लोक केवढा








विदारक प्रकाश टाकतो! राजाच्या भ्रमरवृत्तीबद्दल हा श्लोक ऐकल्यानंतर कोणाच्याहि मनांत शंका राहणें शक्य नाहीं.

दुष्यंताचें भ्रमराशीं असलेलें साम्य प्रेक्षकांच्या मनांत भरावें असा कालिदासाचा विशिष्ट हेतु असावा असें वाटतें. कारण ज्या अंकांत दुष्यंतानें शकुंतलेचा त्याग केला आहे त्याच ह्या पांचव्या अंकांत फिरून एकवार नाटककारानें अशा प्रसंगाची योजना केली आहे कीं जेथें राजा स्वतःची तुलना भ्रमराशीं करतो. नाटकांत दाखविल्याप्रमाणें दुर्वासाच्या शापामुळें राजाला शकुंतलेचा पूर्णपणें विसर पडलेला असतो. अशा वेळीं गौतमी विचारी निरनिराळे प्रयत्न करून राजाची स्मृति जागविण्याचा प्रयत्न करते. ह्यांपैकीं एक प्रयत्न म्हणजे राजधानींत येतांना शकुंतलेनें जें अवगुंठन डोक्यावर घेतलेलें असतें तें दूर करणें. तिला असें वाटतें कीं, 'शकुंतला' ह्या नांवानें जरी राजाला आश्रमवृत्तान्त कदाचित् आठवला नाहीं तरी तिला प्रत्यक्ष पाहिल्यावर तरी त्याला मागील गोष्टी आठवतील; पण शापाच्या प्रभावामुळें अर्थातच तसें कांहींच घडत नाहीं. उलट राजा शकुंतलेचें तें उत्कृष्ट रूप पाहून मनाशीं म्हणतो, "या अत्यंत सुंदर मुलीशीं पूर्वी मीं लग्न केलें होतें कीं नाहीं ह्याचा कांहींच निश्चय करतां येत नाहीं. त्यामुळें माझी स्थिति प्रातःकालीं कुंदाच्या फुलाभोंवतीं घिरट्या घालणाऱ्या भ्रमरासारखी झाली आहे. त्या फुलांत त्या वेळीं दवबिंदु असल्यामुळें ज्याप्रमाणें तो भ्रमर त्या फुलांतील रस एकदम चाखूंहि शकत नाहीं अगर तें टाकून दुसरीकडे जाऊंहि शकत नाहीं, त्याचप्रमाणें माझ्या मनांतील संशयामुळें ह्या शकुंतलेचा एकदम मला स्वीकारहि करतां येत नाहीं किंवा एकदम त्यागहि करतां येत नाहीं!"

## शकुन्तलेचें पुष्पाशीं किंवा लतेशीं साम्य

वर दर्शविलेल्या भ्रमरप्रतीकाला अधिक उठाव यावा व तो प्रेक्षकांच्या मनांत नीट ठसावा म्हणून कालिदासानें शकुंतलेची वरील श्लोकांतल्याप्रमाणें ठिकठिकाणीं पुष्पांशीं किंवा लतेशीं तुलना केली आहे. कदाचित् ही तुलना कालिदासानें अगदीं सहजहि केली असेल. कारण सुंदर स्त्रीला निरनिराळ्या फुलांची उपमा देणें हा तत्कालीन कविसंकेतच होता आणि म्हणून अशा तुलना इतर कवींच्या काव्यांतहि आढळतात. ह्या दृष्टीनें कालिदासानें दर्शविलेल्या शकुंतला व पुष्प यांमधील साम्याचा भ्रमरप्रतीकाशीं संबंध नसेलहि. पण नाटककाराचा राजाचें भ्रमराशीं असलेलें साम्य किंवा जवळ जवळ ऐक्य दर्शविण्यांत जो विशिष्ट हेतु असल्यासारखा वाटतो तो ध्यानांत घेतला म्हणजे मग शकुंतला व फूल यांतील साधर्म्यांतहि एक विशेष मौज वाटते. शकुंतला व एखादें फूल यांतील साम्य दर्शविणारीं अगदीं चटकन् हाताशीं येणारीं कांहीं उदाहरणें द्यावयाचीं झालीं तरी तीं पुढीलप्रमाणें देतां येतील: वल्कलें परिधान केलेली शकुंतला राजाच्या दृष्टीला पिवळसर फिकट पानें भोंवतीं असलेल्या एकाद्या फुलासारखी प्रथम वाटते; आणखी थोडें पुढें दुष्यंत म्हणतो— 'ह्या शकुंतलेचा अधरोष्ठ कोंवळ्या पानासारखा लाल आहे, हिचे बाहू लतेच्या कोमल शाखेप्रमाणें वाटतात, आणि हिच्या सर्वांगावर खुलणारें यौवन लतेवरील कुसुमाप्रमाणें भासतें.'. दुसऱ्या अंकांत शकुंतलेच्या जन्मकथेला उद्देशून अर्क वृक्षावर पडलेल्या नवमालिकेच्या फुलाची उपमा राजा तिला देतो, तिसऱ्या अंकांत मदनबाधेनें वाळलेली शकुंतला राजाला, जिचीं वाऱ्यानें पानें वाळून गेलीं आहेत, अशा माधवी लतेसारखी वाटते. शकुंतला केवळ ह्या निरनिराळ्या लता–कुसुमांसारखी दिसते इतकेंच नव्हे तर तिनें वनज्योत्स्ना नांवाच्या लतेशीं भगिनीस्नेहहि जोडलेला असतो. ह्या साधर्म्यामुळें शाकुंतलांत केवळ काव्यच नव्हे तर उत्कृष्ट नाट्यहि निर्माण होतें. निरनिराळ्या निसर्गवस्तूंच्या वर्णनामुळें नाटकांत फक्त वर्णवैचित्र्यच निर्माण होतें असें नव्हे, तर त्यापासून एक गूढार्थहि निर्माण होतो. हीं सारीं वर्णनें असें दाखवितात: ह्या नाटकांत एक भुंगा एका फुलाच्या मागें त्याला 'नको नको' म्हटलें असतांहि सारखा लागला आहे!

## भ्रमर-प्रतीकद्वारा राजाची कानउघाडणी

वरील उदाहरणावरून आतां हें स्पष्ट होईल कीं कालिदासानें शाकुंतल नाटकांत भ्रमर–प्रतीकाचा उपयोग करून दुष्यंताच्या प्रणयांतील चंचलपणा



अनुक्रमणिका






प्रेक्षकांच्या नजरेस आणला आहे. परंतु तो केवळ एवढेंच करून थांबला नाहीं तर सहाव्या अंकांत त्यानें एका पात्राच्या द्वारें ह्या अस्थिरपणाबद्दल त्याला चांगला टोमणा मारला आहे. ह्या अंकांतील हा प्रसंग मोठा कौशल्यपूर्ण आहे व त्यामुळें कालिदासाच्या श्रेष्ठ अशा नाट्यगुणांचा प्रत्यय येतो. प्रस्तुत प्रसंगीं राजा व त्याचा मित्र विदूषक राजानें स्वतः काढलेल्या शकुंतलेच्या चित्राचें निरीक्षण करीत असतात. कांहीं वेळानें विदूषकाच्या लक्षांत येतें कीं एक कुसुमरसलोलुप असा भ्रमर शकुंतलेच्या मुखाकडे झेंप घेत आहे. त्यावरून हें लक्षांत येईल कीं त्या चित्रांत दाखविलेला प्रसंग वर उल्लेखिलेला पहिल्या अंकांतील भ्रमरबाधेचा होता. विदूषकाला व त्याच्याचबरोबर राजालाहि क्षणभर त्यांच्यासमोर चाललेल्या गोष्टी खऱ्या नसून चित्रांतल्या आहेत, ह्याचा विसर पडतो. म्हणून विदूषकानें राजाला त्या भुंग्याचें निवारण करण्यास सांगितलें असतां तो त्या भुंग्याला मोठी आर्जवून विनंति करतो : "हे मधुकरा, ही येथें एक तुझ्यावर अनुरक्त असलेली मधुकरी फुलावर बसून सारखी तुझी वाट पाहात आहे. तिला अत्यंत तहान लागलेली असूनहि ती तुझ्याशिवाय त्या फुलांतील रस पीत नाहीं. तर त्या मधुकरीकडे जायचें सोडून तूं ह्या शकुंतलेच्या मुखामागें धांवण्याचे कां श्रम घेतोस ?" दुष्यंताला स्वतःलाच त्या पहिल्या अंकांतील भुंग्याचें अनुकरण करावेसें वाटलें होतें ही गोष्ट आणि तेथपासून भ्रमरप्रतीकाचा उपयोग करून राजा व भ्रमर यांतील अत्यंत साम्य नाटककारानें दाखविलें आहे ही गोष्ट-ह्या दोन्ही ध्यानांत घेतल्या तर राजाचे हे उद्गार जितके भ्रमराला तितकेच ते त्याला स्वतःला देखील लागू पडतात हें चटकन् लक्षांत येईल. राजानें तरी राजवाड्यांतील त्याच्यावर अनुरक्त असलेल्या स्त्रियांना सोडून शकुंतलेसारख्या एका भोळ्या आश्रमकन्येच्या मागें कां लागावें ? चित्रांतील मधुकरीप्रमाणें हंसपदिका नांवाची एक राणी राजाच्या विरहामुळें व्याकुळ होऊन त्याची सारखी वाट पाहात असल्याचें आपण पाहिलेंच आहे. मग राजा तरी तिच्याकडे कोठें जात आहे ? उलट शकुंतलेला पाहिल्याबरोबर तो सर्वांनाच विसरला आहे, आणि हा भुंगाहि तेंच करीत आहे. पण राजाची ही विनंति ऐकूनहि जेव्हां भुंगा तेथून हालत नाहीं तेव्हां विदूषकाच्या मुखानें नाटककार भुंग्यावर व पर्यायानें राजावरहि खरमरीत टीकेचा एकच प्रहार करतो. विदूषक म्हणतो कीं "ही भुंग्याची जात (आणि राजांचीहि) जात्याच मोठी बांकडी (वाम)! त्यांचा निषेध केला तरी ते आपला हट्ट सोडायचे नाहींत !"

एका दरबारी कवीच्या तोंडून राजाला दोष देण्याच्या बाबतींत ह्यापेक्षां जास्त स्पष्ट शब्दांची अपेक्षा करणें चूक होईल. शाकुंतलांत कालिदासाचा प्रधान हेतु जरी राजाच्या प्रेमाला उच्च कोटीला नेण्याचा होता, आणि तो त्यानें मोठ्या कौशल्यानें तडीस नेलाहि आहे, तरी राजेलोकांच्या प्रणयांतील धांवरेपणा त्याच्या मनांत जाचत असावा असें वाटतें. आणि म्हणूनच ठिकठिकाणीं राजाचें भ्रमराशीं साम्य दाखवून त्यानें तो व्यक्तहि केला आहे. आणि अखेरीस त्याच्या हट्टीपणाबद्दल थोडी कानउघाडणीहि केली आहे. मागील लेखांत दाखविल्याप्रमाणें नाटककारानें मृगप्रतीकाचा उपयोग करून वैखानसाच्या मुखानें राजाला असें बजाविण्याचा प्रयत्न केला आहे कीं शकुंतलेशीं व्यवहार करतांना त्यानें कोणतीहि शहरांतील स्त्री आणि एक आश्रमकन्यका यांतील फरक विसरूं नये. आणि प्रस्तुत लेखांत दाखविल्याप्रमाणें भ्रमर-प्रतीकाच्या द्वारें राजा स्वतःच स्वतःला उपदेश करीत आहे कीं घरीं एक स्त्री वाट पाहात बसली असतां बाहेर दुसरीच्या मागें धांवणें गैर आहे. ह्याप्रमाणें ह्या दोन्ही प्रतीकांचा अत्यंत निकट असा संबंध आहे आणि तो ध्यानांत घेतला म्हणजे असें दिसून येईल कीं दृश्य आणि व्यक्त शाकुंतलाइतकेंच ह्या कल्पनागम्य प्रतीकसंयोगांतहि एक प्रकारचें उत्कृष्ट नाट्य भरलेलें आहे.








प्रा. द. रा. बेन्द्रे

# भगवद्गीतेंतील पुरुषोत्तमयोग आणि डॉ. तुळपुळे

'पुरुष एवेदं सर्वम्'
'सर्वं खल्विदं ब्रह्म'
'वासुदेवः सर्वम्'

गीतेंतील पुरुषोत्तमयोग त्यांतीलच क्षराक्षर-विचाराचा पूरक आहे, अथवा पुरुषोत्तमतत्त्व क्षराक्षर–विवेकानें स्पष्ट केलें जातें हें गीताभक्तांना सांगणें फार अवश्य नाहीं. पण आज जवळ जवळ पंधरा वर्षांपूर्वी प्रसिद्ध झालेल्या 'महाराष्ट्रीय अनुभववाद' या पुस्तकांत पूज्य डॉ. रानडे म्हणतातः "It is somewhat hard to understand in what sense the Transcendent Being could be distinguished from the Immutable" p. 54 "पुरुषोत्तम हा अक्षराहून कसा निराळा आहे हें कळणें जरा कठिण आहे." अर्थात् हें त्यांचें म्हणणें त्यांच्या विद्याविनयाला केव्हांहि भूषणावहच आहे. गीताप्रेमी लोक त्यांच्यासारख्या अनुभवी विद्वानांकडून त्या विषयाची फोड होईल या आशेनेंहि होते, हें सांगणें नलगे. परंतु परवां नुकत्याच 'अध्यात्मविद्यामंदिरा'च्या पुरस्कारानें प्रसिद्ध झालेल्या डॉ. शं. गो. तुळपुळे यांच्या 'पांच संत कवी' या ग्रंथाच्या प्रस्तावनेंत श्री. डॉ. रानडे यांनीं "क्षराक्षर-विचाराची मांडणी मूळ भगवद्गीतेंत व म्हणून ज्ञानेश्वरींतहि **किंचित्**[1] सदोष कशी आहे यासंबंधींचें प्रस्तुत ग्रंथांतील विवेचन गीताभक्तांनीं पाहण्यासारखें आहे" असें म्हणून ग्रंथलेखकाच्या बुद्धिमत्तेची व व्यासंगाची पाठ थोपटली आहे. याच विषयाशीं आंतरिकतेनें संबद्ध असा दुसरा एक विचार, म्हणजे 'स्फूर्तिवादाचा मायावादाशीं समन्वय'–म्हणजेच अनुभवामृत–ज्ञानेश्वरीचाच समन्वय म्हणा पाहिजे तर–याच ग्रंथांत कसा 'मूलगामी विवेचना'चा आहे याबद्दलहि प्रस्तावनाकार विद्वानांचें लक्ष मुद्दाम वेधूं इच्छीत आहेत. सांप्रत या लेखांत पुरुषोत्तमयोगाच्या अनुरोधानें क्षराक्षर–विचार सदोष आहे का आणि असल्यास तो दोष कुठें आहे याचा विशेषतः विचार करणें प्राप्त होतें.

डॉ. तुळपुळे म्हणतात — 'क्षराक्षर–विवेकावरील त्यांचें (ज्ञानदेवांचें) व्याख्यान मोठें उद्बोधक आहे, तरी पण त्यांत थोडी विसंगति दडली असल्यानें त्याचा विचार येथें सविस्तरपणें होणें अवश्य आहे' (पृ. ३९); असें सांगून जवळ जवळ बत्तीस ओळींच्या विस्तारानें[2] ज्ञानदेवांचा या विषयाचा विचार 'क्लिष्ट व गुंतागुंतीचा' असला तरी त्यांनीं 'शक्य तेवढ्या स्पष्टपणें व सुसंगतपणें मांडून दाखविण्याचा प्रयत्न केला आहे'––अर्थात् त्यांनीं ज्ञानदेवावरील आपल्या भयभक्तीमुळें ज्ञानदेवांना क्लिष्टतेच्या आरोपांतून मुक्त केलें आहे! आणि या विसंगतीचें मूळ गीताचार्यांचेंच आहे असें म्हणून गीतेंतील क्षराक्षर-विचार 'तर्कदृष्ट्या मोठा सुसंगत आहे असें नाहीं' (पृ. ४०) हें चार-सहा ओळींत चुटकीसरसें मांडून दाखविलें आहे!

या विचाराला अनुलक्षूनच डॉ. पेंडसे यांनीं 'श्रीज्ञानेश्वरांचें तत्त्वज्ञान' या ग्रंथांत पृ. २०६–७ वर उत्तर दिलें आहे. त्याचा सारांश असाः जीव आणि जगत् हे क्षर आहेत व मायोपहित पुरुष अक्षर आहे. म्हणजे अक्षर हा सोपाधिक असून

---

१ मोठा टाइप आमचा आहे. २ मुळांत शंभर तरी ओव्या आहेत.









अनुक्रमणिका

पुरुषोत्तम हा निरुपाधिक आहे असें सांगून 'अक्षर' शब्दाचा अर्थ बरोबर केल्यास गीतेचा किंवा ज्ञानेश्वरीचा अर्थ कळणें कठिण नाहीं, असें सांगून टाकिलें आहे. या ग्रंथाचीहि प्रस्तावना डॉ. रानडे यांनींच लिहिली असून त्यांत या महत्त्वाच्या विषयाचा ऊहापोह असूनहि हें मत ग्राह्य किंवा अग्राह्य हें सांगितलें नाहीं; परंतु 'अनुभवामृता'च्या निमित्तानें स्फूर्तिवाद आणि मायावाद यांच्या समन्वयाची दिशा दाखवून 'अक्षर'–विचाराला उपाधींतून मोकळें केलें आहे. आणि जवळजवळ हाच विचार डॉ. तुळपुळे यांच्या मूलगामी विवेचनाचा मासला म्हणून 'पांच संत कवीं'त पुढें येत आहे. अनुभवमार्गीय संप्रदायांत शिष्यानें गुरूचा विचार मांडला आणि गुरूंनीं तो शिष्याचाच आहे असें सांगितलें तर त्यांत द्वैताच्या भासापेक्षां एका जातीच्या अद्वैताचीच व्यंजना होते. खरा प्रश्न, मूळ विचार कोणाचा हा नसून, विचार मुळांत तर्कनिष्ठ आहे कीं तर्कदुष्ट आहे, अथवा त्याला अनुभवाचा पाठिंबा आहे किंवा कांहीं विशिष्ट अनुभवामुळें तो संदिग्ध झाला आहे, हा आहे. मग तो विचार गीताचार्यांचा असो, ज्ञानदेवांचा असो अथवा एका साध्या लेखकाचा असो !

गीतेंतील पुरुषोत्तमयोगविचारांत जो तर्कदोष डॉ. तुळपुळे यांनीं दाखविला आहे तो असा आहे--

१ "क्षरपुरुष असें म्हणण्यांत 'वदतो व्याघात' होईल. कारण, पुरुष हा क्षर असूंच शकणार नाहीं."

२ "अक्षर पुरुष असें म्हणण्यांत द्विरुक्ति–दोष संभवेल. कारण, पुरुष हा सदा अक्षरच असणार."

३ "याप्रमाणें क्षराक्षर पुरुषांचा निरास झाला कीं एकच पुरुष उरतो. अर्थात् त्यास उत्तम पुरुष म्हणण्याचें कारण नाहीं."

४ "तेव्हां पुरुष असा एकच असून तो विविध मानण्यांत व अक्षर आणि उत्तम यांत भिन्नत्व कल्पिण्यांत तर्क-दोष आहे."

खरेंच या तर्कमार्गानें अथवा अनुभवमार्गानें पाहिल्यास गीतेच्या विचारसरणींत तर्कदोष दिसणें हें अनिवार्यच आहे; परंतु तो गीताचार्यांचा होऊं शकेल का, हें गीताभक्तांनीं तेवढेंच नव्हे तर कोणत्याहि विचारभक्तांनीं विवेचून पाहिलें पाहिजे. गीतेची क्षराक्षर–विचारसरणी तर्कदुष्ट असो. परंतु ती ज्ञानदेवांच्या लक्षांत कशी आली नसेल? गीतेच्या तर्कदुष्ट अडगळींत ते आपली सहज रसाळ सरणीची क्लिष्टता कशीबशी दडवून गीतेच्या पुरुषोत्तमयोगशास्त्राची समाधि बेमालूम कुशल कारागिरीनें आटपून टाकीत असतील का ? अनुभवामृतांतील स्फूर्तिवाद आणि ज्ञानेश्वरींत जो कांहीं असेल तो मायावाद यांच्या विसंगतीचें 'निराकरण करून आपलें तत्त्वज्ञान शक्य तों सुसंगत राखण्याचा आटोकाट प्रयत्न केलेला त्यांनीं स्पष्ट दिसतो', असें ज्ञानदेवांविषयीं जर आपण म्हणूं शकतों तर क्षराक्षर–विचाराच्या वेळींच त्यांच्या बुद्धीनें कां कच खाल्ली असावी हें गूढ रहातें ! कां असें असेल कीं गीता आणि ज्ञानेश्वरी या आपापल्या अनुभवाच्या परीनें आणि तन्निष्ठ तर्कानें सुसंगतच आहेत ? आपणच त्यांना दुसऱ्या चौकटींत बसविण्याच्या खटपटींत मूळ विचाराची लांबी–रुंदी कापूं पहातों, आणि त्या चातुर्यांत मूळ चित्राच्या अंगाला धक्का लागत आहे हें विसरून आपल्या 'फ्रेम'च्याच सौंदर्याचे गोडवे गातों ! चित्राकरितां चौकट कीं चौकटीकरितां चित्र ? आपापल्या अनुभवाच्या चित्राप्रमाणें आपण पसंत केलेल्या तर्काची चौकट असते. आणि त्या चौकटींतच खांचून-खोंचून गीतानुभव व ज्ञानदेवानुभव बसविणें विचारनिष्ठेला पसंत पडणार नाहीं. सध्यां ज्ञानदेवांना स्वसंरक्षणार्थ मोकळें सोडून गीताभक्तांनीं गीतेकडेच वळणें योग्य होईल.

एका अर्थी हा प्रश्न अनुभवाचा अथवा तर्काचा नसून जें शास्त्र आपण वाचतों त्याची परिभाषा तदंतर्गत यथार्थतेनें पाहाणें शास्त्राचेंच काय, साहित्यसमीक्षेचेंहि तें विवेकाचें लक्षण आहे. डॉ. पेंडसे म्हणतात त्याप्रमाणें 'अक्षर' या पदाचा पुरुषोत्तमयोगशास्त्रांतील बरोबर अर्थ न केल्यामुळेंहि हा घोटाळा उडत असेल. पण हा घोटाळा इतकाच नसून 'पुरुष' या शब्दाचा अर्थ काय, याविषयींचाहि आहे. पुरुष अक्षरच असतो आणि अक्षर म्हणजेच पुरुष; एक अक्षर व एक पुरुष; तेव्हां उघडच आहे, क्षर पुरुष असूंच








शकत नाहीं–आणि दुसरा उत्तम असो नसो, तो अवश्यच नाहीं ! तो खरा म्हणून पुढें येईल तर तोतया ठरेल ! खरीच ही विचारसरणी इतकी सुटसुटीत आहे कीं हें गीताचार्यांना कळलें कसें नाहीं व असल्या कच्च्या अध्यायास 'गुह्यतमं शास्त्रम्' असें त्यांनीं कसें म्हणावें याचें नवल वाटतें ! हेंच गुह्यतम शास्त्र समजून घेऊन माणसानें बुद्धिमान् व्हावें, तसेंच कृतकृत्य व्हावें असें गीता बजावून सांगते. आणि सोळाव्या अध्यायाच्या अखेरीस व सतराव्या अध्यायाच्या आरंभीं शास्त्र आणि शास्त्रविधि याविषयीं आणि शास्त्रविधानाविषयीं जें ठासून सांगणें चालू आहे तें तर गीतेचें क्षराक्षरविवेकनिष्ठ पुरुषोत्तमशास्त्र होय. याचाच अवतार श्रीकृष्ण आहे आणि या पुरुषोत्तमाच्या भक्तीलाच पूर्णभक्ति म्हणतात–आणि हा पुरुषोत्तम तर क्षराक्षरासकट समग्रतेनें जाणला पाहिजे, हें गीतेंतील ज्ञान आहे. गीतेंतील पुरुषविचारहि जुन्या सांप्रदायिक सांख्य, योग आणि वेदान्त याहूनहि पुढारलेला आणि पुरोगामी असल्यामुळें तीन पुरुषांचें निराकरण करण्यापेक्षां त्यांचें आकलन करणें हें जास्त हिताचें होईल. पुरुष ही वस्तु कांहीं साकार सामानाप्रमाणें एकीकडे असल्यास इतरत्र कोठेंहि नाहीं असें नाहीं ! पुरुषसूक्तादि वैदिक ऋषींपासून केन–कठ–ईश–मांडूक्यादि उपनिषदीय आचार्य–परंपरेंतूनहि पुरुषानुभव वाढत वाढत भगवान् श्रीकृष्णांत तो साकार सगुण होऊन बोलत आहे, अथवा श्रीकृष्ण द्वैपायन-व्यासांची वाणी बोलवीत आहे.

श्री. अरविंदांच्या तत्त्वज्ञानाविषयीं लिहित असतांना एक लेखक म्हणतात:—"Each philosopher, who has vision of Reality, has to find his own language not only to express it but to distinguish it from all other similar efforts, He tends to create a special body of terms and words which, even when taken from the current language, are used by him in a more or less special sense." प्रत्येक अनुभवी ज्ञानी आपापला अनुभव सांगतांना चालू भाषेंतूनच निवडकपणानें आपली भाषा बनवितो. परंतु शब्दासारखे शब्द असले तरी अर्थासारखा अर्थ असतो असें नाहीं ! पण त्या शास्त्राच्या मर्यादेंत तो सुसंगत असावा लागतो. ही गोष्ट खरी आहे कीं पुरुषोत्तमयोगांतील विचारसरणी सहज कळणें कठिण आहे. 'It is hard to understand' हें पंधरा वर्षांपूर्वींचे श्री. रानडे यांचे बोल आजच्या तुळपुळे यांच्या निधड्या वाणीहून सखोल आहेत. क्षराक्षर–विचार एवढाच काय, हा सबंध अध्यायच कुणी तरी गबाळ्यानें गीतेंत घुसडला असला पाहिजे असेंहि निक्षून सांगणारे एक विद्वान् कै. महेंद्रचंद्र घोष यांनीं श्री. अरविंदांना पुरुषोत्तमयोगाध्यायांतील विचारसरणी पटतेच कशी आणि अशा न पटणाऱ्या पायावर आपल्या तत्त्वज्ञानाची इमारत बांधणें फार धोक्याचें आहे असेंहि सुचविलें होतें ! लोकमान्य गीतारहस्यकारांनाहि या पुरुषत्रयविभागाची मांडणी थोडी अडचणीचीच वाटली ! त्याची उणीव जणूं कांहीं भरून काढण्याकरितां 'गीतातत्त्वमंजरी'कारांनीं आपल्या निर्लेप कर्मशास्त्रांत याची संगति कशी जुळवावी हें सुगम करण्याकरितां एक तक्ताच दिला आहे. (पृ. ५०२). 'भारतीय तत्त्वज्ञाना'चे इतिहासकार श्री. दासगुप्ता म्हणतात: 'The Gita theory of Purusha is much looser than the later Sankhya theory,'; पण पुढें सांगतात: 'But it has the advantage of being more elastic.'! याच क्षराक्षराचा विचार कांहीं अंशीं भगवद्गीतेच्या आठव्या व बाराव्या अध्यायांतहि येतो. आठव्या अध्यायांतील विषयाला अनुलक्षून (यांतच क्षर-अक्षर इत्यादिकांचा विचार केला आहे) The apparent abracadabras असा उल्लेख करून महात्मा गांधीमार्गीय कै. महादेवभाई देसाई जी एक टिप्पणी जोडतात त्यांत 'अक्षरा'ला Imperishable, Unmanifest, Absolute इत्यादि पदें वापरतात आणि गीतेला लिहिलेल्या आपल्या प्रस्तावनेंत Absolute आणि God याचा विचार करतांना पृ. ४४ वर डॉ. राधाकृष्णन् यांचें 'The difference between the Supreme as spirit and the supreme as person is one of standpoint and not of essence हें वचन उद्धृत करतात आणि स्वतःहि सांगतात: 'For the philosophical attitude God as the Absolute is enough.' त्यांना पंधराव्या अध्यायांतील क्षराक्षर










# भगवद्गीतेंतील पुरुषोत्तमयोग आणि डॉ. तुळपुळे

विचारहि तितकासा अडत नाहीं. क्षराक्षर-पुरुषोत्तम-सदृश विचार कठोपनिषदांतहि आला आहे. हा विचार तितकासा सुसंबद्ध नाहीं असें वीस-बावीस वर्षांपूर्वीं श्री. रानडे यांना वाटल्याचें नमूद झालें आहे (History of Indian Philosophy II, page 265 च्या पुढें मागें). पण त्याच भारतीय तत्त्वज्ञानाच्या इतिहासाच्या पृ. ४०३ वर--हा विचार कदाचित् श्री. बेलवलकरांचा असावा-- 'It will thus be seen that Purusha does not necessarily lead to dualism any more than Atman to Monism. It can more cogently be even said that Purusha initially implies the transcendence of the opposition of matter to spirit in a triune-unity, just as it can be plausibly argued that the process of abstraction started by the conception of the Atman can have no halfway resting-house short of downright acosmism and nihilism) हा उल्लेख येतो.

हा लांब उतारा देण्याचें कारण असें कीं डॉ. तुळपुळे म्हणतात, 'पुरुष असा एकच असून तो त्रिविध मानण्यांत व अक्षर आणि उत्तम यांत भिन्नत्व कल्पिण्यांत तर्कदोष आहे.' त्यापूर्वींहि ते असा प्रश्न करतात कीं— "'पुरि शेते इति पुरुषः' ही व्याख्या मान्य केली तर पुरुषत्रयाची ही विभागणी कितपत तर्कशुद्ध ठरेल?" ही व्याख्या गृहीत धरून तर ज्ञानदेवांनीं पुरुषत्रयविचार सुसंगत करून दाखविला आहे. आणि डॉ. बेलवलकरांनींहि 'Evolution of the conception of Purusha' या अधिकरणांत ही व्याख्या जमेस धरूनहि Triune-unity ची कल्पना सुसंगत होऊं शकते हें सुचवून आत्म--आणि--अक्षर--वादाच्या वाटेवर विश्वनिराकरणाची आणि पुढें बौद्धवादाच्या शून्यांत बुडण्याची भीतिहि आहे हें सुचवून ठेविलें आहे. तेंहि असो, पण ज्ञानदेवांनीं जो पौरुषवाद व आत्मवाद यांचा पुरुषोत्तम--वादाशीं समन्वय घडविलेला आहे तो समजून घेण्याच्या ऐवजीं तो विवेकवादी सात्त्विक अनुभवमार्गास (Rational Mysticism) गम्य होत नाहीं म्हणून ज्ञानदेवाच्या चिद्विलासवादाहून मायावाद वरचढ करून ठेवणें प्राप्त होत असेल का, हा गीता-भक्तांनींहि विचार करण्यासारखा प्रश्न आहे. हें संभाव्य आहे कीं, भगवद्गीता ही कांहीं वेदांत-मार्गीयांना व तदंतर्गत अनुभवमार्गीयांना उपनिषद् वाटतच नसेल. डॉ. बेलवलकर आणि डॉ. रानडे या दोघांनीं संपादिलेल्या उपरि उल्लेखित ग्रंथांतच 'The deliberately planned closing-in of the so-called orthodox rank' या विधानाचा विचार त्यांच्याच भगवद्गीतेच्या ग्रंथांत येणार असल्याचा उल्लेख आहे. तो ग्रंथ जरी अजून बाहेर आला नाहीं तरी भगवद्गीतेंत सुसंगत नसलेल्या बऱ्याच गोष्टी आहेत, अशा पुढें येणार असलेल्या मासल्यांतील पुरुषत्रयविभागाची विसंगति हें ठळक उदाहरण म्हणून आधीं येत असावेंसें दिसतें!

वरील परिच्छेदांत उल्लेखिलेले कित्येक ग्रंथ प्रसिद्ध होण्यापूर्वीं श्री अरविंदांनीं जे गीतेवरील निबंध लिहिले आहेत त्यांत या विषयाचा खरा मूलग्राही विवेक केला असून हा विचार न समजण्याला महत्त्वाच्या अडचणी कोणत्या याचा ऊहापोहहि अत्यंत रम्य नि गंभीर रीतीनें केला आहे. गीताचार्यांच्या प्रमाणें ज्ञानदेव व श्री अरविंद हे ज्ञानी, सिद्ध, कवि आणि विचारप्रवर्तक आचार्य आहेत. शेक्स्पिअरसारख्या नाटककाराच्या नाटकांतूनहि एके काळीं कांहीं समीक्षकांनीं दोष दाखविले; परंतु ते कांहीं काळानंतर त्या समीक्षकांच्या समीक्षापद्धतींतील दोष असेच ठरले. ज्ञानदेवांची काय, गीताचार्यांची काय, विचारसरणी पटवून घेण्याची आपण साधनाच केली पाहिजे. त्या साधनेचे कष्ट न सोसवल्यास मूळ ग्रंथकर्त्यावर दोषभार टाकतां येत नाहीं. महाराष्ट्राचे पंचप्राण असे पांच संत Rational Mysticism च्या चौकटींत बसण्याकरितां कोणत्याहि दरडावणीनें अंग चोरून राहणार नाहींत. श्री. रानडे यांनीं आपल्या 'उपनिषद्रहस्यां'त (A Constructive Survey of Upanishadic Philosophy) याज्ञवल्क्याच्या तत्त्वज्ञानाला अग्रपूजेचा मान दिला आहे--- आणि याज्ञवल्क्य बृहदारण्यकाच्या तिसऱ्या अध्यायाच्या आठव्या ब्राह्मणांतील आठ ते अकरा या

मंत्रांतून 'अक्षरा'ची प्रशंसा करतात, तो भाग कोणाहि विचारवंताला वंद्यच आहे. पण त्या कसावर भगवद्गीतिचें सुवर्ण घासून पाहून तें सोनें कसांत कमी पडतें, असें डॉ. तुळपुळे यांनीं सांगणें हें थोडें धाष्ट्र्याचें वाटतें! एवढेंच नव्हे तर हा पंधरावा अध्याय ज्ञानदेव निमूटपणें गिळून बसले असें म्हणणें म्हणजे आत्मानुभवाच्या वडेजावापेक्षां बुद्धिवादाचा वडेजाव चालू ठेवण्यासारखें वाटतें. पंधराव्या अध्यायांतील पुरुषत्रय न कळणें हा तर्कदोषाचाच केवळ भाग नसून तो एका जातीच्या विवेकाचा कोतेपणा आहे. याच प्रश्नाचा विचार करीत असतांना The Spirit of Indian Philosophy या आपल्या पुस्तकांत प्रो. एस्. के. मैत्र म्हणतात–' Logically speaking you need not go beyond the 'Akshara'; that is why the later systematized Vedanta did not feel the need of any principle beyond the 'Akshara' or the Nirguna Brahman. But axiologically it is incomplete." ज्यांना अक्षरपुरुषाशिवाय वेगळें कांहीं कळत नाहीं अथवा स्फुरत नाहीं ते दुसऱ्या पुरुषाविरुद्ध तर्कांची ढाल पुढें करून लढतात. अफाट अनुभववादाच्या मार्गांत तर्कांचा विजय अयशस्वी ठरतो. गीतेची काय, ज्ञानदेवांची काय, अनुभूति तर्कानें अडविण्यापेक्षां ब्रह्मतर्कानें (Logic of the Infinite) आकलून घेणें जास्त योग्य ठरेल. श्रीकृष्ण भगवान् आपल्या पुरुषोत्तमानुभवाचें निर्वचन करीत असतां जी भाषा वापरतात त्याची जाणीव श्री ज्ञानदेव वा श्रीअरविंद असल्यांच्याच हृदयांना पटते. ज्ञानदेवांची भाषा काय अथवा गीतेची भाषा काय, श्री अरविंद म्हणतात त्याप्रमाणें ' A language has to be created which is at once intuitively metaphysical and revealingly poetic, admitting significant and living images as the vehicle of a close, suggestive and vivid indication' अशी ती असते.–पुरुष हा एकच असला पाहिजे आणि तो तर अक्षरच असतो या वजनानें तोलून क्षर व उत्तम यांना डॉ. तुळपुळे निःसत्त्व ठरवितात; परंतु गीतेंतील भगवान् हा, श्री अरविंद म्हणतात 'Neither wholly the Kshara, nor wholly the Akshara, he is greater than the immutable self and is much greater than the soul of mutable things. If he is capable of being both at once, it is because he is other than they, अन्यः, the Purushottama above all cosmos and yet extended in the world.', त्याप्रमाणें आहे.

पुरुष एकच असेल तर तो पुरुषोत्तम होय, आणि त्याच्या त्या उत्तम शक्तीमुळें क्षराक्षरांतहि अधिष्ठित राहून जशी तो सर्व भूतांची सोडवणूक व संरक्षण करतो तसेंच मुक्तीकरितां अक्षराकडेच धांव घेणाऱ्या कूटस्थ लोकांचीहि सोडवणूक तोच पुरुषोत्तम करतो. 'ते प्राप्नुवन्ति मामेव।'. क्षरांतून सुटका करून अक्षरांत जरी ते शिरले तरी त्यांना मुक्ति पुरुषोत्तमच देऊं शकतो. परंतु या अक्षरभक्तांनीं विश्व हा आभास आहे असें कितीहि घोकलें तरी साध्य झाल्यास या जगीं जिवंत असतांना विश्व हा चिद्विलास आहे याची साधना करावी; प्राप्ति न झाल्यास 'संनियम्येंद्रियग्रामं सर्वत्र समबुद्धयः।' असें तर असावेंच; त्याशिवाय 'सर्वभूतहिते रताः'हि व्हावें. पण हेंहि खरें कीं 'क्लेशोऽधिकतरस्तेषामव्यक्तासक्तचेतसाम्' ही भगवान् श्रीकृष्णाची इशाऱ्याची वाणी लक्षांत ठेवणें अवश्य आहे. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे क्षराक्षर-विभागांत डॉक्टरांना दिसणारा तर्कदोष तो त्यांच्या स्वतःच्या विचारपद्धतीचा दोष असून अशा विषयास अवश्य असलेली ब्रह्मतर्कपद्धति, ते त्यांच्या सांप्रदायिक अनुभववादामुळें म्हणा अथवा गैरलागू अतिविवेकामुळें म्हणा, स्वीकारण्यास तयार नाहींत; आणि यामुळेंच ज्ञानेश्वरी व अमृतानुभव यांत त्यांना दिसणारी विसंगति व त्याचप्रमाणें त्यांनीं सुचविलेला परिहार हे दोन्ही वरपांगी दृष्टीचे होतात. ज्ञानदेवांचा खरा समन्वय आहे पुरुषोत्तम–भक्तीशीं आणि तोच विषय आहे गीतेच्या पंधराव्या अध्यायांतील. [ शब्दार्थः—१ क्षरांतलि पुरुष तो '**क्षरः**' अथवा '**क्षरपुरुष**'; पुरुषच क्षर नव्हे. २ अक्षरांतील पुरुष तो '**अक्षरः**' अथवा '**अक्षरपुरुष**'. पुरुष केवळ अक्षर नव्हे. ३ क्षर–अक्षरांनीं बाधित न होतां त्या दोन्हींत आणि दोन्हींच्या उपर जो असतो तो **पुरुषोत्तम**. हा नसता तर क्षर-अक्षर एकमेकांनीं बाधित झाले असते. ]







श्री. हरिकृष्ण मोहनी

# सेवाग्राम ते राऊ : सर्वोदयसमाजाची पार्श्वभूमि व कार्य

## सर्वोदयसमाजांतील मध्यवर्ती कल्पना

१९४८ मार्च १३-१४-१५, या तारखोंस गांधीजींच्या मृत्यूनंतर गांधी-मताप्रमाणें थोडाबहुत आचारविचार करणाऱ्या लोकांचें एक संमेलन सेवाग्रामला भरलें होतें. सुमारें एक हजार लहान-मोठे कार्यकर्ते संमेलनांत हजर राहिले होते. तीन दिवस चर्चा व भवति न भवति होऊन प्रमुख लोकांनीं असें ठरविलें कीं, गांधीजींच्या श्राद्धाच्या दिवशीं एक मोठा मेळा भरवावा आणि 'सर्वोदय-समाज ' ह्या नांवानें बंधनरहित, सर्वसंग्राहक, कायदेकानूविरहित, विरळ अशी सत्य व अहिंसा ह्या तत्त्वाच्या पायावर एक संघटना बनवावी. ह्या संघटनेमध्यें जे ' आपण गांधी विचाराचे आहों ' असें मानतील त्या सर्व लोकांचा समावेश करावा. अशा लोकांची नोंदणी करण्यासाठीं एक लहानशी समिति सेवाग्रामला नेमण्यांत आली.

मेळा भरविण्याबाबत मुख्य विचारसरणी अशी होती : धार्मिक पद्धतींचे मेळे भरविण्याची प्राचीन परंपरा हिंदुस्थानांत अनेक शतकांपासून सुरू आहे. कुंभमेळ्यासारखा अजस्र मेळा हिंदुस्थानांत भरत आहे. अशा मेळ्यांत लक्षावधि धार्मिक व भाविक लोक एकत्र जमतात. ह्या परंपरेप्रमाणें गांधीजींवर श्रद्धा ठेवणारे असंख्य लोक हिंदुस्थानांत असल्यामुळें ते गांधीजींच्या मृत्युदिनाच्या दिवशीं एकत्र जमतील. ह्या लक्षावधि लोकांच्या मेळ्यामुळें निर्माण झालेल्या वातावरणाचा परिणाम हिंदुस्थान-भर दिसून येईल : आणि त्या उदात्त व पवित्र-वातावरणाचा उपयोग गांधी-विचार-सरणीनें चाल-विलेल्या कार्याच्या दृष्टीनें चांगल्या रीतीनें करून घेतां येईल. सभा-संमेलनें ह्यांपेक्षां अशा धार्मिक मेळ्याचें वैशिष्ट्य, परंपरेच्या दृष्टीनें विचार करतां, निराळ्या प्रकारचें आहे. मेळ्यासंबंधीं अशी विचार-सरणी संमेलनांत अंगीकारण्यांत आली.

सर्वोदयसमाजाची मुख्य केंद्रीभूत कल्पना ही होती कीं गांधी-मताचा एक धार्मिक संप्रदाय बनतां कामा नये. हिंदुस्थानांत धार्मिक संप्रदाय बनवि-ण्याकडे अनुयायांच्या स्वभावाची प्रवृत्ति आहे. गांधीविचाराच्या लोकांची संघटना तर असावी; परंतु ती संघटना कोणासहि बोचक तर वाटतां कामा नये आणि म्हणून नियम, शिस्त, बंधन ह्या स्वतंत्र व्यक्तित्वावर दडपण आणणाऱ्या बाबी टाळून, स्वेच्छेनें, स्वयंस्फूर्तीनें, सहजतेनें एकत्र आलेल्या लोकांचा हा समाज असावा. ह्या समा-जाच्या सभासदांनीं आपली उन्नति अंतःप्रेरणेनेंच करावी ही उन्नति बाह्य नियमनावर अवलंबून असू नये.

महात्मा गांधींचें व्यक्तित्व, विचार व आचार-प्रणाली मुख्यतः हिंदुस्थानाच्याच उन्नतीस उपकारक होती, त्यांत शंका नाहीं; तथापि जगावरहि त्यां ध्येय व धोरण कांहीं अंशीं परिणाम घडवून आणती अशी कार्यक्षमता गांधीजींच्या विचार-आचार-संपदेमध्यें होती. हिंदुस्थानास राजकीय स्वातंत्र्याची जितकी गरज होती तितकी जगांत शांतता प्रस्था-पित करण्याची आज गरज आहे असें विचारी लोकांस वाटतें. जगांतील सर्व शांततावाद्यांस गांधी-जींबद्दल आदर व आकर्षण वाटत होतें व त्यांच्या विचारसरणीबद्दल कुतूहल सर्व पृथ्वीतलावर पसरलेलें होतें.

मागच्या वर्षी सेवाग्रामला जें संमेलन झालें आणि त्या संमेलनाचा जो वैचारिक निष्कर्ष निघाला त्यांत गांधीजींबद्दलची हिंदुस्थानी जनतेची भक्ति मेळ्याच्या रूपानें वाढवितां येईल आणि









अनुक्रमणिका

हिंदुस्थानांत व हिंदुस्थानाबाहेर गांधीजींचे जे चहाते आहेत त्यांना वैचारिक दृष्टीनें एकत्र करण्याची योजना सर्वोदयसमाजाच्या रूपानें फलद्रूप करतां येईल अशी अपेक्षा बाळगण्यांत आलेली होती.

## हिंदुस्थानची सध्यांची परिस्थिति

हिंदुस्थानांतील सध्यांचा काळ अत्यंत अशांततेचा आहे. परंपरेच्या दृष्टीनें मेळ्यांचा कार्यक्रम जरी योग्य वाटला आणि जनतेमध्यें गांधीजींबद्दलची भक्ति जरी अपरंपार असली, तरी हिंदुस्थानांतील दुर्भिक्ष सारखें वाढत असल्यामुळें, गांधीजींच्या नांवानें भरविलेल्या मेळ्यांत लक्षावधि लोकांचा पूर लोटेल अशी हिंदुस्थानची भौतिक परिस्थिति गेल्या वर्षी राहिली नाहीं. गांधीजींबद्दलचा पूज्यभाव ज्या हिंदुस्थानव्यापी संस्थेमध्यें अधिक प्रमाणांत दृग्गोचर होतो अशा काँग्रेसमध्यें देखील सध्यां फार खळबळ व अशांतता आहे. काँग्रेसमधील लोकांची पार्लमेंटरी कार्यें, अधिवेशनें, अधिकारपदें, राज्यकारभार वगैरे अनेकविध कार्यक्रमांमुळें गांधीवादी विचारसरणीचा, ध्येयधोरणाचा एकतानतेनें पुरस्कार करण्यास निर्वेध अशी मनःस्थिति नाहीं. ह्या परिस्थितीमुळें गांधीजींनीं घालून दिलेल्या मार्गानें चालविलेल्या कार्यक्रमाबद्दल सेवाग्रामला ज्या अपेक्षा बाळगण्यांत आल्या त्या विशेष उत्साह वाढविणाऱ्या ठरल्या असें म्हणतां येत नाहीं.

सेवाग्राम संमेलनाच्या पावलावर पाऊल ठेवून एप्रिलमध्यें ४००-५०० महाराष्ट्रीय गांधीवादी विधायक कार्यकर्त्यांनीं अंबरनाथ येथें संमेलन भरविलें; सद्यःस्थितींत उपकारक होतील असे, बाबू राजेंद्रप्रसाद यांच्या अध्यक्षतेखालीं, अर्थपूर्ण ठराव केले; परंतु गांधीवादी विचारसरणीच्या दृष्टीनें देशांतील व प्रांतांतील एकंदरींत परिस्थिति अशा कार्यास पोषक नसल्यामुळें ह्या संमेलनानंतर महाराष्ट्र प्रांतांत आंदोलनात्मक असा कांहीं उठाव करण्यांत आला असें म्हणतां येत नाहीं.

गांधीजींच्या मृत्यूनंतर देशांत हलकल्लोळ माजेल अशी वास्तविक परिस्थिति होती; देशावर असाधारण प्रभुत्व गाजविणारी एकमेवाद्वितीय शक्ति बिलकुल अपेक्षा नसतांना एकदम नाहींशी झाली. पंडित जवाहरलाल, सरदार वल्लभभाई यांसारख्या नवीन राज्यकारभाराची धुरा अंगावर धारण करणाऱ्या महनीय कर्तृत्वसंपन्न व्यक्तींवर आकाश कोसळलें ! राजकीय स्वातंत्र्य नुकतेंच मिळालेलें आणि तेंहि देशाचे तुकडे होऊन; जनतेच्या आकांक्षा स्वराज्यप्राप्तीपूर्वीच्या अनेकविध घोषणां (Slogans)नीं अपरंपार वाढविलेल्या; इतक्या कीं राजकीय स्वातंत्र्य म्हणजे जणूं काय जादूची कांडी असें सामान्य जनतेस सहजच वाटावें; जागतिक परिस्थिति अत्यंत संकटमय; महायुद्धानंतरच्या जागतिक अनर्थपरंपरेंत हिंदुस्थान आकंठ बुडालेलें; पन्नास लक्ष लोक घरांदारांस मुकून भटकत सुटलेले; काश्मीरमध्यें युद्धाची धुमश्चक्री; हैद्राबादसारख्या संपन्न व प्रमुख संस्थानाचा प्रश्न अत्यंत चिंताजनक; अशीं एका वर्षात कितीतरी पर्वतप्राय संकटें हिंदुस्थानच्या पुढाऱ्यांचा अंतच पाहण्यास जणूं काय टपलेलीं होतीं ! हिंदुस्थानच्या बाहेर रशियाच्या अस्वलानें चीन देशाला अर्धमेलें केलें आणि ब्रम्हदेशांत बंडाळी सुरू करून हिंदुस्थानच्या सरहद्दीला उपसर्ग पोंचेल येथपर्यंत मजल आली. आशिया खंडांत बंडाळी व रणकंदन सारखें सुरूच राहिलें !

## राज्यसंस्थेविरुद्ध बंडाचे प्रयत्न

पाकिस्तानचे गव्हर्नर जनरल कायदेआझम जिना नियतीच्या चक्रनेमिक्रमानें पैगंबरवासी झाल्यामुळें पाकिस्तानची मुजोरी कमी झालेली असली, तरी देशांत मुसलमानांसंबंधींच्या विचार-व-भावनाविषयक कलागतींस गेल्या वर्षी खंड पडला असें मानतां येणार नाहीं. राष्ट्रीय स्वयंसेवक संघास गांधीजींच्या व काँग्रेसच्या मुसलमानांबाबतच्या दृष्टिकोनाचें अत्यंत वावडें अनेक वर्षें आहे. हिंदुस्थानचे तुकडे झाल्यामुळें गांधीजी व काँग्रेस यांबद्दल राष्ट्रीय स्वयंसेवक संघांतील वैचारिक तीव्रता वाढीसच लागली. गांधीजींच्या खुनानंतर, ह्या मृत्यूस पोषक असणाऱ्या विचारसरणीवर व आचारपद्धतीवर बंधन घालणें राज्यकर्त्यांचें अर्थातच क्रमप्राप्त कर्तव्य ठरलें. गांधीजींची परंपरा व कार्यपद्धति अहिंसात्मक, उदार आणि शत्रूवरहि दया दाखविणारी आहे. ह्यामुळें गांधीजींच्या कार्यपद्धतींत रुजलेल्या राज्यकर्त्यांनीं हा जागतिक उत्कापात घडविणारा, मानवी संस्कृतीस शाश्वत कलंक








लावणारा भयंकर खून घडून आला, तरी ज्या विचारसरणीमुळें हा खून घडून आला त्या विचारसरणीवर व त्या विचारसरणीवर स्थित झालेल्या संघटनेवर निर्घृणपणानें कुऱ्हाड चालविली नाहीं ! राज्यकर्त्यांनीं मन शांत ठेवून सौम्य उपायांचें अवलंबन केलें आहे, हें जागतिक राजकीय इतिहास तुलनात्मक रीतीनें वरवरही अभ्यासणाऱ्या निःपक्षपाती मनुष्यास कबूल करणें भाग आहे. तरी देखील राष्ट्रीय स्वयंसेवक संघासारख्या हिंदुस्थानभर गांधीजींच्या विचारसरणीविरुद्ध आंदोलन उठविणाऱ्या संघटनेनें राज्यकारभार खिळखिळा करण्यासाठीं कायदेभंगाचें हत्यार उपसलें. संघाची विचित्र विचारसरणी अशी आहे कीं, आपल्यावरील अन्यायांचें परिमार्जन करण्यासाठीं राष्ट्रीय स्वयंसेवक संघास कायदेभंगास प्रवृत्त व्हावें लागलें ! ज्या विचारसरणीमुळें गांधीजींसारख्या जगद्वंद्य अवतारी विभूतीचा खून होतो ती विचारसरणी न्याय्य आणि खुनास प्रवृत्त करणारी ही विचारसरणी बंद करूं पाहणारी राज्यसंस्था अन्याय्य असें समजावयाचें काय ! न्याय व अन्याय ठरविण्याबाबतची ही उलट्या काळजाची मानसिक उलटापालट मानवी विचारशक्तीचा एक अजब नमुना आहे यांत कांहीं शंका नाहीं !

प्रस्तुत परिस्थितींत कायदेभंगास प्रवृत्त होणारी कोणतीहि चळवळ–ती सार्वत्रिक मतानें अहिंसात्मक नसली तर–देशाच्या स्वास्थ्यास, सुव्यवस्थेस आणि सर्व प्रकारच्या भौतिक व मानसिक उन्नतीस अत्यंत हानिकारक आहे. पाऊण लाख लोकांनीं देशभर कायदेभंग करावयाचा, कायदेभंगास पोषक अशी विचारसरणी द्वेषपूर्ण मनोवृत्तीनें अनुसरावयाची, राजकीय वातावरण सरकारविरुद्ध आणि सरकारास मदत करणाऱ्या कॉंग्रेससारख्या संस्थेविरुद्ध प्रक्षुब्ध करावयाचें, ह्या स्वराज्यघातकी क्रिया सरकार उलथून पाडणाऱ्या आहेत. त्या क्रिया मुळींच उपेक्षणीय नाहींत. त्या देशद्रोही क्रिया आहेत. जी राज्यसंस्था उभी राहून पुरीं दोन वर्षेंहि झालीं नाहींत, जी राज्यसंस्था अफाट लोकमता-(overwhelming majority)–च्या पाठिंब्यावर उभी आहे, त्या राज्यसंस्थेविरुध्द सद्यःस्थितींत कायदेभंग करणें, प्रत्यक्ष प्रतिकारा-(Direct Action)-चा घोष करून जनतेची अशा प्रतीकारासाठीं तयारी करणें ह्या क्रिया देशहितास सर्वस्वीं विघातक आहेत. हिंदुस्थानांतील निरनिराळे राजकीय पक्ष व संघटना, साम्यवादी आंदोलनें व संप प्रत्यक्ष प्रतिकारासाठीं जनतेची उठावणी करतील तर त्या सर्व क्रिया बंडखोरपणा–(Revolt)च्या सदरांत जमा होतील. आपल्याच सरकाराविरुध्द तीव्र असंतोष व द्वेष निर्माण करून जनतेची उठावणी करणाऱ्या अनेक आत्मघातकी उठाठेवी देशांत चालू आहेत. जसजसा साम्यवादी चळवळींचा परदेशांत जोर वाढत आहे, तसतशी त्याची प्रतिक्रिया हिंदुस्थानांतहि सुरू झाली आहे. प्रत्यक्ष राज्यकारभार करणाऱ्या सनदी नोकरांची पोलादी चौकट हिंदुस्थानांत ढिली पडलेली आहे. राज्यकारभार करणारे कॉंग्रेसचे मंत्री नुकतेच अधिकारपदावर आरुढ झाल्यामुळें अननुभवामुळें स्थिरचित्त होऊं शकत नाहींत. अशा अवस्थेंत अगोदरच करकर करणारें राज्ययंत्र अधिकाधिक खिळखिळें करण्यानें, आमच्या समाजाचें तारूं तुफान दर्यांत सांपडून कोठें तरी भटकत राहील यांत कांहीं शंका नाहीं.

याच गोंधळांत मास्तर तारासिंगांसारख्या चळवळ्या लोकांस शिखिस्तानचें तट्टू दामटण्याची दुर्बुद्धि सुचली आहे. शीख ही लढवय्यी जात आहे. पंजाबचे तुकडे झाल्यामुळें पंजाबवर अगोदरच भयंकर आपत्ती कोसळल्या आहेत. अशा संकटमय स्थितींत संकुचित ध्येयें निष्कारण निर्माण करून देशांत अराजक माजविणारा कोणताहि प्रयत्न देशद्रोह वाढविणारा आहे ह्यांत शंका नाहीं.

**सर्वोदयी कार्यकर्त्यांच्या मार्गांतील अडचणी**

देशांतील राजकीय परिस्थितीच्या या संक्षिप्त समालोचनानें असें दिसून येईल कीं सेवाग्रामच्या संमेलनांत जे ठराव झाले त्यांची उत्साहानें अंमलबजावणी होण्यासारखी देशाची परिस्थिति नाहीं. देशांत ज्या भारतीय नेत्यांचें अतुल प्रभुत्व आहे, ते नेते राज्यकारभाराच्या अनेकविध अशा प्रश्नांनीं ग्रस्त व संत्रस्त झालेले आहेत. त्या नेत्यांचें सामर्थ्य अद्भुत असल्यामुळेंच ह्या अनेकविध संकटांमधून

देश प्रगतिपर मार्गावर स्थिर आहे एवढेंच म्हणतां येईल.

आणि म्हणून मागच्या वर्षी हिंदुस्थानव्यापी मेळा भरवावा व देशांतील व परदेशांतील गांधी-विचाराविषयीं आस्था ठेवणाऱ्या व्यक्तींस सर्वोदय-समाजाच्या विरळ स्वरूपाच्या संघटनेमध्यें एकत्र आणावें हा उद्देश जरी मोठ्या प्रमाणांत फलद्रूप झालेला नसला तरी त्यानें विषाद वाटण्याचें कांहीं कारण नाहीं. देशांतील सध्यांच्या परिस्थितीकडे सूक्ष्मपणानें नजर पुरविल्यास ह्या बाबतींत फार आशा ठेवणें हेंच अयोग्य आहे असें म्हणावें लागेल.

गेल्या वर्षी हिंदुस्थानचे मुख्य मंत्री इंग्लंड व फ्रान्समध्यें गेले होते; आशियांतील राष्ट्रांसहि त्यांनीं हिंदुस्थानांत एकत्र आणलें. परदेशांवर परिणाम घडवून आणणाऱ्या ह्या अनेक महत्त्वाच्या प्रसंगीं पंडितजींनीं जीं व्याख्यानें दिलीं, त्यांत महात्माजींची विचारसरणी त्यांनीं कशी आत्मसात् केली आहे, महात्माजींच्या व्यक्तित्वानें त्यांचें हृदय किती भारून गेलेलें आहे आणि महात्माजींच्या मृत्यूनंतर त्यांचें चित्र जवाहरलालजींच्यासमोर कसें सारखें विलसत आहे, हें सिद्ध झालें आहे. हिंदुस्थानचे गव्हर्नर-जनरल चक्रवर्ती राजगोपालाचार्य यांच्यापासून तों तो एकाद्या लहानशा मंत्र्यापर्यंत सर्वच महात्माजींचें कार्य चालविण्याचा दावा करीत आहेत. कॉंग्रेसचे पदाधिकारी कार्यक्षम कार्यकर्त्यांची श्रेणी उत्पन्न करून गांधीजींच्या दृष्टिकोनानें चाललेल्या विधायक कार्यावर जोर देत आहेत. कॉंग्रेसचे गेल्या वर्षीचे राष्ट्रपति बाबू राजेंद्रप्रसाद ह्यांनीं तर गांधीजींच्या विचारसरणीच्या प्रीत्यर्थ आपलें सर्वच जीवन व्यतीत केलेलें आहे. आपली प्रकृति व इतर उद्योग सांभाळून गांधीजींचें तत्त्वज्ञान, त्यांची विचारधारा व त्यांचें ध्येयधोरण बाबू राजेंद्रप्रसाद यांच्याकडून सांभाळलें जाणार नाहीं अशी स्वप्नांतहि कोणी कल्पना करूं शकत नाहीं. गांधीजींनीं घालून दिलेल्या पद्धतीनें चालविलेल्या विधायक कार्यांत ज्या गांधी–स्मारक–निधीचा उपयोग व्हावयाचा आहे, अशा निधीचे बाबू राजेंद्रप्रसाद हे अध्यक्ष आहेत. कॉंग्रेसचे सध्यांचे राष्ट्रपति पट्टाभि सीतारामय्या हे गांधीजींचें कार्य नवीन तडफेनें उचलून धरतील अशी आशा करण्यास जागा आहे.

पंडित जवाहरलालजी राष्ट्रपित्यांच्या नांवाचा दुंदुभि जगभर पसरवीत आहेत. कॉंग्रेसचे प्रमुख पदाधिकारी गांधीजींस इतक्या लवकर विसरून जातील असें कोणीहि म्हणूं शकणार नाहीं. राज्यकारभार करणारे बहुतेक मंत्री गांधीजींच्या नांवाचा उच्चार करूनच आपलीं अधिकारपदें सांभाळीत आहेत. फार काय सांगावें ! खुद्द सरदार वल्लभभाई पटेल हे सुद्धां सैन्य, आरमार व पोलीस ह्यांवर एका बाजूस जोर देऊन, कॉंग्रेसमधील धुसफूस, वैमनस्यें, अधिकारस्पर्धा, तामसी महत्त्वाकांक्षा हीं कमी करण्यासाठीं आणि देशकल्याणासाठीं कॉंग्रेसच्या लोकांनीं पूर्वीप्रमाणें स्वार्थत्याग केला पाहिजे हा उपदेश ठसविण्यासाठीं गांधीजींच्याच नांवाचा सारखा उपयोग करीत आहेत. गांधीजींनीं घालून दिलेल्या मार्गानेंच शक्त्यनुसार आपलीं पावलें प्रत्येक अधिकारी मग तो राज्यकारभार करणारा असो कीं कॉंग्रेसमध्यें स्थानापन्न असो—उचलीत आहे असें दिसून येतें.

राज्यकारभार करणारे ध्येयनिष्ठ पुढारी आज कठिण अशा समस्येमध्यें सांपडले आहेत. अधिकार किंवा सत्ता आणि स्फूर्ति किंवा प्रतिभा ह्यांचें साहचर्य असूं शकत नाहीं. कॉंग्रेसमधील महत्त्वाच्या लोकांस निवडणुकांकडे पाठ फिरविणें अशक्य असल्यामुळें आणि निवडणुका ह्या प्रातिनिधिक तत्त्वस्थापनेच्या प्रथमावस्थेंत हिंदुस्थानांत अंतःकरणाच्या गढूळपणास व कश्मलतेस मदतच करणाऱ्या असल्यामुळें राज्यकारभार करणारे पदाधिकारी आणि कॉंग्रेसचे पुढारी ह्या दोन्हीहि वर्गांतील, जनतेवर थोडेंबहुत प्रभुत्व मिळविलेले, लोक सद्यःस्थितींत विशुद्ध अशा नीतिमत्तेचे प्रेषित बनूं शकत नाहींत. गांधीजींचें व्यक्तित्व शुद्ध नीतिमत्तेची वाढ करण्यांत सामावलेलें होतें. असत्य, ढोंग आणि धूर्तता ह्यांनीं बुजबुजलेलें राजकारण शुद्ध करण्यासाठीं गांधीजी अवतरलेले होते. गांधीजींचा सत्याग्रह म्हणजे राजकारणांतील गडद अंधःकारांतील नवी स्फूर्तिमयी दीप्ति आहे. हा नवीन प्रकाश, ही दीप्ति, हें नवस्फुरण, गांधीजींचे अधिकार–स्थित सहकारी आणि प्राथमिक








## सेवाग्राम ते राऊ : सर्वोदयसमाजाची पार्श्वभूमि व कार्य

अवस्थेंत प्रातिनिधिक तत्त्वावर निवडणुकी लढवूं पाहणारे कॉंग्रेसगण वाढविण्यास कांहींशीच मदत करूं शकतात. ते त्या कार्यांत अग्रेसर, संदेशवाहक ( messengers ) प्रतिभावान् प्रचारक होऊं शकत नाहींत. परिस्थितीचेंच हें दौर्बल्य किंवा दोष म्हणतां येईल ! आणि म्हणून राज्यकारभार करणारे गांधीजींचे सहकारी किंवा कॉंग्रेसचे अनुयायी देशांत ' सर्वोदय समाज ' ह्या स्फूर्तिदायी नांवानें चालविलेल्या कार्याची त्वरा, व गांधीजींच्या सत्याग्रही मार्गानें कूच करणाऱ्यांची मजल झपाट्यानें मारण्याची शिकस्त करीत नसल्यास त्यांचा अधिक्षेप करण्यापासून कांहींच लाभ नाहीं. ह्या वर्गांतील लोकांच्या अडचणी पाहिल्यास दोष देण्याची प्रवृत्ति होण्याचें कारणहि राहणार नाहीं.

### कार्यकर्त्यांच्या व्यक्तिमत्त्वांतील कांहीं उणीवा

सर्वोदयी समाज किंवा सत्याग्रही लोकजीवन निर्माण करण्याचें पवित्र कार्य मूलतः विधायक प्रवृत्तींच्या लोकांसच करणें शक्य आहे. आणि गांधीजींच्या मृत्यूनंतर तरी ही जबाबदारी सात्त्विकतेची वृध्दि करून त्यांनीं पत्करणें जरूरहि आहे. गांधीजींच्या अनेकविध विधायक कार्यांत ज्यांचें जीवन व्यतीत झालेलें आहे, त्यांनींच कोणाचाहि अधिक्षेप न करतां, कोणावरहि दोष न ठेवतां, स्वतःचें जीवन अधिकाधिक विशुध्द करून गांधीजींचा संदेश दूरवर पोंचविण्यासाठीं बध्दपरिकर झालें पाहिजे आणि ह्याच हेतूनें सेवाग्रामच्या संमेलनांत गांधीजींच्या दृष्टिकोनानें चालविलेल्या सर्व विधायक संस्थांचें एकीकरण करण्याच्या कार्यावर जोरहि दिला गेला आहे. ह्या संस्थांचें एकीकरण करून त्या संस्थांमध्यें कार्य करणाऱ्या सेवकांमध्यें बंधुत्वभाव वृध्दिंगत करून ठिकठिकाणीं हें विधायक कार्य वाढवावें असेंहि सेवाग्रामच्या संमेलनांत मागच्या वर्षीं ठरलेलें होतें. कुमाराप्पांचा ठराव तशा आशयाचा आहे. संस्थांचा मिलाफ झाल्यानें सर्वोदयी समाजाचें वातावरण वाढविण्यास मदतच होईल, मेळ्यांच्या द्वाराहि विशिष्ट प्रकारचें संघटन निर्माण करितां येईल अशी अपेक्षा बाळगण्यांत आलेली होती. ह्या दृष्टीनें कांहीं थोडासा उपक्रम झालेला आहे. शिवाय सर्व-सेवासंघ ह्या नांवाची एक संघटना विधायक कार्यकर्त्यांनीं निर्माण केली आहे. विधायक कार्यकर्त्यांनीं आचार्य कृपलानी त्यांच्या नेतृत्वाखालीं लोक-सेवक-संघहि स्थापन केला आहे. अनेक विधायक प्रवृत्तींच्या प्रांतनिहाय असलेल्या लोकांनीं सहकार्य करून जयपूर कॉंग्रेसच्या अधिवेशनास जोडून सर्वोदयी प्रदर्शनहि भरविलें; आणि विधायक कार्याचा नमुना जयपूर कॉंग्रेसमध्यें सामील झालेल्या लक्षावधि लोकांस दाखविला. आचार्य श्री. विनोबा ह्यांनीं जें परिभ्रमण देशाच्या कांहीं विभागांत केलें, तें सर्वोदयी समाजाचें वातावरण वाढविण्यास पुष्कळ अंशीं सहायभूत झालेलें आहे ह्यांत शंका नाहीं. कारण आचार्य विनोबा ह्यांच्याइतके परिणामकारक, तेजस्वी, प्रतिभावान् प्रचारक क्वचितच आढळून येण्यासारखे आहेत.

कॉंग्रेस सरकारें अनेक प्रकारच्या विधायक कार्यास चालना देत आहेत. सहकारी चळवळीचा आश्रय घेऊन, गांधीप्रणीत वर्धा-शिक्षणाची वाढ करून आणि ग्रामोद्योगास नाना प्रकारची मदत देऊन सरकार विधायक कार्याची अनेकविध रचना करीत आहे. आदिवासी जनतेच्या उन्नतीचें कार्य सरकारनें जोमानें अंगीकृत केलें आहे. परंतु सरकारचें कार्य अधिकारामुळें व सत्तेकडून प्राप्त झालेल्या मदतीमुळें व्यापक असलें तरी तें ध्येयप्रधान व स्फूर्तिमान् असूं शकत नाहीं. ही स्फूर्ति जनतेच्या खऱ्या जिव्हाळ्यानें, स्वार्थत्यागाची अंतःप्रेरणा होऊनच होऊं शकते. अशी ध्येयवादी भूमिका सरकारी क्षेत्राच्या बाहेर राहूनच निर्माण होऊं शकते. तशा कार्याचा उपक्रम झालेला आहे खरा; परंतु त्यांत शीघ्रता, जोर, गति ( momentum ) अपेक्षेप्रमाणें अद्याप निर्माण झालेली नाहीं, असें म्हणणें प्राप्त आहे. ह्या परिस्थितीचें मुख्यतः कारण मानसिकच आहे. प्रमुख विधायक कार्यकर्ते अनेक वर्षें सेवारत असले तरी त्यांच्या मनास गांधीजींच्या असाधारण व्यक्तित्वावर निर्भर राहण्याची संवय जडलेली आहे. एका महनीय व्यक्तीस आत्मसमर्पण करण्याची वृत्ति मनांत बाणल्यामुळें आपल्या स्वतंत्र व्यक्तित्वाचें विस्मरण कार्यकर्त्यांस झालेलें आहे. यंत्राच्या भागा-








.णें त्यांचें मन जडवत् झाल्यासारखें दिसत आहे. मोठ्या झाडाच्या छायेखालीं लहान झाडें वाढत नाहींत, तशीच अवस्था त्यांच्या व्यक्तित्वाची झाली आहे. आयसकण जसे लोहचुंबकास चिकटावे तसे गांधीजींच्या व्यक्तित्वास हे विधायक कार्यकर्ते चिकटलेले होते. लोखंडाच्या लहानमोठ्या तुकड्यांत लोहचुंबकाचे गुण उत्पन्न झालेले नसतात. अहिंसा किंवा प्रेम ह्यांची—मनोविकास करणारी, व्यक्तित्व वाढविणारी—शिकवण कार्यकर्त्यांच्या मनास लागलेली नाहीं. तत्त्वप्रधानता, वैराग्य, अध्यात्मनिष्ठा, स्वार्थत्याग, कळकळ इत्यादि थोर गुण ह्या विधायक कार्यकर्त्यांमध्यें दिसले तरी बंधुभाव, प्रेम, आदर, क्षमा, ऋजुता, नम्रता ह्या सामाजिक दृष्टीनें अत्यंत महत्त्वाच्या सद्गुणांची जोपासना त्यांच्या हृदयांत त्यांनीं केली आहे असें म्हणवत नाहीं. ह्या गुणांची कार्यकर्त्यांमध्यें वाढ झाल्याशिवाय सर्वोदयी समाजाचा आरंभहि होऊं शकत नाहीं. ' सर्वे यत्र विनेतारः सर्वे पंडितमानिनः । सर्वे महत्त्वमिच्छन्ति कुलं तत् अवसीदति ॥ ' हें सुभाषित गांधीजींच्या तालमींत वाढलेल्या कार्यकर्त्यांस मुळींच लागूं पडणार नाहीं, इतकी थोरवी त्यांना देतां येणार नाहीं.

## सांघिक प्रेम हें 'सर्वोदया'ची पहिली पायरी

विधायक कार्य करणाऱ्या संस्थांचें एकीकरण, संमिलित समिति, किंवा सर्वसेवासंघ ह्या संघटना अशासाठीं निर्माण झाल्या पाहिजेत कीं, कार्यकर्त्यांमधील सत्य आणि अहिंसामूलक शक्ती जागृत व्हाव्या; त्यांनीं नम्रता धारण करून निरहंकार वृत्तीची जोपासना करून एकमेकांची शक्ति संघशक्तीनें वाढवावी; त्यांचें लोकहितकारक वैशिष्ट्य एकमेकांमध्यें विलीन होऊन संघटित बळ वाढावें.

गांधी-विचाराच्या लोकांमध्यें गांधीजींच्या मृत्यूनंतर तरी निदान सर्वात्मभाव (' सर्वभूतहिते रतिः ') प्रथम निर्माण झाला पाहिजे.

बुद्ध नाहींसा झाल्यानंतर संघास शरण जाण्याची योग्य अशी प्रथा आहे; संघास शरण जाणें ह्याचा अर्थ निरहंकारवृत्ति बाळगून सर्वात्मभाव व 'सर्वभूतहिते रतिः' वाढविणें असाच होऊं शकतो अशा सर्वात्मभावी सेवारत लोकांनीं सत्याचा आग्रह धरला तरच समाजाची शुद्धि होऊं शकते.

सांप्रदायिक वृत्ति वाढूं नये असा योग्य कटाक्ष सेवाग्रामच्या संमेलनांत ठेवण्यांत आला होता. सर्वोदयी समाज सांप्रदायिक ( exclusive ) वृत्तीनें बनूं शकत नाहीं, आणि अहिंसा म्हणजे सांप्रदायिक वृत्तीचा मूलतः अभाव आहे, हीं विधानें निरपवाद आहेत. परंतु व्यक्तिगत प्रेम हें सांघिक प्रेमांत समाविष्ट करण्याची संवय लागल्याशिवाय आणि म्हणूनच प्रेमपूर्ण असे संघ बनविल्याशिवाय व्यक्तींस सामाजिक प्रेमाचें वळण मिळूं शकत नाहीं. सांघिक प्रेमाचीच पुढची पायरी सामाजिक प्रेम किंवा सर्वोदयी समाज ही आहे.

सामाजिक कार्यें करूनच सांघिक प्रेमाची शिकवण व्यक्तीस मिळूं शकते असें कित्येकांस वाटतें; तर इतरांस संघद्वारा बंधुभाव उत्पन्न करण्याची प्राथमिक गरज वाटते. कोणी बंधुभावावर जोर देऊन कार्यास गौण स्थान देण्यास तयार असतात, तर कांहीं सामाजिक कार्यास महत्त्व देऊन बंधुभाव आपोआप निर्माण होईल असें म्हणतात. कांहीं कर्मप्रधान असतात तर दुसरे भावनाप्रधान असतात. प्रकृतिभेद लक्षांत घेऊन ह्या दोन्हीहि मार्गांनीं सांघिक प्रेम किंवा सर्वात्मभाव आणि सत्याग्रही वृत्ति निर्माण करण्याचा प्रयत्न झाला पाहिजे.

गांधी-सेवा-संघाचें अलीकडे विसर्जन झालें आहे. सद्यःस्थितींत त्याचें पुनरुज्जीवन करून सर्वोदयी समाजाचें वातावरण वाढविण्यासाठीं गांधीसेवासंघांतील कार्यकर्त्यांचा पुष्कळ उपयोग होऊं शकेल. वरिष्ठ प्रतीचे समाजकार्यकर्ते निर्माण व्हावेत ह्या हेतूनें गांधी—मत—प्रणीत अशीं उच्च शिक्षण देणारीं विद्यापीठें निर्माण करण्याची गरज आहे. एकंदरींत गांधीजींच्या संस्कृतीचें वातावरण वाढविण्यासाठीं बंधनरहित आणि विरळ अशा स्वरूपाची सर्वोदयी समाजाची संघटना आणि गांधीजींच्या श्राद्धदिवशीं भरवावयाच्या मेळ्याची योजना ह्या व योग्य असली तरी तिचें कार्य उत्साहवर्धक रीतीनें अद्याप चाललेलें नाहीं. ह्या शैथिल्यास हिंदुस्थानाच्या आंतील व बाहेरील राजकीय बिकट परिस्थितीच मुख्यतः जबाबदार








आहे. राज्यकर्ते व कॉंग्रेसचे पदाधिकारी ह्यांची स्थिति कांहीं अंशानें अनुकंपनीय, असहाय, नाइलाजाची बनलेली आहे, आणि म्हणून विधायक कार्यकर्त्यांनीं बद्धपरिकर होऊन सांघिक कार्य जोमानें घडवून आणण्याची आवश्यकता आहे. सर्वसेवासंघ, गांधी-सेवासंघ, ग्रामोद्योग-संघ, तालिमी संघ, अखिल भारत-चर्खा-संघ, गोसेवा—संघ, हरिजन-सेवक-संघ, आदिवासी-सेवा-मंडळ, कस्तुरबा-स्मारक संघ, इत्यादि अनेक संस्थांचें व त्यांतील कार्यकर्त्यांचें एकीकरण करून, सर्वांनीं उत्साहानें आणि जोमानें कार्यास लागल्यास विरळ परंतु कार्यक्षम अशी सर्वोदयाची संघटना सर्व हिंदुस्थानभर पसरविण्यास फार दूरच्या भविष्यकाळावर विसंबण्याची गरज पडणार नाहीं. गांधीजींच्या श्राद्धदिनास कुंभमेळ्या-हून अधिक हितकारक, सात्त्विक आणि मंगल स्वरूप येण्यास फार विलंब लागण्याची आवश्यकता नाहीं. योग्य वातावरण हिंदुस्थानांत उत्पन्न झाल्यास गांधीजींचें पुनरुत्थान ( Resurrection ) हिंदुस्था-नांत होईल व अशा वातावरणाचा परिणाम दूर देशींहि झाल्याशिवाय राहणार नाहीं, हें सांगण्याची आवश्यकता नाहीं.

## राऊचें संमेलन

वरील विचाराच्या पार्श्वभूमिवरून प्रस्तुत लेख-कानें राऊच्या संमेलनाचें निरीक्षण केलें. बाबू राजें-द्रप्रसाद यांच्या अध्यक्षतेखालीं हें संमेलन १९४९ मार्चच्या ९।१०।११ तारखांस भरलें मागच्या वर्षीं सेवाग्रामच्या संमेलनानंतर स्थापन झालेल्या समितीचे मंत्री श्री. रघुनाथराव धोत्रे आणि मध्यभारतांतील इंदूर विभागाचे रहिवाशी श्री. वैजनाथ महोदय ह्यांनीं हें संमेलन बोलाविलें. श्री. वैजनाथ महोदय हे गांधी-सेवासंघाचे सदस्य अनेक वर्षें होते. आणि कांहीं काळ मध्यभारत प्रांताचे मंत्रीहि ते नियुक्त झालेले होते.

संमेलनास सुमारें सर्वोदयसमाजाचे ८०० सेवक बाहेरून आले होते. अजमासें दोन हजार लोकांनीं सर्वोदयसमाजाचें स्वेच्छेनें सदस्यत्व पत्करून आपलीं नांवें समितीकडे नोंदविलीं होतीं. ज्यांनीं नांवें नोंदविलीं, त्यांपैकीं सुमारें निम्मे सभासद संमेलनास स्वखर्चानें हजर राहिले ही नमूद करण्या-सारखी बाब आहे.

समितीचे मंत्री श्री. रघुनाथराव धोत्रे यांनीं हें स्पष्ट केलें कीं अनेक अडचणींमुळें व कार्यव्यापृ-तत्वामुळें समिति विशेष कार्य करूं शकली नाहीं. सर्वोदयसमाज-समितीकडे परदेशच्या कित्येक लोकांनीं पत्रें पाठविलीं. त्यांचीं उत्तरें देखील देण्यास समितीस सवड मिळालेली नाहीं. खुद्द श्री. धोत्रे दिल्लीस शरणार्थी लोकांच्या कार्यांत कित्येक महिने व्यग्र होते. संमेलन व मेळे कोठें व कसे भरवावयाचे हें ह्या वर्षींच्या आरंभापर्यंत निश्चित होऊं शकलें नाहीं. म्हणून शेवटच्या दोन महिन्यांतच त्यांनीं अविरतपणानें काम करून समितीला जागृति आणून २००० लोकांची नोंद कशीबशी केली. सर्वोदयसमाजांत हजारों लोक सामील झाले असते. परंतु अनेक कार-णांमुळें समितीस आपलें नियत कर्तव्य करणें शक्य झालें नाहीं.

संमेलन निश्चित होणार हें जाहीर झाल्यापासून समितीच्या कचेरीच्या कार्यास खरा आरंभ झाला. मार्च महिन्यांतच संमेलनाची तारीख मुक्रर झाल्या मुळें अधिकारपदस्थ अशा अनेक मंत्र्यांस अंदाज-पत्रकाबाबतच्या महत्त्वाच्या चर्चेमुळें संमेलनास हजर रहातां आलें नाहीं. कित्येक मूर्धाभिषिक्त अधिकारी व्यक्तींची अनुपस्थिति असतांहि हें संमेलन यशस्वी झालें, हा या संमेलनाचा एक विशेष समजतां येईल.

मागच्या वर्षींच्या संमेलनांत आचार्य श्री. विनोबा भावे व श्री. शंकरराव देव ह्यांच्यांमधील विचारांची देवाणघेवाण होऊन मेळ्याचा कार्यक्रम व सर्वोदय-समाजाची विरळ अशी संघटना हे दोन देशव्यापी कार्यक्रम निश्चित झाले.

ह्या वर्षी आचार्य विनोबा ह्यांनीं परिव्राजकाच्या भूमिकेनें देशांत फिरून जनतेचें सूक्ष्म अवलोकन केलें. त्यामुळें देशाची परिस्थिति त्यांना परमहंस वृत्तीनें अजमावतां आली व परदेशच्या लोकांच्या पत्र-व्यवहारामुळें सत्प्रवृत्तींच्या जागतिक मनाचें कांहीं प्रमाणांत ज्ञान होऊं शकलें. होरेस अलेक्झँडर व ॲगाथा हॅरिसन ह्यांसारख्या जगप्रसिद्ध क्वेकरपंथी लोकांच्या सहकार्यानें जागतिक शांतता-परिषद् हिंदु-स्थानांत बोलावण्याचें निश्चित झाल्यामुळें ह्या लोकांच्या सर्वोदयसमाजाबद्दलचें आकर्षण, कुतूहल व मदत ह्या भावनांची खोली कळून आली. ह्यामुळें










परिव्राजकाचार्य श्री. विनोबा ह्यांच्या सर्वोदयसमाजाबद्दलच्या आशा, आकांक्षा, निष्ठा पुष्कळच वाढल्या. असेंहि म्हणण्यांत अतिशयोक्ति नाहीं कीं आचार्य विनोबा हेच सर्वोदयसमाजाचे प्रमुख व खरे प्रचारक आहेत.

गेलीं तीस वर्षें क्षेत्रसंन्यास केलेले विनोबा आतां परिव्राजक झाले आहेत. त्यांच्या उत्साहामुळें राऊच्या संमेलनांत सामील झालेल्या कार्यकर्त्यांचींहि मनें नवीन आशेनें स्फुरण पावलेलीं दिसून आलीं.

आचार्य काकासाहेब कालेलकर ह्यांनींहि ह्या संमेलनांत गांधीजींच्या विचाराबद्दल सर्वोदयसमाजांतील सदस्यांची आस्था वाढविण्यास मदत केली. गांधीजींविषयक सर्वांगीण म्यूझिअम स्थापण्याच्या महदुद्योगांत काकासाहेब जारीनें खटपट करीत आहेत. त्यांनीं आपली योजना संमेलनांत थोडक्यांत विशद केली.

ह्या संमेलनांत श्री. किशोरीलालजी मश्रुवाला, गुलझारीलालजी नंदा यांनीं जनतेचें दुःख, त्यांची हलाखी व कष्ट, कांहीं तरी व्यवहार्य मार्गानें कमी करण्याचा उपाय शोधण्याची आवश्यकता मोठ्या कळकळीनें प्रतिपादिली. गुलझारीलालजी ह्यांनीं लोकसमूहांतील सर्व महत्त्वाच्या लोकांची नैतिक उंची वाढविण्याची एक योजना सुचविली. नैतिक वातावरण उत्पन्न करण्यासाठीं सद्यःकालीन सम्यक् आचारांचें एक प्रतिज्ञापत्रक त्यांनीं तयार केलेलें आहे. अशा प्रतिज्ञापत्रकावर हजारों लाखों लोकांच्या सह्या घेण्यानें जरूरीचें नैतिक वातावरण देशांत निर्माण होऊं शकेल अशी गुलझारीलाल यांची श्रद्धा आहे. हें प्रतिज्ञापत्रक निरपवाद आहे ह्यांत कांहीं शंका नाहीं. सर्वोदयसमाजांत सामील झालेल्या उपस्थित सज्जनांची संमति व पाठिंबा अशा प्रतिज्ञापत्रकाबाबत अध्याहृत धरणें योग्य आहे.— आचार्य कृपलानी ह्यांनीं ह्या वातावरणाची जबाबदारी सर्वस्वीं राज्यसत्तेवर आहे हें मोठ्या आवेशानें प्रतिपादिलें. व्यक्तिदृष्ट्या मनुष्य उच्च नैतिक पातळीवर पोंचण्यास दीर्घ कालाची जरूरी आहे; तत्काळ परिणाम पाहिजे असल्यास सत्तेच्या तर्फेंच मानवी मनावर हुकमत चालवितां येते आणि म्हणून अधिकारीवर्गामध्यें आणि मंत्रिमंडळामध्यें परिवर्तन होण्याची आवश्यकता आचार्य कृपलानी ह्यांस प्रथम भासत आहे. परंतु सत्तेच्या तर्फें जनतेचें त्वरित परिवर्तन तात्काळ घडवून आणण्याचा हा विचार सर्वोदयसमाजाच्या तत्त्वज्ञानास व वैचारिक बैठकीस मुळींच पोषक होऊं शकत नाहीं. कारण सर्वोदयसमाजाचा भर सर्वस्वीं साधनशुद्धीवरच आहे. सर्वोदयसमाजाची भिस्त प्रथम व मुख्यतः व्यक्तीच्या मानासिक व नैतिक वाढीवरच आहे. सत्तेकडून होणाऱ्या परिवर्तनास सर्वोदयसमाजाच्या दृष्टीनें केव्हांहि गौणच स्थान असणार.

## पाश्चात्य कार्यकर्त्यांची आस्था

परदेशच्या लोकांशीं सर्वोदयसमाजाचा संपर्क वाढविला पाहिजे ह्या ठरावाचें प्रतिपादन वर्ध्याच्या व्यापारी महाविद्यालयाचे प्राध्यापक श्रीमन् नारायण ह्यांनीं केलें. समितीकडे परदेशाहून आलेलीं, कांहीं अत्यंत निष्ठावान्, धर्मपरायण लोकांचीं कळकळीचीं पत्रें त्यांनीं वाचून दाखविलीं; त्या ठरावास पाठिंबा देतांना श्री. शंकरराव देव ह्यांनीं गांधी—विचारावरील सात्त्विक निष्ठा हिंदुस्थानी लोकांनीं वाढविल्याशिवाय परदेशच्या लोकांवर कांहीं परिणाम होण्यासारखा नाहीं, आपण आपली नैतिक साधना वाढविणें अत्यंत जरूरीचें आहे ह्या मुद्द्यावर जोर दिला. तमोगुणी राष्ट्रवादाचें भूत सर्व जगांत थैमान घालीत आहे, आपल्या राष्ट्राची नैतिक साधना वाढविल्याशिवाय साम्यवादासारख्या प्रभावी विचारसरणीस आळा घातला जाणार नाहीं असें जागतिक विचारांचा स्थूल आढावा घेऊन श्री. शंकररावांनीं प्रतिपादिलें.

त्याच ठरावावर श्री. होरेस ॲलेक्झँडर ह्यांनीं फार कळकळीचें भाषण केलें. गांधीजींचा देह हिंदुस्थानाचा होता; तरी त्यांची विचारसंपत्ति जागतिक होती, त्या विचारसंपदेचा आश्रय केल्याशिवाय जगांत शांतता नांदणें शक्य नाहीं. गांधीजींच्या विचारसंपत्तिरूप सूर्याच्या उष्णतेची ऊब अंतर्बाह्य मिळविण्यासाठीं गांधीविचारांचा दृष्टीनें स्वतःच्या हृदयपालट घडविण्यासाठीं, पांचपन्नास निवडक पाश्चात्य साधक येथें येण्याचा विचार करीत आहेत, त्या पाश्चात्य निष्ठावान् आध्यात्मिक यात्रिकरूंस सर्वोदयसमाजाकडून मदत मिळेल अशी बळकट








आशा ॲलेक्झँडर यांनीं व्यक्त केली. ॲगाथा हॅरिसन ह्या सुप्रसिद्ध स्त्रीनें हीच निष्ठा दाखविली. ह्या संमेलनांचें हें वैशिष्ट्य आहे कीं गांधीजींच्या विचाराच्या पाश्चात्य अनुयायांची संमेलनांबद्दल आणि सर्वोदयसमाजाबद्दल फार कळकळ व आपुलकी दिसून आली.

बाबू राजेंद्रप्रसाद "ह्यांनीं लढाईनंतर हिंदुस्थान नैतिक दृष्टीनें खालावलेला आहे, नैतिक उन्नति झाल्याशिवाय हिंदुस्थान गांधीजींचा अनुयायी म्हणवून घेण्यास अपात्र आहे, आर्थिक विषम विभागणी नष्ट करण्यास नैतिकतेचा पाया मजबूत केला पाहिजे, गांधीजींचीच विचारसरणी हिंदुस्थानास तारक आहे, ( Exploitation ) पिळणुकीऐवजी (Expropriation) अपरिग्रह हेंच तत्त्व स्वीकारण्यानें जगाचा नाश टळणें शक्य आहे आणि हाच गांधीवादाचा आशय आहे" हें आपल्या निरागस स्वभावानें श्रोत्यांस पटवून दिलें.

ह्या संमेलनांत गांधीजींचें वैशिष्ट्य साधनांची ही विशुद्धता असल्यामुळें दुसऱ्या कोणत्याहि जागतिक राजकारणी उपपत्तीपेक्षां ही विचारसरणी अत्यंत विलक्षण आणि म्हणून क्रांतिकारक आहे, ह्यावर पुनःपुनः वक्त्यांकडून जोर देण्यांत आला. श्री. विनोबांनीं सध्यांच्या अन्नधान्याच्या हलाखीवर तोड म्हणून जमीनमहसूल धान्याच्या रूपानें घ्यावा ही नवीन विचारसरणी पुढें मांडली. सार्वजनिक निधीबद्दलहि असाच एक नव-विचार त्यांनीं सांगितला. चांगल्या कार्याकरितां का होईना मोठमोठे निधी एकत्रित करण्यानें संपत्तीचें निष्कारण एकीकरण, व्याजबट्ट्याबद्दलची आसक्ति, द्रव्याधीनता, हे दोष सार्वजनिक निधीचें संचालन करणाऱ्यांमध्येंहि उत्पन्न होऊं पहात आहेत ते टाळण्यासाठीं निधी हे उपयोगापुरतेच जमवावे, दीर्घकालाचें कार्य लक्षांत घेऊन निधीचा संग्रह करण्याची प्रथा कार्यास व निधीची मदत घेणाऱ्या समाजकार्यकर्त्यांस हानिकारक आहे, पुंजीपतींची ( capitalist ) मनोवृत्ति मोठमोठ्या निधींच्या ट्रस्टींमध्यें उत्पन्न होऊं नये ह्यांवर विनोबांचा कटाक्ष आहे. श्री. काकासाहेब कालेलकर ह्यांनीं सद्यःकालीं अपरिग्रह आणि संयम ह्या गुणांवर, सज्जनता आणि तेजस्विता यांचा समन्वय साधणाऱ्या बंधुभावनेवर सर्वोदय समाजांतील सेवकांनीं जोर दिला पाहिजे हें सूत्रमय भाषेंत समजावून दिलें.

ह्या संमेलनांत असेंही ठरलें कीं गांधीजींच्या श्राध्ददिनाच्या दिवशीं सर्वोदयादिन साजरा व्हावा, त्या दिवशीं गांधीजींचीं व्रतें पाळलीं जावीं-विशेषतः सफाईचा कार्यक्रम हिंदुस्थानभर व्हावा, फेब्रुवारी १२ तारखेस अस्थिविसर्जनाच्या जागीं मेळे भरविण्यांत यावेत, आणि सर्वोदय संमेलन हें दरवर्षी राष्ट्रीय सप्ताहांत ( ६ एप्रिल ते १३ एप्रिल ) भरविण्यांत यावें.

## हिंदुस्थान आणि कम्युनिस्ट पक्ष

पुष्कळ लोकांना असें वाटतें कीं, कम्युनिस्ट पक्ष हा आपल्या देशांत सत्तारूढ होणार ! अर्थात अशा लोकांचें हें वाटणें बरवरचें असून, त्यांनीं या बाबतींत खोल आणि तपशीलवार विचार केलेला नसतो. चीनमध्यें दिसून आलेल्या कम्यूनिस्ट विजयानें लोकांच्या मनांत हा आभास उत्पन्न झाला आहे. परंतु हिंदुस्थान आणि चीनमधील परिस्थितींत फरक आहे. चीनला गेलीं ४० वर्षें शांतता कशी ती माहीत नाहीं. त्यामुळें चीनच्या आर्थिक जीवनाची घडी विसकटून गेलेली आहे. उलटपक्षीं हिंदुस्थानांत कायदा आणि सुव्यवस्था हीं अबाधित आहेत; हिंदुस्थानांतील राज्यकारभार करणारी शासनसंस्था कधींहि कोलमडून पडलेली नाहीं. हिंदुस्थानच्या परिस्थितीचें बरोबर मूल्यमापन करायचें असेल तर आणखीही एक गोष्ट लक्षांत घेतली पाहिजे. हिंदुस्थानच्या पंतप्रधानांचें धोरण व कारभार हीं चीनप्रमाणें जड-बधिर, संवेदनाशून्य व बिनलवचिक अशी नाहींत. ऐन आणीबाणीच्या वेळीं हिंदी पंतप्रधानांस जर असें वाटलें कीं, समाजरचनेंत क्रांतिकारक बदल करणें आवश्यक आहे, तर योग्य ते करायला ते मागें पुढें पहाणार नाहींत, असें मी मानतों. म्हणून सर्व गोष्टींचा विचार करून मी तर अशा निर्णयाला येऊन पोहोंचलों आहे कीं, कम्युनिस्ट पक्षाचें वर्चस्व हिंदुस्थानांत प्रस्थापित होणें ही गोष्ट फार दुरापास्त होय !

—आचार्य **नरेन्द्र देव**, ऑल इंडिया सोशालिस्ट कॉन्फरन्स, अध्यक्षीय भाषणांतून ६-३-४९.








मॅक्सिम गोर्की— अनुवादक : श्री. स. ह. मोडक

# मा णू स

माणसानें पृथ्वीवरून उड्डाण करायचें ज्ञान मिळविलें, आणि तत्क्षणीं त्याला याचें आश्चर्य वाटेनासें झालें, ही गोष्ट म्हणजे विसाव्या शतकांतील सर्वांत मोठी घटना आहे! माणसानें आपल्या अकलेच्या जोरावर लावलेल्या शोधांविषयीं, आपल्या हातांनीं निर्माण केलेल्या वस्तूंविषयीं त्याला नवल वाटेनासें होणें या गोष्टीला माझ्या मतें अतिशय महत्त्व आहे. आणि माझी कल्पना अशी आहे कीं विसाव्या शतकांतला माणूस असा विचार करूं लागतो :

'मला हवेंतून उड्डाण करतां येतें; पाण्यांतून पोहतां येतें; पूर्वीं कधीं खरेंहि वाटलें नसतें येवढ्या प्रचंड वेगानें मला पृथ्वीच्या पृष्ठभागावर धावरतां येतें, मीं रेडियमच्या रहस्याच्या शोध लावला, त्याचा उपयोग कसा करायचा याची रीत माहीत करून घेतली; मला वायरलेसच्या साधनानें माझ्या या ग्रहावरील हव्या त्या स्थळाशीं बोलतां येतें; मला तर असें वाटतें कीं लवकरच मी अमर जीवनाचें रहस्य शोधून काढीन. माझ्यापासून लपून राहिलेलें असें आणखी आहे तरी काय ?'

आणि आपला सर्वांत मोठा शत्रु जो निसर्ग त्याच्या अनेक कपटी वल्लप्त्यांचा निधडेपणानें व चिकाटीनें अभ्यास करून माणूस निसर्गाच्या अंगच्या साऱ्या सामर्थ्याचा स्वतःसाठीं भराभर उपयोग करून घेतो आणि स्वतःसाठीं "प्रतिनिसर्ग" निर्माण करतो. दरम्यान त्याचा दुःखी घाणेरडा जीवनक्रम तसाच चालू राहतो आणि 'स्वबांधवांविषयींची'' त्याची अगोदरच वाईट असलेली वृत्ति बदलून ती जास्तच वाईट होते !

'आपलें मुख्य लक्षण स्वतःकडे पाहून चाकित होणें हेंच असलें पाहिजे' ही गोष्ट माणसाला कळेपर्यंत त्याचें हें दुःखी क्षुद्र जीवन असेंच चालू राहणार. मी तरी असेंच गृहीत धरून चालतों. त्याच्या निर्माणशक्तीच्या संपूर्ण प्रमाणांत अजून तो स्वतःकडे पाहून कधींच चाकित झालेला नाहीं. आणि तसें पाहिलें तर आपल्या या जगामध्यें माणसाची विचारशक्ति, त्याची कल्पनाशक्ति आणि उपजत बुद्धि, त्याची दुर्दम्य कार्यशक्ति, हें माणसाचें कर्तृत्वच असें आहे कीं ज्याच्याकडे पाहून खरोखरी चाकित होणेंच योग्य ठरतें !

ग्रामोफोन, सिनेमा, मोटार या वस्तूंचें माणसाला नवल नाटतें ही गोष्ट विचित्रच, किंबहुना जराशी हास्यास्पदच नव्हे का ? उलटपक्षीं अनेक विक्षिप्त सुखसोईंची व मनाला विरंगुळा देणाऱ्या करमणुकींची सतत निर्मिति करीत राहिलेल्या माणसाला स्वतःकडे पाहून मात्र कसलेंच आश्चर्य वाटत नाहीं ! निरनिराळे नवे शोध व नवनवीं यंत्रेंहि जणूं काय त्यांचा निर्माता जो माणूस त्याच्या इच्छेनुसार निर्माण न होतां स्वेच्छेनेंच या जगांत अवतरलीं आहेत अशा रीतीनें लोक त्यांचें कौतुक करीत असतात !

माणसाविषयीं ज्या तऱ्हेचा विचार करायला आपण सरावलेले आहोंत, आणि माणूस स्वतःला जें समजतो, त्यापेक्षां फारच मोठ्या प्रमाणांत माणसाची महती वाढलेली आहे. मी हें जें विधान करतों आहे तें सर्वस्वी सगुण साकार माणसाला अनुलक्षूनच आहे. या माणसाला बऱ्याचशा उणीवांनीं व दुर्गुणांनीं शोभा आणलेली आहे; या माणसानें स्वतःच्या शेजाऱ्याचें व स्वतःचेहि मोठमोठे अपराध केलेले आहेत—अशाच



अनुक्रमणिका







माणसाविषयीं मी हें बोलत आहें. हा माणूस म्हणजे सत महापातकांचें निधान आहे ही गोष्ट जगजाहीर आहे :

हे वे खो र !—पण युगानुयुगें पक्ष्यांच्या उड्डाणाचा हेवा करतां करतां माणूस स्वतःच पक्ष्याप्रमाणें उड्डाण करायला शिकला आहे.

दुसऱ्याच्या श्रमाचा अपहार करायला टपलेला !—पण दुसऱ्याच्या श्रमावर जगतां जगतांच माणसानें विविध स्वरूपाची अफाट संपत्ति निर्माण केली आहे आणि या संपत्तींत माणसाचें श्रम बऱ्याच प्रमाणांत त्यांचविणाऱ्या अजब यंत्रांचीहि गणना होते.

स्त्री लंपट !— पण स्त्रीविषयीं पापी वासना मनांत धरतां धरतां त्यानें स्त्रीला भुलवायसाठीं व स्वतःला भूषवायसाठीं अमर सौंदर्यानें नटलेलें काव्य निर्माण केलें आहे.

फसव्या !—थापाड्या माणसानें प्रत्यक्ष अस्तित्वांत नसलेल्या अशा सुंदर सुंदर गोष्टी कल्पनेंतून निर्माण केल्या आहेत; स्वर्गसुखाचा उपभोग घेणारे ऑलिंपस पर्वतावरील देव निर्माण केले आहेत आणि त्यांच्याशीं वैर धरणारा प्रॉमिथ्यूस निर्माण केला आहे; वल्हाल्हा व सैतान हे निर्माण केले आहेत; किती तरी अद्भुत कथा निर्माण केल्या आहेत; डॉन क्विक्झोट, रॉबिन्सन क्रूसो, हॅम्लेट, फॉऊस्ट आणि असेच कितीतरी अनेक अजब लोक निर्माण केले आहेत !

लो भी !—कारण जेवढी पूर्णता त्यानें अगोदरच प्राप्त करून घेतलेली आहे तिच्यापेक्षां जास्त परिपूर्णता मिळवायसाठीं आपली ताकद खर्ची घालायला तो अजूनहि खळखळ करतो; आणि क्षुल्लक गोष्टींचा संग्रह करायचें त्याला व्यसनच लागलेलें आहे.

ग र्वि ष्ठ !—पण माझ्या मतें हें पाप नव्हे; कारण तो मागच्या पायांवर उभा राहून चालायला लागला व पुढच्या पायांचा उपयोग अत्यंत उत्कृष्ट हत्यारें म्हणून तो करूं लागला तेव्हांपासूनच त्याला स्वतःविषयीं गर्व बाळगायचा पूर्ण हक्क प्राप्त झालेला आहे.

आ ळ शी !—ह्या महापातकांमध्यें हें पाप सगळ्यांत जास्त थोर आहे; कारण या आळशीपणापायीं व स्वास्थ्याचा अकालीं लोभ धरण्यापायींच तो आपल्या जीवनाची हीन व तापदायक परिस्थिति इतक्या सावकाशीनें बदलत आहे.

हें सगळें सांगितल्यानंतर मला माणसाविषयीं पुढील विधानें करावींशीं वाटतात : माणूस हा भूतलावर वस्ती करून राहिलेल्या साऱ्या प्राण्यांपेक्षां जास्त गूढ प्राणी आहे; या प्राण्याला अफाट कल्पनाशक्ति आहे; स्वतः निर्माण केलेल्या गोष्टींचा विध्वंस करायचें त्याला बेफाट व्यसन लागलेलें आहे; हरप्रकारें स्वतःचा उपहास करून घ्यायची अजब करामत त्याच्या ठिकाणीं आहे; आणि स्वतःविषयीं नवल वाटून घ्यायची अपात्रता त्याच्या अंगीं आहे.

माणसाला चामड्यांत गुरफटलेल्या स्थितींत पाहणेंच ज्यांना जास्त आवडतें असे शहाणे लोक कदाचित् असें म्हणतील कीं हा माणसाला उगाच मोरपिसारा लावून सजवतोय !

वर सांगितलेलीं सत महापातकें क्षणभर बाजूला ठेवूं. त्यांतलीं कांहीं तर माणसाला शोभाच देतात !—पण त्यांखेरीजहि माणसाच्या अंगीं अनेक हीन, तिरस्करणीय, क्षुद्र उणीवा आहेत ही गोष्ट जगजाहीर आहे.

पण मला कसलाच नीतिवाद सांगायचा नाहीं हें वरच्या एकंदर विवेचनावरून दिसून येतेंच. आणि मला ढीगभर क्षुद्र हीन पापांची चिवडाचिवड करीत बसायची इच्छाहि नाहीं; कारण असला धंदा अगदींच घाणेरडा असतो. घाणेरडा म्हणायचें कारण असें : माणसाच्या लहानसहान उणीवांवर फाजील बारकाईनें लक्ष ठेवायचें व त्यांच्यावर फाजील जोरदार टीका करायची आणि याच्यांतून नेमकें साधायचें काय ?—आतां या जगांतील काटेकोर न्यायाधिशांना कदाचित् या प्रवृत्तीचें सुखहि वाटत असेल. पण एकंदरींत रोख असा कीं माणूस हा स्वभावतःच "शून्य" असतो हें माणसाला हीनपणा आणणारें त्याच्याविषयींचें सर्वसाधारण मत या मार्गानें नेमकें सिद्ध करायचें !

"आत्मिक शुद्धतेचे" भक्त, त्याचप्रमाणें आतां अगदीं गाभ्याच्या आंतपर्यंत सडून राहिलेल्या समाजाला आधारभूत पाया म्हणून उपयोगी पड-



अनुक्रमणिका






णाऱ्या अनेक बुरसलेल्या "रूढ कल्पनांपुढें" लीनपणें मान तुकवायच्या प्रवृत्तीचें कौतुक करणारे —या साऱ्या लोकांना हा दृष्टिकोन नक्कीच आवडतो.

या दृष्टिकोनाच्या योगानें माणसाला जास्तींत जास्त चांगल्या रीतीनें वागवायचें म्हणजे मला वाटतें कच्चा माल जसा आपण वापरतों तसें त्याला वागवायची आपल्याला मुभा मिळते. माणसांना आपल्या पायांखालीं तुडवतांना नीतिबाज लोक त्यांच्यावर स्मारकांसारखे उभे राहतात आणि येवढ्यावर त्यांचें पूर्ण समाधान होतें.

अर्थात् माणूस कधींकधीं स्वखुषीनें स्वतःची "शून्य" ही पदवी समर्थनीय ठरवतो या वस्तुस्थितीविरुद्ध मला युक्तिवाद करायचा नाहीं—मी स्वतःच कितीदां तरी त्याला या अवस्थेंत पाहिला आहे. पण "सामाजिक शिक्षणाच्या अवस्थेच्या" आधारें विचार करतां माणसाला "दुष्ट" होणें फार सोपें आहे, त्याला "सुष्ट" व्हायला अनुकूल कारणें फारच थोडीं आहेत! आणि साऱ्या गोष्टींना न जुमानतां जर तो "सुष्ट" झाला असला तर तो केवळ त्याचा वैयक्तिक गुण आहे, यावद्दल माझी पक्की खात्री झालेली आहे. माणसाकडे जर त्याच "दुष्ट बाजूनें" पाहिलें तर माणसाजवळ कौतुक करण्याजोगें कांहींच आढळत नाहीं—त्याच्या अंगीं अजबपणा आणणारें असें त्यांत कांहींच नसतें.

माझ्यामतें माणूस हा स्वभावतःच असा एक हुतात्मा आहे कीं ज्याला साधू व्हायची मुळींच इच्छा नाहीं; आणि या जगाच्या चितेंत स्वतःला गुरफटून घेऊन तो नुसताच थोर माणूस झाला आहे. डीफो, लोमोनोसोव, रूसो, पुष्किन, बायरन्, मुस्सोर्गस्की, मेंदेल्यीव, द लेसेप्स आणि अशाच प्रकारचे शेंकडों थोर पुरुष पाहतां हाच माणसाचा खरा स्वभाव आहे हें दिसून येतें. मीं नुकत्याच सांगितलेल्या प्रतिभासंपन्न पुरुषांपैकीं कांहीं-जणांचें वर्तन "नैतिकदृष्ट्या" अगदींच "संशयास्पद" होतें याची जर मीं आठवण करून दिली तर मी कुणाच्याहि भावना दुखावल्या असें होणार नाहीं अशी मी आशा करतों.

अर्थात् याचा गर्भितार्थ असा नव्हे कीं प्रतिभेची एखादी लाट जवळ येत आहे हें लक्षांत आल्याबरोबर लगेच आपण त्या प्रतिभावंताविषयीं कांहीं तरी लांच्छनास्पद प्रकार शोधून काढायला प्रेरित व्हावें. वयाच्या पंधरा व पंचवीस वर्षांच्या दरम्यान प्रत्येक माणूस स्वतःला प्रतिभावान् समजत असतो. पण बहुतेकांच्या बाबतींत ही समजूत खोट्या गर्भारपणासारखी असते; त्यांचीं सारीं लक्षणें खऱ्या गर्भारपणासारखींच असतात, आणि आंत मात्र कांहींच नसतें!

जीवनाकडे निराशावादी दृष्टीनें पाहावें, पण माणसाला मात्र हरप्रकारच्या आशावादीपणानें वागवावें हीच वृत्ति मला वाटतें फार चांगली ठरेल.

या विधानांत विरोधाभास आहे ? छेः !—- कां असावा विरोधाभास ? सध्यांपुरता विचार केला तर जीवन हें अजूनहि उत्कृष्ट कलावंताची अयशस्वी कारागिरीच आहे असेंच म्हणावें लागेल.

माणसाविषयीं या दृष्टिकोनांतून विचार केल्यास माणसाला अतःपर "शून्य" समजून चालायचें नाहीं, कुणाच्या तरी सुलसोईची उभारणी करायसाठीं लागणारा कच्चा माल म्हणून माणसाचा उपयोग करून चालायचें नाहीं; आणि त्याचबरोबर या दृष्टिकोनाच्या योगानें माणसाचा स्वतःच्या कृतीविषयींचा असंतोष वाढायला उत्तेजन मिळतें.

माणसाच्या मनांत सुधारणेची प्रेरणा कायमची जेवत ठेवायला पुरेसें दुःख जीवनांत सततचें राहणारच.

एकोणिसाव्या शतकाच्या सुरुवातीला असें सांगण्यांत येत असे : " माणसाच्या स्वेच्छाचाराला लगाम घालायसाठीं व त्याच्या बुद्धीच्या बेफाम लहरी छाटून टाकायसाठीं राज्यसंस्था उभारली जाते."

या विधानांतली कळकळ लक्षांत घेतां तें फारच चांगल्या रीतीनें मांडलें आहे; आणि त्याच्या अर्थाचा विचार केला तर तें फारच वाईट विधान आहे.

मागाहून, म्हणजे दहा वर्षांपूर्वी, रशियांत एक नव्या स्वरूपाचें सरकार उदयास आलें; आणि त्याचा उद्देश, माझ्या समजुतीप्रमाणें, एकंदर बहुजनसमाजाच्या निर्मितिक्षम शक्तींना पूर्ण स्वातंत्र्य देणें हा आहे. म्हणून माणसाला "शून्य" ठरविणारा हा जो समज जनतेच्या मनांत खोल रुजलेला आहे त्यांत बदल घडवून आणायची गरज इतर कोणत्याहि जनतेपेक्षां या रशियन जनतेला जास्त आहे.



अनुक्रमणिका






रशियांत सुरू झालेलें अचाट कार्य, तें पार पाडायच्या कामीं जनता किती प्रचंड उत्साहानें झटत आहे याची साक्ष, या कार्याच्या योगानें एव्हांच घडून आलेले परिणाम—या साऱ्या गोष्टींवरून माणूस हा आपण जी कल्पना करतों तिच्यापेक्षां एकंदरींत किती तरी जास्त चांगला आहे या मतालाच बळकटी येते. यावर मला बहुधा पुढील प्रश्न विचारण्यांत येईल:

"पण असें कां?— जेव्हां तेव्हां माणसाचें घोडेंच पुढें कां दामटायचें? त्याऐवजीं जनतेच्या निर्मितिक्षम शक्तींविषयीं बोलायला नको कां? नुसतेंच माणसाविषयीं बोलायचें म्हणजे हा व्यक्तिवाद नव्हे का?"

यांत व्यक्तिवादाचा थोडासा अंश आहे असें तर मला वाटतेंच. पण त्यांत कांहीं भिण्याजोगें आहे असें नाहीं मला वाटत. कारण अल्प प्रमाणांत विषाचें सेवन केल्यानें तें प्रकृतीला मानवतें ही गोष्ट महशूरच आहे. फॉस्फरस हें विष आहे—पण त्याच्याशिवाय आपल्याला जगतांच येणार नाहीं. जनता म्हणजे "रेडियो–ॲक्टिव्ह" (ज्यांत रेडियम आहे असें) द्रव्य आहे यांत शंका नाहीं; पण त्यांतून शुद्ध रेडियम काढायसाठीं अनेक दृष्टींनीं अनुकूल परिस्थिति निर्माण करायला हवी.

सोविएत लोकराज्यांत अशी अनुकूल परिस्थिति अंशतः निर्माण झालेली आहे व या अनुकूलतेची कक्षा जास्त जास्त विस्तृत व्हायचें काम चालूं आहे. कामगार–शेतकऱ्यांची सांस्कृतिक प्रगति निर्विवाद झालेलीच आहे. जनतेच्या सांस्कृतिक शिक्षणासंबंधांत रशियांतल्या इतका उत्साह व कौशल्य प्रगट करणारी राज्यसंस्था जगांत दुसरी कोणतीहि अस्तित्वांत नव्हती व नाहीं हें आपल्याला कबूल करणें भाग आहे.

रशियाला कठिण परिस्थितीशीं टक्कर द्यावी लागत आहे. ही वस्तुस्थिति नाकारतां येणार नाहीं; पण त्याचबरोबर युरोपांतील अत्यंत सुसंस्कृत राज्यें अशीच कठीण परिस्थिति चालू राहावी म्हणून व आणखी निर्माण व्हावी म्हणून मोठ्या उत्साहानें झटत आहेत आणि त्यांच्याचसारख्या अत्यंत सुसंस्कृत अशा युरोपियन सोशालिस्टांनीं समंजस निष्क्रियता व मुग्धता पतकरून त्यांना कसल्याहि प्रकारें अडथळा आणायचा नाहीं असें धोरण चालविलेलें आहे हीहि गोष्ट नाकारतां येणार नाहीं.

पण कितीहि हालअपेष्टा भोगाव्या लागत असल्या तरी त्यांच्यावर मात करून रशियाचें निर्माण–सामर्थ्य झपाट्यानें वाढत आहे. याचा एक पुरावा मॉस्को येथें डॉक्टरांच्या कॉंग्रेसमध्यें जाहीर झाला तो उदाहरणार्थ सांगतों : पूर्वी युरोपियन विद्वानांच्या नियतकालिकांमध्यें रशियन वैज्ञानिकांचे जिथें वीस ते तीस रिपोर्ट प्रसिद्ध होत असत तिथेंच आतां हा आंकडा शंभराच्यावर गेला आहे. झारशाहीच्या आमदानींत भूस्तरशास्त्रसंशोधनकमिटीच्या वार्षिक सरकारी खर्चाचें अंदाजपत्रक कांहीं लाख रुबलांपेक्षां कधींच जास्त नसे. आतांशा तें साठ लक्षांपर्यंत वाढलें आहे. शास्त्रीय शोधांची रेलचेल, प्रादेशिक पाहणीची सर्वव्यापी प्रगति, शास्त्रीय संशोधनाच्या मोहिमांची वाढती संख्या, शास्त्रीय संशोधन-संस्थांची वाढ, देशभर विद्युत्पुरवठा करण्याची यशस्वी कामगिरी—या साऱ्या आणि इतरहि अनेक गोष्टींवरून आंधळ्या व बहिऱ्या लोकांची देखील खात्री पटली पाहिजे कीं रशियानें खरोखरीच नवें जीवन जगायला सुरुवात केली आहे आणि रशियन माणसांची महती दहा वर्षांपूर्वी होती त्यापेक्षां जास्त वाढली आहे.

काव्य व गद्य लिहिणाऱ्या तरुण मंडळींची हल्लींयेवढी प्रचं. संख्या रशियामध्यें पूर्वी कधींहि नव्हती. रशियांत हल्लीं वाङ्मयाचें वेड सांथीच्या रोगासारखें सार्वत्रिक झालें आहे असें म्हटलें तरी चालेल. तरुण लेखकांच्या मार्गांत अनेकदां ज्या अडचणी उभ्या राहतात त्या मला ठाऊक आहेत. अर्थात् केवळ सवंग फायद्यासाठीं त्यांना वाङ्मयाचें आकर्षण वाटतें असा विचार मी तरी माझ्या मनांत आणूं देणार नाहीं. पहिली गोष्ट म्हणजे वाङ्मय लिहिणें हें सोपें नसतें. दुसरी गोष्ट म्हणजे बाहेरून घडणाऱ्या ज्या संस्कारांचा ठसा त्यांच्यावर उमटतो त्या संस्कारांपासून त्यांना लेखनाची प्रेरणा मिळते. तरुण लेखकांनीं लिहिलेलीं सुमारें दोनशें पुस्तकें मीं वाचलीं आहेत, आणि त्याच्या योगानें मला त्यांच्या-








विषयीं बोलायचा एक प्रकारचा हक्क प्राप्त झाला आहे असें मला वाटतें. स्वतःला पोहण्याचें ज्ञान मुळींच नसायचें आणि इतरांना मात्र पोहण्याची कला शिकवायचा प्रयत्न करायचा, अशा मंडळींपैकीं मी नव्हे !

माणूस हाच सगळ्या नाटकांचा, कादंबऱ्यांचा व लघुकथांचा नायक आहे; तो "जीवनाचा धर्नी" आहे. त्याच्या भोंवतालच्या निसर्गाचा तो वैरी आहे. जुन्या निसर्गाचा थांगपत्ता लावून त्यावर मात करून त्याच्या सुप्त सामर्थ्याच्या आधारावर तो " प्रति-निसर्ग " निर्माण करतो. तो स्वतःच्या ठिकाणच्या 'प्राचीन आदम 'बाबाचाहि वैरी आहे. म्हणून या माणसाविषयींची सध्यांच्या वाङ्मयाची वृत्ति मला समजून घ्यावीशी वाटते. आजच्या तरुण लेखकांना देवांचा वैरी असलेल्या व स्वर्गीय अग्नि पळवून नेणाऱ्या प्रॉमिथ्यूजपेक्षांहि या आदमबाबाचें चिंतन करणें जास्त रुचकर व जास्त मजेदार वाटत असावेंसें मला दिसून येतें. कालचा क्षुद्र व कवडीमोलाचा माणूस, मोठमोठ्या अचाट पातकांचा भुगा शोभतील अशा कितीक तरी बारीकसारीक पापांनीं भ्रष्ट होऊन बिघडलेला क्षुद्र माणूस,—हाच माणूस प्रत्येक पुस्तकांत आपली कर्तबगारी दाखवीत असलेला दिसतो—. कधींकधीं कृतीपेक्षां त्याचें बोलणेंच जास्त चालतें.

क्षुल्लक पाप करणारा माणूसहि थोर कलावंताला हल्लीं चांगली उपयुक्त सामग्री ठरूं शकतो यांत शंकाच नाहीं—मात्र त्या कलावंताला त्याचा क्षुद्रपणा ठासून मांडतां आला पाहिजे. उदाहरणार्थ, दस्तयेवूस्कीला हें चांगलें साधत असे. कारण खरी कला ही कमी-अधिक प्रमाणांत वास्तवतेवरच नेहमीं भर देत असते हें तो चांगलें जाणून होता.

तरुणांच्या दृष्टीनें माणूस अजूनहि " शून्यच " राहिलेला आहे. तसें म्हटलें तर गेल्या दहा वर्षांत अनेक लेखकांना माणसाच्या ठिकाणीं वीरपुरुष दिसलेला आहे आणि त्यांच्यापैकीं कांहीं लेखकांनीं तर स्वतःच वीरोचित कृति करण्यांत भागहि घेतलेला आहे. असें असूनहि त्यांच्या नजरेला माणूस म्हणजे " अमक्या गोष्टी करायसाठीं " माणूस, असाच दिसतो. साऱ्या अडथळ्यांवर मात करण्यास समर्थ असा अत्यंत अजब उत्साहाचा तो झरा आहे म्हणून तो माणूस, हें त्यांना दिसतच नाहीं !

बहुतेक बाबतींत, अशा प्रकारच्या लोकांना महारोग्याची उपमा लागू पडते. कलेची जादूसुद्धां त्यांच्यावर प्रभाव पाडूं शकत नाहीं. या बाबतींत आणखी एक मुद्दा सांगायचा म्हणजे असा कीं मुष्टियुद्धांत एक उत्कृष्ट नियम आहे. प्रत्येक प्रामाणिक लढवय्यानें त्याचें पालन करणें आवश्यक असतें. "खालीं पडलेल्याला लाथ मारायची नाहीं," मग तो हालचाल का करीत असेना, हा तो नियम. रोमरोमांत वेदना करणाऱ्या आंचक्यांचा फोटो घेणें हें वैद्यकशास्त्राच्या प्रगतीसाठीं आवश्यक असेल. पण या उद्योगाचा कलेशीं कांहींच संबंध नाहीं. माणूस आपला स्नेही नसला तरीहि त्याच्या आत्मिक मृत्यूचें दृश्य शारीरिक मृत्यूच्या दृश्याप्रमाणेंच आपल्याला बघवत नाहीं !

फोटोंचा उपयोग गुन्हेगार पकडायसाठीं यशस्वी रीतीनें होतो. पण "सुंदर देखावे", आकर्षक तरुणी, प्रख्यात चित्रकार व इतर अशाच दुर्मिळ दृश्यांच्या चित्रांनीं भिंती विद्रूप करायसाठीं फोटोंचा उपयोग जास्त वेळां होतो. वाङ्मयांत तर ते याहूनहि जास्त अस्थानीं ठरतात.

स्नेही आणि दोस्त असलेल्या माणसाचें चित्रण इतकें झगझगीत करायचें कीं तो जवळ जवळ ओळखूंहि येऊं नये ! आणि शत्रु असलेल्या माणसाचें चित्रण करायची प्रथा अशी कीं त्याला सर्रास काळाच रंग फासायचा व तो मूर्ख असतो असेंच बहुतेक सतत दर्शवायचें ! हें बरोबर आहे असें मला वाटत नाहीं.

जिथें दोन शत्रू असायचे तिथें दोन वीर पुरुष असतातच. ज्या लेखकाला कलावंत व्हायचें असेल त्यानें एक प्रकारें इतिहासकाराची भूमिका घेतलीच पाहिजे. शत्रु हा लढण्याची कला शिकविणारा चांगला शिक्षक असतो, त्याची शिकवणी बरीच महाग पडत असली तरी तो शिक्षक चांगला असतो, याची जाणीव लेखकानें ठेवली पाहिजे. आणि आपला वैरी वस्तुतः जेवढा सामर्थ्यवान् असेल त्याच्यापेक्षां त्याच्या सामर्थ्याचा अंदाज जास्त धरणें हेंच केव्हांहि चांगलें असतें.












हें विवेचन मुद्द्याला सोडून झालेलें असणें शक्य आहे. पण या प्रसंगीं शत्रूविषयीं एक गोष्ट मला तुम्हांला सांगावीशी वाटते.

मी आठनऊ वर्षांचा असतां मला एक शत्रु होता. त्याचें नांव वास्का क्लिन्यारेव. तो माझ्याच वयाचा होता. एका सरकारी अधिकाऱ्याचा मुलगा होता तो. अजब शूर मुष्टियोद्धा होता. पोलादाच्या कांबीसारखा सडसडीत व लवचिक होता. मी प्रत्येक प्रसंगीं त्याच्याशीं मुष्टियुद्ध खेळत असें. आम्ही रक्त येईपर्यंत लढत असूं, डोळ्यांतून पाणी येईपर्यंत लढत असूं; पण आम्ही वेदनामुळें नव्हतों रडत; या लढाईत तो अगर मी या दोघांपैकीं कुणालाच विजय मिळत नाहीं याचें वैषम्य वाटून आम्हांला रडूं येत असें!

अंग खरचटलेलें आहे, चेहरे आंबट झालेले आहेत, अंगांत ताकद मुळींच राहिलेली नाहीं, अशा स्थितींत शरमेनें आंसवें गाळीत आम्ही एकमेकांपासून दूर होत असूं.—मग पुन्हां नव्यानें आम्ही भिडायचों आणि आमची नवी लढाई व्हायची, आणि तरीसुद्धां विजय कुणालाच मिळायचा नाहीं! क्लिन्यारेवला एकदां असा चोप द्यावा कीं मी त्याच्यापेक्षां जास्त शक्तिवान् आहे हें त्याला मान्य करणें भागच पडावें, अशा आशेवर मीं एक सबंध हिंवाळा काढला. तिकडे तोहि त्याच आशेवर दिवस काढीत होता. आणि आम्ही दोघे एकमेकांचा भयंकर द्वेष करीत होतों. असा एकमेकांचा द्वेष मुलेंच करूं जाणत!

ईस्टरच्या आठवड्यांत मला क्लिन्यारेव एका आडगल्लींत भेटला. ही गल्ली घाणीबद्दल व दलदलीबद्दल फार प्रसिद्ध होती. सबंध उन्हाळ्यांत इथली राड कधींच सुकत नसे. एकदां एक घोडा इथल्या दलदलींत बुडून मेला अशी आख्यायिका लोक सांगत असत.

गल्लीची एक बाजू बागांच्या कुंपणाच्या कडेला लावलेल्या झाडांनीं सुशोभित झालेली होती. तिच्या दुसऱ्या अंगाला अगदीं लहान ओंगळ घरें होतीं व या घरांसमोर जाण्यायेण्यासाठीं लाकडी फळ्या आडव्या टाकलेल्या होत्या. आणि काय चमत्कार! क्लिन्यारेव रविवारचे स्वच्छ कपडे अंगांत घालून या फळ्यांवरून माझ्या रोखानें चाल करीत आला.

त्यानें माझ्यावर झडपच घातली. पण तो पाय घसरून पडला, त्याचे हात जवळजवळ कोंपरापर्यंत राडींत बरबटले. मीं त्याला उठून उभा राहायला मदत केली; तो माझ्यापासून दूर झाला आणि शर्टाच्या राड झालेल्या अस्तन्यांकडे टक लावून पाहात पाहात तोंड वांकडें करून गालांतल्या गालांत हसत म्हणाला, "मला मार मिळणार."

"मार मिळणार तुला?"

"होय" त्यानें एक सुस्कारा सोडून तेंच वाक्य पुन्हां उच्चारलें आणि मला विचारलें, "तुला कोण मारतं?"

"आजोबा."

"मला माझे बाबा मारतात."

बाप देखील फार जोरांत मारीत असला पाहिजे असा मीं माझ्या मनाशीं विचार केला आणि माझ्या शत्रूची समजूत घालायची मला इच्छा झाली.

मी म्हणालों, -"हे ईस्टरचे दिवस आहेत; कदाचित् ते मार देणं लांबणीवर टाकतील..."

पण क्लिन्यारेवनें हताशपणें मानेनें नकार दर्शविला. मग मीं त्याचा शर्ट धुवायला मदत देऊं केली. तो मुकाट्यानें कबूल झाला, तरी त्यानें एकदम संमति नाहींच दिली. या आडगल्लीच्या एका टोंकाला गुडघाभर पाणी असलेला एक खाडा होता. क्लिन्यारेवनें शर्ट अंगांतून काढला, मी खाड्यांत उतरलों आणि अस्तन्यांवरचा चिखल धुऊन काढूं लागलों. त्या दिवशीं मळभ आलेलें होतें. माझा शत्रु गारठ्यांत कुडकुडत उभा होता आणि मी किती निष्ठेपणानें त्याच्या शर्टाची वासलात लावीत होतों हें तो अगदीं उदास मुद्रेनें बघत होता. त्या शर्टाच्या डागांचा गडद पिंगट रंग जाऊन तो पिवळा झाला, तेव्हां तो हळू आवाजांत म्हणाला—

"धुऊन कांहींच फायदा झाला नाहीं. खराब झालेला सरळ दिसतोच आहे!"

थोडा वेळ विचार केल्यानंतर आम्हीं तो शर्ट सुकवायचें ठरविलें. मी त्या वेळीं रुबाबदार सिगरेटी—दोन आण्यांला दहा—ओढायला सुरुवात केलेली होती, आणि माझ्या खिशांत काड्यांची पेटी होती. आम्ही खाड्यांतून चढून बाहेर आलों. जवळच्या ओसा-








डींत एक जळून गेलेलें लोहाराचें दुकान होतें. त्याच्या अवशिष्ट भागांत आम्ही एक लहानशी शेकोटी पेटवली आणि शर्ट सुकवूं लागलों.

आम्ही एकमेकांशीं एक शब्दसुद्धां बोललों नाहीं. दोन शत्रूंना एकमेकांशीं बोलायला विषय तरी काय सांपडणार ?

धुरामुळें शर्ट काळा झाला. आम्हीं तो दोन ठिकाणीं जाळला : एका अस्तनीला एक लहानसें भोंक पडलें आणि पाठीवर मोठा भोसका पडला ! हा एक विनोदी प्रकारच झाला ! म्हणून आम्ही हंसलों—मात्र फारसें आनंदानें नाहीं हंसलों ! क्लिन्यारेवनें अजून ओलाच असलेला तो शर्ट कसाबसा अंगांत घातला. त्याचा चेहरा धुराच्या काजळीनें बरबटला, आणि तो कपाळाला आंठ्या घालून म्हणाला:

" आतां मी घरीं जातों. आज आपण लढणार नाहीं. "

तो गेला. मला त्याच्याबद्दल फार वाईट वाटलें. आणि मीं अगदीं शपथेवर सांगतों, त्या दिवशीं मीं खुषीनें माझ्या पाठीवर त्याच्या वडिलांच्या छड्या घेतल्या असत्या !

आणखी कांहीं दिवसांनीं मला माझा शत्रु पुन्हां भेटला आणि मी त्याला विचारलें:

" तुला मार मिळाला ? "

" तूं तुझें बघ, दुसऱ्याच्या उठाठेवी करूं नकोस." तो दोन्ही मुठी घट्ट मिटून उत्तरला. " चल ये, आज आपण लढूं या ! "

आम्हीं लढलों. मला वाटतें, पूर्वीपेक्षांहि जास्त निकरानें लढलों—पण तरीहि विजय मिळाला नाहीं तो नाहींच ! घुणा फुटल्यामुळें नाकांतून आलेलें रक्त शिंकरत माझा शत्रु कुंपणाच्या झाडांना टेंकून उभा होता. त्यानें मला सांगितलें :

" तुझे स्नायू पहिल्यापेक्षां जास्त बळकट झाले आहेत."

" तसे तुझेहि जास्त बळकट झाले आहेत " मी उत्तरलों. मी फूटपाथवरच्या एका दगडावर बसलों होतों; माझा एक डोळा सुजला होता आणि माझा ओंठ तडतडत होता.

येवढें एकमेकांशीं बोलल्यावर आम्ही अलग अलग झालों. आमच्या या उद्गारांमध्यें उद्वेगयुक्त हेवा जाणवत होता, इतकेंच नव्हे तर, गुप्तपणें का होईना, पण परस्परांविषयींचा आदरहि जाणवत होता. आम्ही केवळ एकमेकांचे शत्रूच नसून एकमेकांचे गुरूहि आहोंत अशा प्रकारची मोघम समजूतहि आमच्या या उद्गारांमध्यें जाणवत होती.

या प्रकारानंतर पुन्हां आम्ही दोन-तीनदां लढलों. पण विजय कुणाचा झाला आणि हरला कोण, हें आम्हांला कधींच कळलें नाहीं. कारण आम्हांला एकमेकांकडून मिळालेल्या गुद्द्यांच्या गुणाबद्दल अगर संख्येबद्दल आम्हीं कधीं चर्चाच केली नाहीं.

ऑगस्ट महिन्यांत दोन दिवस सतत पाऊस पडला. त्यानंतरच्या सकाळीं एका रस्त्याकडेच्या खाड्यांत क्लिन्यारेव मला अचानक दिसला. तो एका पडक्या कुंपणावर बसलेला होता. त्यानें हनुवटीला दोन्ही तळहातांचा धिरा दिलेला होता. त्यानें मान वर केली; त्याच्या तडफदार डोळ्यांच्या पापण्या मला लाल झालेल्या व सुजलेल्या दिसल्या.

"मला तुझ्याशीं लढायचंच नाहीं," तो म्हणाला.

" क्यालास ? " मी त्याला चिडवायसाठीं विचारलें. पण तो उत्तरला:

" माझी बहीण वारली. तेवढंच झालं असतं तर कांहीं विशेष नव्हतं, पण त्याहूनहि आणखी वाईट प्रकार झालाय् एक. माझी लष्करांत रवानगी व्हायचीय्. "

माझ्या दृष्टीनें क्रेमलिनमधील लष्करखात्याची इमारत तुरुंगाच्या इमारतीहून वेगळी होती. दोन्ही इमारती सारख्याच प्रचंड असल्या तरी लष्करखात्याच्या इमारतीला पांढरा रंग दिलेला होता. आणि तुरुंगाच्या इमारतीला घाणेरडा पिंवळा रंग दिलेला होता. त्या वेळीं मी एक अगदीं छोटासा माणूस होतों म्हणून मला या मोठमोठ्या इमारती आपलें शत्रुत्व करताहेत असें वाटे. या इमारतींनीं स्वतःच्या पोटांत कंटाळा लपवून ठेवलेला आहे व हा कंटाळा आपले डोळे फोडतो असा मला संशय येत असे.

माझा शत्रु या कंटाळवाण्या ठिकाणीं अटकून राहणार म्हणून मला त्याची दया आली. मी त्याच्याजवळ जाऊन बसलों आणि म्हणालों :










"अरे, मग पळून जा!"

पण तो उठून उभा राहिला. त्यानें आपली चिमुकली लढाऊ मूठ उघडली. त्याच्या या मुठीची ताकद माझ्या शरीराला कितीदां तरी अनुभवायला मिळालेली होती. या वेळीं त्यानें पहिल्या प्रथमच माझ्याशीं समेट करायसाठीं आपलीही मूठ माझ्या हातीं दिली.

त्यानें माझ्याकडे न पाहतां मान बाजूला फिरवून मंद स्वरांत सांगितलें : "बराय, येतों मी!" पण मला त्याचे ओंठ थरथरत असलेले दिसलेच. मीं मोठ्या नाखुषीनेंच त्याला "ये हं!" असें बोलून निरोप दिला.

मीं त्याला निरोप अर्थातच दिला. आणि मग किती तरी वेळ मी अगदीं उदास मुद्रेनें माझ्या लाडक्या शत्रूकडे पाहात राहिलों. तो अगदीं साव-काश, नाखुषीनें, खाड्यांतून वर चढला आणि निसरड्या व चिखलानें खरबलेल्या रस्त्यावरून चालता झाला.

आणि मग किती तरी दिवस मला शत्रूशिवाय जिणें म्हणजे अगदीं ओकेंओकें व उदासवाणें वाटत होतें.

लहान मुलांना सांगण्याजोगी गोष्ट आहे ही अर्थात्. आणि बालिश आहे ती. पण बालिशता हें माझें वशिंडच झालें आहे—हें माझें वैगुण्य माझ्या मृत्यूबरोबरच दूर होऊं शकेल; अर्थात् माणसांना तें दूर करतां येणारच नाहीं. इतर लोकांचीं वैगुण्यें दूर करायची खटपट करणारे दोन पायांचे उंटहि मला या कामीं उपयोगीं पडूं शकणार नाहींत.

हो, माझा आणखी एक पोरकटपणा सांगायचा राहिलाच. तो असा : अराजकवादामुळें दूषित झालेल्या व अनेक क्षुद्र मोहांच्या घातक विषारांमुळें भ्रष्ट झालेल्या वातावरणांत जन्माला आलेलीं व वाढलेलीं माणसें जर स्वतःमध्यें विकृति निर्माण करणाऱ्या सर्वस्वीं "नैसर्गिक" परिस्थितीला न जुमानतां या नैसर्गिक परिस्थितीचें दुर्दम्य वैरी होऊं शकतात तर माणसांना जें हवें तें साध्य करतां येणें असाच याचा अर्थ होतो.

माणसाला विध्वंस करण्याचा हक्क आहे. आणि विध्वंसाचें दुःख कुणाला? जे निष्क्रिय असतात, त्यांनीं कांहीं एक निर्माण केलेलें नाहीं, त्यांनाच विध्वंसाचें दुःख वाटतें.

दुःख करण्याचे दोन प्रकार असतात हें न सांगतांहि समजण्याजोगें आहे. वस्तूंचा "मालक"-हि दुःख करतो आणि वस्तूंचा निर्माताहि दुःख करतो; यांपैकीं निर्मात्यालाच दुःख करण्यावर हक्क सांगतां येईल.

माझ्या पोरकटपणाचे आणखी प्रकार असे : माणसाच्या छातींत संगीन खुपसणें अगर त्याच्या डोक्यांतून आरपार गोळी झाडणें याबद्दल लोक ज्या रासवट व ओंगळ रीतीनें लिहितात ती रीत जर लक्षांत घेतली तर हे अत्याचार करणें म्हणजे अगदींच साधी गोष्ट असली पाहिजे असें वाटतें. खुनांचीं जीं वर्णनें आपण अनेकदां वाचतों त्यावरून माणूस हा "शून्य" आहे असें मानण्याची वृत्ति आपल्या मनांत किती खोल रुजलेली आहे हेंच आपल्याला जाणवतें.

लोकांना एकदां लढाई करायची सवय जडली म्हणजे तुलनात्मकदृष्ट्या शांततेच्या जीवनांत त्यांना अनुकूल स्थानच सांपडेनासें होतें असें दिसतें. वास्तविक पाहतां सशस्त्र लढाईपेक्षांहि शांततेच्या जीवनांतच माणसाला हरप्रकारचा उत्साह व सगळी इच्छाशक्ति किती तरी जास्त प्रमाणांत एकसारखी सतत ताणून ठेवावी लागते.

एका तासाचे, एका दिवसाचे अनेक वीरपुरुष होऊन गेलेले आपण पाहिले! पण त्यांनीं आपल्या पाठीमागें जीवनांत कसलाच ठळक मागमूस ठेवलेला नाहीं; आणि त्यांच्या कृतींत निर्विवाद धैर्य प्रत्ययाला येत असलें तरी जीवनाची भयंकर परिस्थिति त्यांना बदलतां आली नाहीं.

आतां ज्या अर्थीं ही परिस्थिति बदललेली आहे, त्या अर्थीं या बदललेल्या परिस्थितींत आणखी प्रगति घडवून आणून माणसाच्या निर्माणशक्तीला जास्त स्वातंत्र्य मिळवून देण्यासाठीं चिकाटीनें झगडलें पाहिजे—त्यासाठीं एका तासापुरतें शौर्य गाजवून भागायचें नाहीं, सारा जन्मभर शौर्य गाजवीत राहिलें पाहिजे.

जन्मभर शौर्य गाजवीत राहणें आणि एका तासापुरतें शौर्य गाजविणें यांतला मूलभूत फरक









अनुक्रमणिका

आमच्या तरुण लेखकांना स्पष्टपणें जाणवलेला नाहीं असें मला वाटतें. श्रमामध्यें काव्य आणण्याची आवश्यकता त्यांच्या अजून लक्षांत आलेली नाहीं. विविध पूर्वग्रहांनीं दगाळलेल्या व मारावलेल्या मानवी संवेदनेंत "माणूस हा 'शून्य' नाहीं" ही माणसाला परिचित नसलेली कल्पना घुसविणें ही गोष्ट फार कठीण आहे-माणसाला ठार मारण्यापेक्षां ती किती तरी अधिक कठीण आहे !

विज्ञानाचे चमत्कार, कलेची जादू, या भूतलावरील महान् मानवाला ज्यांचा अभिमान वाटावा अशा सान्या गोष्टी, ज्या पूर्वी अस्तित्वांत नव्हत्या त्या कशा रूढ झाल्या ? माणसाचा बेफाम धैर्यशालीपणा त्याच्या कल्पकतेचें व उपजतबुद्धीचें सामर्थ्य, यांच्या योगानेंच या सान्या गोष्टी रूढ झाल्या.

आणि हा कल्पकतेचा व उपजतबुद्धीचा धैर्यशालीपणा, हा चिकाटीचा उद्योग-यांच्या जोरावरच आपण सान्या गोष्टी साध्य करून घेऊं. ज्या अजून अस्तित्वांत नाहींत पण पुढें ज्या अस्तित्वांत येतील, त्या सान्या गोष्टी आपण साध्य करून घेऊं. आपण तशी नीट इच्छा मात्र केली पाहिजे.

आपल्याला जें व्हायला हवें असेल तें होतां येतें ही गोष्ट माणसानें हजारदां सिद्ध करून दिली आहे.

* * *

१९२७ च्या मार्च महिन्यांत आयझॅक न्यूटनची २०० वी पुण्यतिथि साजरी करण्यांत आली. न्यूटन हा या जगांतील एक अत्यंत प्रतिभासंपन्न पुरुष होता. वेस्टमिन्स्टर ॲबेमधील त्याच्या थडग्यावर पुढील लेख आहे :

"मानवजातीचें एवढें थोर भूषण अस्तित्वांत होतें याबद्दल सर्व मर्त्य मानवांनीं खूप झालें पाहिजे."

फारच सुंदर आहे हें वचन !

माणूस हें जगाचें भूषण आहे आणि स्वतःकडे पाहून आश्चर्यचकित होण्याला त्याच्याजवळ भरभूर कारणें आहेत.

---

## सदाचाराची प्रतिज्ञा

राऊ येथील सर्वोदय-संमेलनापुढें श्री. गुलझारीलाल नंदा यांनीं एक जें प्रतिज्ञापत्रक तयार करून मांडलें तें खालीं दिलें आहे—

"एकाद्या व्यक्तीमध्यें आणि राष्ट्रामध्यें प्रेम, निर्मळपणा, निःस्वार्थीपणा, प्रामाणिकपणा हे सद्गुण किती प्रमाणांत आहेत यावरच त्या व्यक्तीचें आणि राष्ट्राचें बळ व योग्यता हीं अवलंबून असतात अशी माझी श्रद्धा आहे. म्हणून मी अशी प्रतिज्ञा करतों कीं : १ मी काळ्या बाजारांत कांहीं विकणार नाहीं किंवा विकत घेणार नाहीं; २ मी लांच घेणार नाहीं किंवा देणार नाहीं; ३ ठराविक दर्जापेक्षां कमी प्रतीची विकाऊ वस्तु मी जाणूनबुजून तयार करणार नाहीं, किंवा कमी माप देणार नाहीं; ४ विकाऊ जिनसेंत मी भेसळ करणार नाहीं; ५ कोणाहि व्यक्ती-किंवा-गटाविरुद्ध मी खोटे आरोप करणार नाहीं; ६ जो आरोप शाबीत झाला नाहीं, त्याचा मी उच्चार करणार नाहीं; ७ कर देणें मी चुकवणार नाहीं; ८ ज्या एखाद्या सार्वजनिक संस्थेंत वा सार्वजनिक कार्यांत मी सल्लागार किंवा कार्यकर्ता असेन, त्यामध्यें आपला सल्ला देतांना किंवा कार्य करतांना वैयक्तिक किंवा विशिष्ट गटाच्या हितसंबंधांचा परिणाम माझ्यावर होऊं देणार नाहीं; ९ सार्वजनिक वाहनांतून विनतिकिटानें प्रवास करणार नाहीं; १० (अ) एखाद्याला नोकरी अन्याय्य साधनांनीं मिळवून देणें, (आ) एकाद्याला मक्ता, परवाना, किंवा दुसरा एकादा फायदा अन्याय्य मार्गांनीं मिळवून देणें, (इ) अनावश्यक किंवा फाजील खर्च करणें, (ई) घाण, कचरा वगैरे हलगर्जीपणानें टाकून उपद्रव देणें-या गोष्टी मी समाजविरोधी मानीत असून त्यांपासून दूर रहाण्याची व त्या समाजांतून मोडून काढण्याची मी पराकाष्ठा करीन; ११ या सदाचार-प्रसारक कार्यामध्यें भाग घेणारा एकादा माणूस ही प्रतिज्ञा पुरी करीत असतांना जर त्याला एकादा अन्याय होणार असेल किंवा झाला असेल तर तो निवारण्याच्या कामीं मी शक्य ती सर्व प्रकारची मदत करीन."

—'हरिजन' वरून (२०-३-४९).








प्रा. ना. अ. गोरे

# भारतीय संस्कृतीचा चिनी संस्कृतीवरील प्रभाव

आपल्या भरतवर्षाप्रमाणेंच चीन देशाची संस्कृति फार प्राचीन आहे. ज्या वेळीं पाश्चात्य राष्ट्रें मागासलेलीं होतीं त्या वेळीं देखील विद्या, कला नि शास्त्रें यांत चीननें मोठी प्रगति केलेली होती व एक सुसंस्कृत व पुढारलेला देश म्हणून तो प्रसिद्धि पावला होता. इतकेंच नव्हे तर छापण्याची कला, कागद व बंदुकीची दारू अशा महत्त्वाच्या व दूरपरिणामी गोष्टींचा शोध लावण्याचें श्रेय सुद्धां चीनचेंच आहे. चीनचा इतिहास पुरातन असून इसवी सनापूर्वी २७०० वर्षांपर्यंत तो मागें जाऊं शकतो असें आधुनिक संशोधकांनीं ठरविलेलें आहे. अशा या पुरातन व सुसंस्कृत देशाशीं भारताचा इसवी सनाच्या तिसऱ्या शतकापासून जो संबंध जडलेला आहे तो आज मितीलाहि चालूच आहे, व या दोन देशांत नेहमीं स्नेह व परस्पर आदरच नांदत आहे. कारण शस्त्राच्या व सामर्थ्याच्या जोरावर एकानें दुसऱ्यावर आक्रमण करण्याचा हीन प्रयत्न या दोन देशांनीं कधींच केलेला नाहीं. इतकेंच नव्हे, तर चिनी लोक हे भारतीयांना वडील बंधूसारखा मान देतात. कारण भारतीय संस्कृतीचा आपल्या संस्कृतीवर परिणाम झालेला आहे हें चिनी विद्वानच मान्य करतात. नुकताच एका इंग्रजी त्रैमासिकांत श्री. तान् यू शान या चिनी विद्वानाचा लेख वाचनांत आला, त्याच्या आधारें पुढील माहिती मराठी वाचकांपुढें मांडावयाचें या लेखांत योजिलें आहे.

## सांस्कृतिक दळणवळण अकराशें वर्षें चालूं

जुन्या चिनी ग्रंथांवरून पहातां इसवी सनापूर्वी तीन-चारशें वर्षें आधींच भारतीय भिक्षू व धर्मप्रचारक चीन मध्यें गेले होते असें दिसतें. पण त्या विधानांना निश्चित स्वरूपाच्या ऐतिहासिक पुराव्याचा आधार नाहीं. परंतु चिन्, हन् आणि तंग या राजघराण्यांची सत्ता चीनवर होती तेव्हां म्हणजे इ.स. पूर्व २५५ पासून इ. स. ९६० पर्यंतच्या सुमारें अकराशें वर्षांच्या दीर्घ कालखंडांत चिनी संस्कृति व सभ्यता यांवर भारतीय सभ्यता व संस्कृति यांचा प्रभाव निर्विवादपणें पडला असल्याचें संशोधकांनीं मान्य केलें आहे. बुद्ध धर्माचा चीनमध्यें प्रवेश झाल्यापासून भारतीयांच्या चीनशीं चालू झालेल्या संबंधाचे उल्लेख त्या देशाच्या ऐतिहासिक कागदपत्रांतून मिळूं शकतात. इ. स. ६७ या वर्षीं हन् राजघराण्यांतल्या चिनी सम्राटानें आपल्या लो यंग या राजधानींत बुद्ध भिक्षूंचें जाहीर स्वागत केल्याचें चिनी ग्रंथांत नमूद केलेलें आहे. यानंतरच्या काळांत पुष्कळ चीनदेशीय विद्वान् बुद्ध-धर्माच्या अध्ययनासाठीं, धर्मग्रंथांच्या पोथ्या मिळविण्यासाठीं व दुर्मिळ ग्रंथांच्या नकला करून घेण्यासाठीं या देशांत येऊं लागले व अनेक बुद्ध भिक्षू हिंदुस्थानांतून चीनमध्यें धर्मप्रचारासाठीं जाऊं लागले. भारतांतून गेलेल्या चोवीस व काश्मीरांतून गेलेल्या तेरा हिंदी पंडितांचीं नांवें आजहि चीनमध्यें प्रसिद्ध आहेत; व त्याच हजार वर्षांच्या काळांत १८७ चिनी पंडित हिंदुस्थानांत गेल्याचें उल्लेख चिनी वाङ्मयांत उपलब्ध असून त्यांतल्या १०५ विद्वानांचीं नांवें व त्यांनीं केलेलें वाङ्मयीन व धार्मिक कार्य अद्यापहि चिनी अभ्यासकांच्या परिचयाचें आहे– अशी माहिती कै. रवींद्रनाथ टागोरांचें स्वागत १९२७ सालीं करतांना, चिनी विश्वविद्यालयसंघाचे विद्वान् अध्यक्ष लिआंग ची चौ यांनीं दिली होती.








## हिंदुस्थानांत येऊन गेलेले कांहीं चिनी पंडित

चीनमधून हिंदुस्थानांत आलेल्या चिनी पंडितांपैकीं फाहिआन् किंवा फा शीन् (Fa-Shien) ह्युआन्त्संग किंवा हुएन्त्संग (Huan-Tsang) व इत्सिंग (I-Tsing) हे सुप्रसिद्ध आहेत. फाहिआन् हा सुमारें इ. स. ३९९ मध्यें चीनहून भारताच्या प्रवासाला निघाला व तक्षशिला, पेशावर, ताम्रलिप्ती, पाटणा, मथुरा, अयोध्या, कनौज या स्थळीं राहून इ. स. ४१४ च्या सुमाराला चीनला परत गेला. बुध्द-धर्मग्रंथांचा विशेष अभ्यास करावा, बुध्द-धर्मग्रंथांच्या नकला करून घ्याव्या व विनय-पिटकाची शुध्द प्रत मिळवावी असे हेतू मनांत धरून तो हिंदुस्थानांत आला होता, व आपल्या कार्यांत यशस्वी होऊनच तो स्वदेशीं परतला.

ह्यूआन्त्संग या विद्वान् व मार्मिक चिनी प्रवाश्याचें नांव तर जगप्रसिध्द झालें आहे. इ. स. ६२९ सालीं तो हिंदुस्थानांत यावयास निघाला. काश्मीरमध्यें निरनिराळ्या मठांत अध्ययनासाठीं तो दोन वर्षें राहिला. नंतर मथुरा, गंगा-यमुना नद्यांच्या कांठचीं इतर प्रसिध्द स्थलें, स्थानेश्वर इत्यादि ठिकाणांना भेट देत देत तो कनौजला आला. हिंदूंचीं व बौद्धांचीं प्रख्यात अशीं क्षेत्रें पाहून त्यानें नालंदा येथील मठांत संस्कृत भाषा व बौद्ध तत्त्वज्ञान यांचा अभ्यास केला व इतर अनेक ठिकाणें अवलोकन करून सुमारें १५ वर्षांनीं तो चीनला परत गेला. जातांना त्यानें पुष्कळ मूर्ती व ८५७ ग्रंथ आपल्याबरोबर नेले व त्यांतील ७३ ग्रंथांचें त्यानें चिनी भाषेंत भाषांतर केलें. चिनी सम्राट् ताइ सुंग याच्या सूचनेवरून इ. स. ६४८ मध्यें त्यानें आपलें प्रवासवृत्त लिहून पुरें केलें. हिंदुस्थानच्या प्राचीन इतिहासाच्या अभ्यासकांना तत्कालीन परिस्थिति समजून घेण्याला व कालनिर्णयाला या ग्रंथाची अमोल मदत होते.

इत्सिंग हा ह्यूआन्त्संगच्या मागून सुमारें ४० वर्षांनीं, इ. स. ६७३ त हिंदुस्थानांत आला. नालंदा येथें राहून त्यानेंहि बुद्धधर्माचें अध्ययन केलें व बुद्धगया, बनारस, श्रावस्ती, राजगृह, वैशाली इत्यादि शहरीं प्रवास करून इ. स. ६९५ त तो परत चीनला गेला. इत्सिंगनें सुमारें ४०० ग्रंथ हिंदुस्थानांतून चीनमध्यें पाठविले व त्यांतील ५६ ग्रंथांचें स्वतः चिनी भाषेंत भाषांतर केलें.

## चीनमध्यें गेलेले भारतीय पंडित

चीनमध्यें धर्मप्रसाराला गेलेल्या बौद्ध भिक्षूंमध्ये काश्यप-मतंग, कुमारजीव आणि गुणरत्न हे विशेष प्रसिद्ध आहेत. श्री. तान् युन शान यांच्या मतें, काश्यप-मतंग हाच चीनमध्यें जाऊन धर्मप्रसार करणारा पहिला बुद्धभिक्षु. हा इसवी सन ६७ या वर्षी चीनमध्यें गेला. त्याच वर्षी, एका बौद्ध सूत्रग्रंथाचें चिनी भाषेंत रूपांतर केल्यावर थोडे दिवसांनीं तो लोयान येथील मठांत मरण पावला. कुमारजीव व गुणरत्न यांनीं अनेक संस्कृत ग्रंथांचीं चिनी भाषेंत भाषांतरें केलीं आहेत; त्यांनीं भाषांतर केलेल्या ग्रंथांचीं संख्या अनुक्रमें ९४ व ६४ आहे. चिनी व भारतीय पंडितांनीं संस्कृत व पाली ग्रंथांच्या चिनी भाषांतराचा जो प्रचंड उद्योग अंगीकारून यशस्वी रीतीनें पार पाडला त्याला तत्कालीन परिस्थिति विचारांत घेतां जगाच्या इतिहासांत देखील तोड सांपडणार नाहीं असा अभिप्राय श्री. तान् युन शान यांनीं व्यक्त केला आहे.

## हिंदी संस्कृतीचा चीनवर पडलेला प्रभाव

हिंदी संस्कृतीचा प्रभाव चीनच्या धर्मावर आणि वाङ्मयावरच पडला असें नव्हे तर तो चीनच्या सर्वच सांस्कृतिक जीवनावर झालेला दिसून येतो. त्याचें शब्दांनीं संपूर्ण वर्णन करणेंहि शक्य होणार नाहीं. बौद्ध धर्म हा केवळ दुय्यम दर्जाच्या राष्ट्राचा धर्म न रहातां त्याला क्रमाक्रमानें अग्रगण्य स्थान प्राप्त झालें. कन्फ्यूशिअस (इ. स. पूर्वी ५५० ते ४७८) व लाओ त्सु हे दोन सर्वश्रेष्ठ चिनी तत्त्वज्ञ होऊन गेले. पण त्यांच्यापेक्षां भगवान् गौतम बुद्धाच्या शिकवणीकडेच हळूहळू सामान्य चिनी माणसाचा ओढा वाढूं लागला. आज जर पाहिलें तर चीनमध्यें शहरांतच नव्हे तर खेडोंपाडीं देखील बौद्धधर्मीय देवळें, विहार व मंदिरें आढळून येतात. पण कन्फ्यूशिअस व लाओ त्सु या तत्त्ववेत्त्यांचीं देवळें मात्र मोठीं शहरें, प्रांतीय राजधान्या व जिल्ह्यांचीं ठिकाणें अशा जागींच मात्र दृष्टीला पडतात.



अनुक्रमणिका






# भारतीय संस्कृतीचा चिनी संस्कृतीवरील प्रभाव

इतकेंच नव्हे तर चिनी तत्त्वज्ञान, कला, वाङ्मय, संगीत, नृत्य, शिल्पशास्त्र इत्यादि अनेक विविध क्षेत्रांत हिंदी संस्कृतीची छाप पडलेली दिसते. हन् राजघराण्याच्या काळापासून कन्फ्यूशियन-पंथीय व ताओसंप्रदायी लोकांच्या तात्त्विक विचारसरणीवर भारतीय, विशेषतः बौद्ध तत्त्वज्ञानाचा, बराच परिणाम झालेला आढळतो; व तंग राजघराण्याच्या कारकीर्दीपासून तर चिनी वाङ्मयावर सुद्धां भारतीय वाङ्मयाच्या स्वरूपाचा व लेखनशैलीचा लक्षांत भरण्याजोगा प्रभाव पडलेला दिसून येतो. चिनी लिपि ही खरोखर पहातां हिंदी लिपांहून सर्वस्वी भिन्न. पण तीवर देखील भारतीय लिपीचा परिणाम झाल्यावांचून राहिला नाहीं. तंग राजघराण्यांतल्या शोऊ-वेन् ( Shou-Wen ) नांवाच्या बुद्धधर्मीय गृहस्थानें संस्कृतच्या आधारानें चिनी लिपीचीं ३६ मूळाक्षरें तयार केलीं व त्यामुळें चिनी भाषेचे उच्चार व यमकें यांत मोठीच क्रांति घडून आली. कला व स्थापत्य या क्षेत्रांत चीन हिंदुस्थानकडून पुष्कळच गोष्टी शिकला. मंदिरें बांधण्याची कला, पुतळे तयार करण्याची हातोटी, भिंतीवर काढावयाचीं चित्रें रंगविण्याचें कसब इत्यादि पुष्कळच कलात्मक गोष्टी चिनी लोकांनीं हिंदी लोकांशीं झालेल्या संघटनांमुळेंच आत्मसात् केल्या.

भारतांत उत्पन्न झालेल्या बौद्ध धर्माचा स्वीकार केल्यानें चीनचा संबंध भारताशीं आला व त्याचा परिणाम भारतीय संस्कृतीचा व वाङ्मयाचा प्रभाव चिनी वाङ्मयावर व संस्कृतीवर पडण्यांत झाला, तरी आज मात्र भारतीय विद्वानांनाच प्राचीन चिनी विद्वानांच्या वाङ्मयीन कार्याबद्दल आभार मानावेसे वाटतात. त्यांनीं भाषांतर करून का होईना आपल्या अनेक ग्रंथांचें संरक्षण केलेलें आहे व कांहीं ग्रंथ तर असे आहेत कीं त्यांचें मूळ संस्कृत किंवा पाली स्वरूप हिंदुस्थानांत उपलब्ध नाहीं पण त्यांचीं चिनी भाषांतरें मात्र अजूनहि सांपडूं शकतात ! अशा नष्टप्राय, दुर्मिळ ग्रंथांचा अभ्यास करून त्यांतील माहिती मिळविण्याचा पद्धतशीर अभ्यास कै. डॉ. रवींद्रनाथ टागोरांनीं संस्थापिलेल्या शांतिनिकेतन या विश्वविद्यालयाच्या विश्वभारती 'चीन–भवन' या शाखेमध्यें सध्यां चालू आहे. भारतीय संस्कृति, वाङ्मय व इतिहास यांच्यावर नवीन प्रकाश टाकणाऱ्या प्राचीन व मध्ययुगीन चिनी ग्रंथांचा अभ्यास सुद्धां चिनी विद्वानांच्या सहकार्यानें हिंदी संशोधक तेथें करीत आहेत. चरक व सुश्रुत यांच्या परंपरेहून निराळ्या परंपरेचा एक वैद्यक–ग्रंथ व भावविवेक नांवाच्या बुद्धधर्मीय विद्वानानें इ. स. ६ व्या शतकांत लिहिलेला 'करतलरत्न' नामक न्यायग्रंथ हे छापून प्रसिद्ध झाले आहेत. त्याचप्रमाणें, चिनी संशोधकहि चीन–भवनांत भारतीय वाङ्मय, इतिहास व संस्कृति यांचा अभ्यास करण्याकरितां येऊन राहिले आहेत. अशा रीतीनें चालू असलेलें 'चीन–भवनांतील' संशोधन-कार्य, या दोन देशांत पूर्वीपासून नांदत आलेल्या सांस्कृतिक संबंधावर अधिकाधिक प्रकाश टाकून, त्यांच्यांतील परस्पर स्नेह व सद्भाव वाढविण्यास उपकारक ठरल्यावांचून रहाणार नाहीं अशी खात्री वाटते.

---

हिंदुस्थानांत गोशाळा आणि पांजरापोळ मिळून एकंदर ३००० आहेत. त्यांतून सहा लक्ष गुरें असून त्यांपैकीं शेंकडा ८० गुरें म्हातारीं व निकामीं आहेत. बाकीचीं म्हणजे केवळ शेंकडा २० हीं दूध दुभत्याकरितां आणि गुरांची निपज सुधारण्याकरितां उपयोगीं पडण्यासारखीं आहेत. त्यांचा उपयोग करून घेतल्यास दररोज २००० मण दूध मिळूं शकेल.

—सर दातार सिंग ( ६–३–४९ ).









प्रा. रामचंद्र कृष्ण लागू

# कवयित्री सरोजिनीदेवी नायडू

दिवंगत कवयित्री सरोजिनीदेवी नायडू यांच्या काव्यसंग्रहांपैकीं तिसरा काव्यसंग्रह १९१७ सालीं प्रसिद्ध झाला. त्यानंतर भारतीय राजकारणाच्या आघाडीवर असलेल्या या विद्वन्मान्य कवयित्रीला काव्य करायला फुरसत मिळाली नाहीं. प्रा. भूषणांच्या मतें ( 'Peacock Lute' पहा) सरोजिनीदेवींच्या अप्रकाशित कवितांचा आणखी एक काव्यसंग्रह प्रसिद्ध होण्याचा संभव आहे. आणि मग ते म्हणतात त्याप्रमाणें सरोजिनीदेवींच्या प्रतिभेचे आणखी कांहीं पैलू आपल्या नजरेस पडतील. सध्यां तरी हें भविष्यकाळचें एक सुखस्वप्न असेंच म्हणायला पाहिजे. आपल्याला इष्ट वाटणाऱ्या घटना घडून याव्या असें जें आपल्याला सारखें वाटत असतें त्याचाच हा एक नमुना होय–It is a piece of wishful thinking!

## दुर्बल शरीराच्या आवरणाखालीं धगधगणारी ज्योत !

बालपणापासून सरोजिनीदेवींची प्रकृति अगदीं नाजुक-नोळा-मासा म्हणतात तशा प्रकारची. प्रकृतीच्या या दुर्लंघ्य अडचणींमुळें त्यांना स्वदेशीं तर नाहींच, परंतु परदेशीं जाऊनसुद्धां आपला अभ्यास पुरा करतां आला नाहीं. सत्तर वर्षांच्या त्यांच्या आयुष्यांत असा एकही दिवस गेला नसेल कीं ज्या दिवशीं त्यांना मृत्यूची दहशत वाटली नसेल! Any tomorrow I might die असेंच त्या म्हणत. 'मृत्यु आणि कवि' (The Poet to Death) या त्यांच्या काव्यांत त्या मृत्यूला म्हणतात– "प्रेम, दुःख, निसर्गसौंदर्य या सर्वांचा मला अनुभव घेऊं दे (मग माझ्यावर झडप घाल)." 'मृत्यु आणि जीवित' (Death and Life) या नांवाच्या त्यांच्या दुसऱ्या एका काव्यांत त्या मृत्यूला सांगतात : "तूं माझ्या शारीरिक वेदनांची कशाला कींव करतोस, 'तुला सोडवूं का यांतून' असें पुनः पुनः कशाला सांगतोस? काव्याचें आणि देशसेवेचें माझें ध्येय मी गाठूं शकणार नाहीं इतका का माझा आत्मा कमकुवत आहे असें तुला वाटतें?" दुःखाच्या देवतेला उद्देशून लिहिलेल्या (To the God of Pain) या त्यांच्या कवितेंत त्यांनीं या निर्घृण देवतेला आपल्या देहाचा बळी अर्पण केला आहे अशी कबूली दिली आहे.

सरोजिनीदेवींचें शरीर दुर्बल होतें खरें; तथापि आंग्लकवि ऑर्थर सायमन्झ् (Arthur Symons) यांनीं म्हटल्याप्रमाणें या दुर्बल, भंगुर शरीराचें आवरण घेतलेला त्यांचा आत्मा मात्र एक धगधगणारी जळती ज्योत होती– A spirit of too much fire in too frail a body! यामुळें आपत्ति किती का मोठी असेना तिच्यापुढें सरोजिनीदेवी कधीं नमल्या नाहींत. धैर्यानें, निश्चयानें, ताठरपणानें त्यांनीं कवयित्री व्हायचें आपलें ध्येय गांठलें आणि राजकारणाला सर्वस्वी वाहून घेऊन देशसेवेच्या उत्तुंग शिखरापर्यंत त्या जाऊन पोंचल्या.

## बाल्यापासून कविप्रतिभेचा आविष्कार

सरोजिनीदेवींची माता बंगालींत काव्यरचना करी आणि त्यांच्या वडिलांना शास्त्रीय संशोधनाचा नाद आणि किमयेचें (alchemy) विलक्षण वेड होतें. सुवर्ण निर्माण करण्याची महत्त्वाकांक्षा धरणाऱ्या या पित्याच्या कन्येनें सुवर्णकाव्यें निर्माण करावीं हें निसर्गाच्या नियमांना अनुसरूनच झालें. १८७९ सालीं सरोजिनीदेवींचा जन्म झाला. त्याच्या बाराव्या वर्षीं त्या प्रवेशपरीक्षा उत्तीर्ण झाल्या. तेराव्या वर्षीं त्यांनीं १३०० ओळींचें एक दीर्घ काव्य लिहिलें; त्याचप्रमाणें २,००० ओळींचें एक नाटक आणि त्यांच्या








भरीला एक कादम्बरी आणि अनेक रोजनिश्या (fat journals) लिहून काढल्या. पोप कवि म्हणत असे—"माझे बोबडे बोल काव्यरूप घेऊन बाहेर पडत (I lisped in numbers)." राजकवि टेनिसन् यानें तेराव्या वर्षाच्या सुमारास 'आपण ६,००० ओळींचें एक महाकाव्य लिहिलें' असें स्वतःच सांगितलें आहे. बालार्कांची जशी दशदिशा व्यापणारी प्रभा तसाच हा बाल्यांतला कविप्रतिभेचा कौतुकावह, रमणीय आविष्कार. यानंतर सरोजिनीदेवींची प्रकृति ढासळली. तरी पण १४ ते १६ या दोन वर्षांच्या अवधींत त्यांनीं अमूप वाचन केलें. पंधराव्या वर्षी डॉ. नायडूंशीं विवाह करायचा निश्चय केला. ब्राह्मणाच्या या कन्येनें इतर जातीच्या तरुणाशीं विवाह करूं नये असें समाजाचें मत. सरोजिनीदेवी डगमगल्या नाहींत. सौंदर्याची उपासना करणाऱ्या, सदसद्विवेकबुद्धीला देवतेप्रमाणें पूज्य मानणाऱ्या सरोजिनीदेवी आपल्या विवाहाविरुद्ध असणाऱ्या लोकमताला थोड्याच जुमानणार !

१८९५ सालीं उच्च शिक्षणाकरितां त्यांना इंग्लंडला पाठविलें. किंग्ज कॉलेज (लंडन) आणि गर्टन (केम्ब्रिज) या महाविद्यालयांत त्यांनीं अभ्यास केला, पण शारीरिक स्वास्थ्य नसल्यामुळें त्यांना अभ्यास अर्धवट सोडून द्यावा लागला. १८९८ मध्यें सरोजिनीदेवी हिंदुस्थानांत परतल्या आणि डॉ. नायडूंशीं त्यांनीं विवाह केला. त्यांच्या विवाहाविरुद्ध असलेलें लोकमताचें गढूळ वातावरण निवळलें नव्हतें. पण सरोजिनीदेवींनीं त्याची यत्किंचित् क्षिति बाळगली नाहीं. त्यांचा संसार सुखाचा झाला. दोन मुलगे आणि दोन मुली एवढेंच त्यांचें मर्यादित कुटुंब. सरोजिनीदेवी आपल्या मुलांवर निरतिशय प्रेम करीत. वात्सल्यानें आणि अपत्यविषयक कौतुकानें ओथंबलेली To my children ही त्यांची कविता त्यांनीं आपल्या मुलांना उद्देशूनच लिहिली आहे.

### स्वत्वाची जाणीव

इंग्लंडमध्यें असतां सरोजिनीदेवींचा सर एडमंड गॉस या रसिकश्रेष्ठाशीं परिचय झाला. सरोजिनीदेवी कविता करतात ही वार्ता सर एडमंड गॉस यांच्या कानांवर गेली होती. त्यांनीं सरोजिनीदेवींच्या कविता त्यांच्याजवळून मागून घेऊन वाचल्या. पण त्यांची निराशा झाली. छन्दःशास्त्राच्या, त्याचप्रमाणें व्याकरणाच्या दृष्टीनें जरी या कविता निर्दोष असल्या तरी त्यांत जिवंतपणा नाहीं, इंग्लिश काव्याचा हा निव्वळ अनुवाद होय असें त्यांना वाटलें. सरोजिनीदेवींना त्यांनीं सांगितलें कीं, "हिंदी कवयित्रीनें आपल्या काव्यांत इंग्लंडमधील वृक्षलता, पशुपक्षी, इंग्लिश लोकांचे आचारविचार, धर्म, नीति, यांचें आम्हांला दर्शन करून द्यायला नको; तुम्ही आपल्या काव्यांना हिंदी वातावरणाची जोड द्या. दक्षिणेंतील सूर्याच्या प्रखर तापानें रखरखलेले खडक, पिंपळासारखे वृक्ष, हिंदुस्थानांतील कोकिळ आणि इतर गाणारे पक्षी, हिंदवासीयांच्या भावना, कल्पना, आकांक्षा, अनुभव, रीतभात, वेषभूषा, विशेषतः हिंदुस्थानची प्राचीन काळची ब्रह्मविद्या, आत्मविषयक ज्ञान या सर्वांनीं सजलेली तुमची काव्यसृष्टि जेव्हां आम्ही पाहूं तेव्हां तुम्हांला हिंदुस्थानची कवयित्री ही संज्ञा यथार्थतेनें लावतां येईल." गॉससाहेबांचें हें म्हणणें सरोजिनीदेवींना पटलें आणि १८९५ नंतर त्यांनीं ज्या कविता लिहिल्या त्यांना परकीय वातावरणाचा किंवा पार्श्वभूमीचा स्पर्शसुद्धां होऊं दिला नाहीं. यापुढें इंग्रजी खेड्यांतील देवालयें आणि गांवकऱ्यांना प्रार्थनापुराणाकरतां आवाहन करणारा देवालयांतील घंटांचा नाद, इंग्लंडमधील गाणारे पक्षी, इंग्लिश वृक्षलता इत्यादि इंग्लंडमधील देखाव्यांची, इंग्लिश काव्याला शोभेल अशा पार्श्वभूमीची जी त्यांनीं रजा घेतली ती कायमचीच. मँचेस्टरच्या तलम कापडाची पैदास बंद करून डाक्क्याच्या मलमलीच्या निर्मितीकडे लक्ष पुरविलें !

सरोजिनीदेवी इंग्लंडमध्यें असतांना सर एडमंड गॉस यांच्याप्रमाणें त्यांना ऑर्थर सायमन्झ् (Arthur Symons) या विद्वान् आणि सहृदय कवीच्या स्नेहाचा आणि सहवासाचा लाभ मिळाला. १९०५ सालीं प्रसिद्ध झालेल्या Golden Threshold (स्वर्ण देहली) या नांवाच्या त्यांच्या काव्यसंग्रहाला सायमन्झ्साहेबांनीं उपोद्घात लिहून दिला. सरोजिनीदेवींच्या काव्याचें

आत्मीयतेनें, जिव्हाळ्यानें केलेलें परीक्षण हा या उपोद्घाताचा विशेष होय आणि इंग्लंडमध्यें कवयित्रीचें वास्तव्य असतांना त्या आपल्या इंग्लिश स्नेह्यांना कशा दिसत याचें या चतुर लेखकानें रेखाटलेलें शब्दचित्र हाही प्रस्तुत उपोद्घाताचा आणखी एक विशेष होय. सायमन्ससाहेब म्हणतात : "छोटीशी त्यांची मूर्ति; सर्वांग झांकून टाकणारी झुळझुळणारी रेशमी साडी नेसून, आपले लांबसडक काळे केस पाठीवर मोकळे सोडून त्या बसत. सूर्यकमल न कळत सूर्याकडे आपलें तोंड फिरवितें तशीच सरोजिनीदेवींची दृष्टि सौंदर्याकडे वळलेली असे. लहानशा त्यांच्या शरीरयष्टींतील जीवनसर्वस्व जणूं काय त्यांच्या डोळ्यांत एकवटलें आहे असा भास होई. खोल, गहन सरोवरासारखे त्यांचे डोळे. पाहाणाऱ्याला आपण या जलाशयांत बुडी मारून सरसर खालीं ओढलें जात आहोंत असें वाटायचें." "Her eyes were like deep pools and you seemed to fall through them into depths below depths."

## सुंदर पृथगात्मता (Individual beauty)

सायमन्ससाहेबांच्या या उपोद्घातांत सरोजिनीदेवींनीं त्यांना लिहिलेल्या पत्रांतील अनेक अवतरणें उद्धृत केलीं आहेत. हीं अवतरणें आपण वाचलीं म्हणजे कवयित्रीनें स्वतःच्या शब्दांतच दिलेली त्यांची चरित्रविषयक माहिती आपल्याला मिळते, आणि मानवी जीवनाकडे त्या कोणत्या दृष्टीनें पाहतात तेंहि आपल्याला समजतें. सायमन्ससाहेबांना लिहिलेल्या एका पत्रांत सरोजिनीदेवींनीं इटलीला भेट दिली त्या वेळीं त्यांच्या मनावर कोणकोणचे संस्कार झाले त्या सर्वांचें तपशीलवार वर्णन दिलें आहे. तें जितकें मनोरंजक तितकेंच उद्बोधक आहे. सरोजिनीदेवींच्या काव्यासंबंधींच्या कल्पना, स्वतःच्या काव्याचें त्यांनीं केलेलें मूल्यमापन, निसर्गाकडून मिळालेल्या विनोदाच्या देणगीचा उल्लेख, तशीच त्या विनोदांचीं उदाहरणें— हें सर्व साहित्य सायमन्ससाहेबांच्या या उपोद्घातांत एकत्रित केलेलें आढळून येईल. एकाद्या आरशांत जशी आपली मूर्ति आपण पाहातों तशीच या उपोद्घाताच्या दर्पणांत सरोजिनीदेवींच्या व्यक्तिमत्त्वाची प्रतिमा आपल्या दृष्टीस पडते.

सरोजिनीदेवींची हीं नितांतसुंदर पत्रें वाचल्यावर या कवयित्रीचें काव्यावर जसें असीम प्रभुत्व होतें तशीच (इंग्लिश) गद्यवाणीही तिला वशंवद असल्याची आपली खात्री होते. इतकें प्रांजळ, खेळकर, (खोडकर म्हटलें तरी चालेल), कधीं विनोदी तर कधीं गम्भीर, कधीं ध्येयनिष्ठ तर कधीं फुलपांखरासारखें थिल्लर, सूर्याच्या शुभ्रकिरणांतील सप्तरंगासारख्या कवयित्रीच्या स्वभावांतील नानाविध छटा व्यक्त करून दाखविणारें सहजमनोहर लिखाण क्वचितच आपल्याला वाचायला मिळतें !

सर एडमंड गॉस्साहेबांचें म्हणणें मान्य करून सरोजिनीदेवींनीं आरंभीं आरंभीं रचलेल्या आपल्या काव्यांना जलसमाधि दिली- म्हणजे त्यांनीं तीं काव्यें प्रसिद्ध केलीं नाहींत. पुढें १८९६ सालीं लंडनमध्यें असतांना नवीन रचलेल्या आपल्या कविता आर्थर सायमन्स् यांना वाचून दाखविल्या. आणखी आठ वर्षांनीं (१९०४ मध्यें) हिंदुस्थानांत परत आल्यावर ऑर्थर सायमन्स् यांनाच सरोजिनीदेवींनीं दुसरा एक आपला काव्यसंग्रह पाठवून दिला. सायमन्ससाहेबांच्या मतें सर्व कविता सरोजिनीदेवींच्या व्यक्तिमत्त्वानें उजळलेल्या असल्यामुळें त्या प्रसिद्ध करणाऱ्या कवयित्रीनें मनांत कसलीच शंका आणूं नये. सरोजिनीबाईंना प्रथम हें म्हणणें पटेना. त्यांची अशी समजूत कीं "मी कविता करतें खरी, पण त्या कविता पक्ष्यांचें गाणें असतें तशा क्षणभंगुर." सरोजिनीदेवींनीं आपल्या कवितांची पक्ष्यांच्या गाण्यांशीं केलेली तुलना सायमन्ससाहेबांना पटली, पण त्याच्यापुढें जाऊन ते म्हणाले, "या कवितांत एका विशिष्ट प्रकारची पृथगात्मता आहे (ndividual ieauty), पाश्चात्य वाङ्मयाचा त्यांच्यावर परिणाम झाला असला तरी पौर्वात्य वाङ्मयाची मनाला भुरळ पाडणारी जादू त्यांत आहे यांत शंका नाहीं." अखेर हा काव्यसंग्रह १९०५ मध्यें प्रसिद्ध झाला. याच संग्रहाला ऑर्थर सायमन्स् यांनीं (वर उल्लेखिलेला) उपोद्घात लिहिला. सरोजिनीदेवींचा दुसरा काव्यसंग्रह १९१२ सालीं Bird of Time (काल-विहंगम) या नांवानें प्रसिद्ध झाला. त्यांच्या












या दुसऱ्या काव्यसंग्रहाला जोडलेला उपोद्घात सर एडमंड गॉससाहेबांनीं लिहून दिला. Broken Wing (छिन्नपक्षपुट) हा सरोजिनीदेवींचा तिसरा काव्यसंग्रह १९१७ सालीं प्रसिद्ध झाला. सध्यां तरी सरोजिनीदेवींचे हे तिन्ही काव्यसंग्रह हस्तगत करणें दूरापास्त झालें आहे.

## सरोजिनीदेवींच्या काव्याचें विशिष्ट वळण

सरोजिनीदेवींनीं इंग्रजी वाङ्मयांत ज्याला वीणा-काव्य (lyric poetry) म्हणतात तशा प्रकारचीं काव्यें लिहिलीं— विशेषतः वर्ड्स्वर्थ, शेली, कीट्स् टेनिसन्, स्विन्बर्न यांच्या ग्रंथांचें त्यांनीं परिशीलन केलें. त्यांच्या इंग्लिश कविमित्रानें म्हटल्याप्रमाणें या बंगाली कवयित्रीच्या काव्यांत जो एका महिलेच्या असामान्य व्यक्तिमत्त्वाचा आविष्कार झालेला दिसून येतो तो पाश्चिमात्य (इंग्रजी) भाषेंत आणि त्याला जें एक विशिष्ट वळण मिळालें तेंही पाश्चिमात्य पद्धतीचें (a rare temparament of a woman of the East finds expression through a Western language and partly under Western influences). हें विशिष्ट वळण कशा प्रकारचें होतें तें आतां आपण पाहूं.

वर्ड्स्वर्थ, शेली, कीट्स् वगैरे कवींनीं इंग्लिश काव्याच्या प्रांतात क्रांति घडवून आणली. सौंदर्य-निष्ठ, व्यक्तिवादी (Individualists) स्वातंत्र्य-प्रिय असे हे कवी. अठराव्या शतकांतील फ्रेंच राज्य-क्रांतीचीं स्वतंत्रता, समता, विश्वबंधुता वगैरे मूलभूत तत्त्वें त्यांना पटलीं होतीं. प्राचीन परंपरेचीं बंधनें ते जुमानीत नसत. शाश्वत सौंदर्य, अविनाशी प्रेम, निराबाध स्वातंत्र्य या त्यांच्या देवता. कवीनें आपलें व्यक्तिस्वातंत्र्य गमावूं नये, इतकेंच काय पण प्रत्येक कवीनें आपण निर्माण केलेल्या काव्यकृतींचें मूल्य-मापन कसें करावें, याविषयींची शिकवणही आपल्या काळच्या जनतेला याही. 'Every poet has to create the taste by which he is to be judged'. त्यांच्यापैकींच एका थोर कवीनें केलेली ही घोषणा. निसर्गाविषयीं या कवींना अपार आपुलकी वाटे. लहान मुलांचेंही त्यांना वेड होतें. जें जें कांहीं अभिनव, सुन्दर, अपरिचित (भीषण का असेना) असेल त्याच्याकडे या कवींचें चित्त धांव घेत असें. आपल्या स्वतःच्या भावना, कल्पना, आकांक्षा, मनोरथ या सर्वांचें ते काव्य करीत. त्यांच्या दृष्टीनें काव्यांत बुद्धीपेक्षां भावना श्रेष्ठ, रुक्ष वास्तवतेपेक्षां कल्पनानिर्मितसौंदर्याची महती अधिक. रूप, रस, गंध, रंग (colour), काव्यसंगीत (music of verse) यांच्याकडे या कवींचा ओढा. चित्रमय, कर्णमधुर, व्यंग्यार्थप्रवण अशा शब्दांची आणि अलंकारांची ते योजना करीत, आणि अभिनव विषयांना अनुरूप अशीं वृत्तेंही निर्माण करीत.

सरोजिनीदेवींच्या काव्यांची हीच प्रकृति. त्यांचा पिंड बंडखोरीला सर्वस्वीं अनुकूल असाच. विश्वांतील शाश्वत सौंदर्य हें त्यांच्या काव्यस्फूर्तीचें उगमस्थान[1] (a craving for eternal beauty). प्राचीन परंपरा त्यांनींहि झुगारून दिली होती. निसर्ग आणि मुलें, त्याचप्रमाणें स्वतःच्या भावना, कल्पना आणि मनोरथ हे त्यांच्या काव्याचे विषय. उसळत्या भावना, विश्वव्यापी कल्पना या बाबतींत वरील कवींशीं त्यांचें साम्य होतें. अत्यंत हळुवार आणि संस्कारक्षम असें त्यांचें अंतःकरण. एकादें सुंदर फूल पाहिलें कीं त्यांना कोण आनन्द व्हायचा, आणि आपल्या मित्राचा आपल्यावर रोष झाला आहे अशी त्यांची नुसती समजूत झाली तरी त्यांना पराकाष्ठेचें दुःख होत असे.[2] रूप, रस, गंध, रंग, (colour), काव्यसंगीत (music of metre) या सर्वांचा त्यांना विलक्षण मोह. त्यांनीं लिहिलेल्या कोणच्याही काव्यांत हे संगीताचे सूर ऐकूं येणार

1. It was the desire for beauty that made her a poet.
2. Pain or pleasure transported her and the whole of pain or pleasure might be held in a flower's cup or the imagined frown of a friend.
—Arthur Symons.








नाहींत असें होणार नाहीं. चित्रमय, श्रुतिमनोहर, व्यंग्यार्थप्रवण शब्द, तसेंच उपमारूपकादि अलंकार, निरनिराळीं भावनानुकूल वृत्तें या साधनसंपत्तीचा त्यांच्याजवळ फार मोठा संचय होता, कारण त्यांनीं आपल्या इंग्रजी वाङ्मयाच्या वाचनाला कधीं खंड पडूं दिला नाहीं.

अशा परिस्थितींत सरोजिनीदेवींचें काव्य वर्ड्‌स्वर्थ, शेली, कीट्स्, यांच्या विशिष्ट वळणावर गेलें यांत नवल करण्यासारखें कांहींच नाहीं. समसमां संयोग झाला असेंच आपण म्हणूं. आणखीहि एका बाबतींत सरोजिनीदेवींचें वर्ड्‌स्वर्थ वगैरे पाश्चात्य कवींशीं असलेलें साम्य आपल्याला दिसून येतें. हिंदी कवयित्री असल्या तरी जग हें निव्वळ मृगजळ, तेव्हां एकांतांत जाऊन मोक्ष मिळविण्याचा यत्न करणें हें मनुष्याचें एकमेव कर्तव्य होय हें तत्त्वज्ञान त्यांना मान्य नव्हतें. जगांतील सौंदर्याचा, रमणीयतेचा त्यांना ध्यास होता. नानाविध मनोविकारांनीं रंगलेल्या, आपल्या नित्याच्या व्यवहारांत निमग्न असलेल्या स्त्रीपुरुषांनीं गजबजलेल्या निरंतर अस्वस्थ आणि अशांत अशा या संसाराचा त्याग करणें शक्य तरी आहे का असें त्यांना वाटे.[3] थोडक्यांत सांगायचें म्हणजे पाश्चात्य कवींच्या वास्तवतेच्या दृष्टीनें त्या जगाकडे पाहात. जगांत राहून प्रयत्न करून " प्रपंच करावा नेटका " या पाश्चात्य कवींच्या ध्येयाशीं त्या सहमत होत्या. येथेंहि वरच्याप्रमाणें समसमां संयोग झाला असें म्हणायला पाहिजे आणि त्यामुळें त्यांच्या काव्याच्या रमणीयतेंत भर पडली यांत शंका नाहीं.

### पौर्वात्य व पाश्चात्य संस्कृतीचा मनोहर संगम

सरोजिनीदेवींच्या या काव्यांत पौर्वात्य आणि पाश्चिमात्य अशा दोन्ही संस्कृतींच्या प्रवाहांचा मनोहर संगम झालेला आपल्याला दिसून येतो, कारण या काव्याची पार्श्वभूमि हिंदुस्थानी आणि वातावरण पण हिंदुस्थानी. येथें हिंदवासीयांच्या जीवनाचा चित्रपट आपण पाहातों आहों असें आपल्याला वाटतें. हिंदी देवता, हिंदी धर्म आणि नीति, हिंदी पुराणें व उपनिषदें, हिंदी तत्त्वज्ञान ( त्यांत इस्लामी धर्म आणि तत्त्वज्ञान, रीतभात, आचारविचार यांचा समावेश करायला हवा ), हिंदुस्थानांतील निसर्गाचे देखावे, हिंदुस्थानांतील वृक्षलता, फुलें आणि गाणारे पक्षी, हिंदुस्थानांतील थोर व्यक्ती आणि ऐतिहासिक स्थळें, हिंदुस्थानचा अस्तंगत महिमा आणि उदयोन्मुख स्वातंत्र्यरवि—हे सरोजिनीदेवींच्या काव्याचे विषय. त्यांनीं ज्या भाषेंत हे विषय विशद करून सांगितले ती भाषा फक्त इंग्रजी. अशा तऱ्हेनें सरोजिनीदेवींनीं सर एडमंड गॉस्साहेबांच्या सूचनेला मूर्त स्वरूप दिलें.

स्वतःचें सरोजिनीदेवींचें म्हणणें असें कीं आपल्याला कल्पनाशक्तीच्या दिव्यदृष्टीची ( vision ) देणगी जन्मतःच प्राप्त झाली होती; तशाच स्फूर्तीची ( impulse ) वाण कधीं भासली नाहीं. मात्र कवीचा आशय व्यक्त करणाऱ्या वाग्देवतेच्या सामर्थ्याची ( voice ) तेवढी उणीव होती. कवयित्रीनें केलेलें हें स्वतःच्या प्रतिभेचें वर्णन आपल्याला स्वीकारतां येणार नाहीं, कारण त्यांनीं लिहिलेली प्रत्येक ओळ त्यांच्या इंग्लिश भाषेवरील प्रभुत्वाची साक्ष देईल. सर एडमंड गॉस्साहेबांनींही त्यांच्या इंग्लिशभाषेवरील प्रभुत्वाची मुक्तकंठानें स्तुति केली आहे.

### देशसेवेची तळमळ

Guerdon नांवाच्या सरोजिनीदेवींच्या काव्यांत त्या देवाजवळ एक मागणें मागतात : " हे देवा, राजेलोकांना पराक्रमाचें वरदान दे; धर्मनिष्ठ लोकांना धर्मसूत्रांचा अहेर कर; मला मात्र काव्यनिर्मितीचा अत्यानंद दे—For me, O my Master, The rapture of song ! " चक्राकार गिरक्या घेणारें या काव्याचें वृत्त, आर्नल्ड ( Arnold ) कवीच्या क्यालिक्लीजच्या ( Callicles ) गीताची आठवण करून देतें. The Faery Isle of Janjiria या त्यांच्या काव्यांत त्यांनीं आपल्या काव्याचें दुसरें

3. How can one deliberately renounce this coloured, unquiet, fiery human life of the earth !








आणि त्यांच्या राण्यांनीं मृत्यूवर मात केली हें सांगण्याकरतांच प्रस्तुत कविता लिहिली. मृत्यूला आणि दैवाला आव्हान देणारीं आणखीं अशीं काव्यें सरोजिनीदेवींनीं लिहिलीं. त्यांचा थोडाफार उल्लेख मागें येऊन गेलाच आहे.

## काव्याची राज्ञी संयुक्त प्रांताची राज्ञी झाली

गोखले[8], दिल्ली, हिंदुस्थानची देणगी वगैरे सरोजिनीदेवींच्या कविता वाचल्या म्हणजे आपल्याला कवयित्रीच्या जळजळीत देशप्रेमाची ओळख पटते. [9]म. गांधींवरचें सुनीत म्हणजे १४ ओळींचें रूपक होय. आपल्या वडिलांना उद्देशून सरोजिनीदेवींनीं एक सुनीत लिहिलें तें महात्मा गांधींवरच्या सुनीताप्रमाणेंच इटॅलिअन पद्धतीचें. इटॅलिअन पद्धतीच्या या सुनीताच्या प्रकारांत विचाराच्या उदात्ततेइतकीच कलाकुसरीचीही आवश्यकता असते. "रत्नं समागच्छतु कांचनेन" असा योग झाला तर तें सुनीत यशस्वी होतें. सरोजिनीदेवींचीं हीं सुनीतें यशस्वी झालीं याचें कारण त्यांचें काव्यशिल्पावरचें स्वामित्व. शब्द, वृत्त, अनुप्रास, पदलालित्य, यमक हीं सर्व सरोजिनीदेवींच्या सेवेला हात जोडून तयार असत. एवढेंच काय, पण तीं काव्याच्या अर्थाच्या पुढें धावत जातात. अर्थ मागेंच रगाळत राहातो. सरोजिनीदेवींचें काव्य वाचीत असतां स्विन्बर्नच्या काव्याची आठवण होते त्याचेंही हेंच कारण असावें.

गोपाळ कृष्ण गोखले यांनीं सरोजिनीदेवींना देशसेवेची शपथ घ्यायला लावली, आणि पुढें या देशप्रेमाच्या ज्योतींत त्यांची काव्याची ज्योति विराम पावली. गोखल्यांच्यानंतर त्यांनीं गांधींचें अनुयायित्व पत्करलें. स्वातंत्र्याच्या लढ्यांत हाल-अपेष्टा सोसल्या. हिंदु-मुसलमानांची एकी व्हावी म्हणून जिवाचें रान केलें. दक्षिण ऑफ्रिकेंत जाऊन तेथील आपल्या देशबांधवांना धीर दिला. राष्ट्रसभेचें अध्यक्षपद भूषविलें. मतामतांच्या गलबल्यांत त्या आपल्या ध्येयापासून कधीं यत्किंचित् ढळल्या नाहींत. आयुष्याच्या आरंभीं त्यांना सर एडमंड गॉस् आणि ऑर्थर सायमन्झ् या थोर साहित्यभक्तांची संगति लाभली. तरुणपणीं मेजर नायडूंच्या बरोबर सुखाचा संसार केला. नंतर गोखले-गांधी यांचा सहवास. अखेर काव्यांची ही राज्ञी संयुक्त प्रांताची राज्ञी झाली. अशी भाग्यवती स्त्री एखाद्या युगांत जन्मास येते. सरोजिनीदेवी हिंदुस्थानांत जन्मल्या हें हिंदुस्थानचेंच महद्भाग्य नव्हे का ?

---

8. Gokhale; Imperial Delhi; Gift of India.
9. A Mystic Lotus; In Salutation to my Father's Spirit.

---

## सरोजिनीदेवींचें जीवनच काव्य होतें !

सरोजिनीदेवी ह्या पूर्व व पश्चिम यांमधील, हिंदुस्थानांतील पक्षोपपक्ष यांमधील एक उत्कृष्ट दुव्यासारख्या असून आदर्श शिष्टाई करणाऱ्या ( Ambassador ) होत्या. भारतभूच्या पोटीं महान् पुरुष व स्त्रीरत्नें निर्माण झालीं आहेत व पुढेंहि होतील यांत शंका नाहीं; परंतु अशा दुसऱ्या सरोजिनीदेवी निर्माण होतील कीं नाहीं याबद्दल मात्र शंका आहे !—त्यांनीं गव्हर्नर म्हणून किंवा राज्यसंस्थेच्या एक महान् सेविका म्हणून मोठेंच यश संपादन केलें आहे हें खरें; परंतु त्या नात्यानें त्यांची कामगिरी मला वर्णावयाची नाहीं. गव्हर्नर साधारणपणें जसे गणले जातात त्यापेक्षां त्या किती तरी थोर होत्या ! त्या आमच्याशीं इतक्या एकजीव होऊन गेल्या होत्या, आमच्या राष्ट्रीय संस्कृतिप्रवाहाशीं त्या इतक्या एकरूप होऊन गेल्या होत्या कीं त्यांचें यथातथ्य वर्णन करणें मला खरोखरीच कठिण आहे; ज्यांच्याशीं आपला घनिष्ठ संबंध आला आहे अशा माणसांचे गुणवर्णन करण्यांत योग्य तो सुमार ठेवणें आपणांस कठिणच जातें ! तरी सुद्धां असें वाटून जातें कीं सरोजिनीदेवींचें वर्णन करायला कितीहि विशेषणें

[ पृष्ठ ५७४ पहा ]










# चिप्सचीं स्मृतिचित्रें

[लेखकः जेम्स हिल्टन, अनुवादकः वि. द. साठे; (कल्पना-प्रकाशन) ३१७ सदाशिव, पुणें २, पृष्ठसंख्या १५४, किंमत ३ रु.]

जेम्स हिल्टनची मूळ कादंबरी Goodbye Mr. Chipps ही पहिल्यांदा १९३४ सालीं प्रसिद्ध झाली. १९४७ सालापर्यंत तिच्या एकवीस आवृत्त्या निघाल्या. तिच्यावर आधारलेला सुप्रसिद्ध बोलपट कमालीचा गाजला. यावरून कादंबरीनें लोकप्रियतेचा केवढा उच्चांक गाठलेला आहे याची कल्पना येईल. अशा या कादंबरीवर आकृष्ट होऊन जेव्हा श्री. वि. द. साठे यांनी तिच्या मराठी अनुवादास सुरुवात केली तेव्हा त्यांच्या या सहृदय उपक्रमाचें 'नवभारता'-नें स्वागत करून पहिलें प्रकरण 'नवभारता'च्या १९४८ च्या जानेवारीच्या अंकांत आनंदानें प्रसिद्ध केलें. आतां त्यांनीं आपला तो अत्यंत सरस अनुवाद पूर्ण करून प्रस्तुत पुस्तकाच्या रूपानें मराठी वाङ्मयांत एक मोलाची भर टाकली आहे, यामुळें 'नवभारता'ला तर विशेष आनंद होणें स्वाभाविकच आहे.

चिप्सच्या स्मृतिचित्रांतून एका साध्या इंग्रज शिक्षकाची जीवनकथा मोठ्या माधुर्यानें प्रतीत होते. चिप्स हा १८७० सालीं आपल्या वयाच्या २३ व्या वर्षी ब्रुकफील्ड या लहानग्या गांवांतील शाळेंत शिक्षक म्हणून येतो; ४३ वर्षें त्याच शाळेंत साधा शिक्षक म्हणून काम करतो; ६५ व्या वर्षी सेवानिवृत्त होऊन त्याच गांवीं शाळेजवळच एक रस्ता टाकून रहात असतो. पुढें १९१७-१८ सालीं पहिल्या महायुद्धाच्या वेळीं, आपल्या वयाच्या ६९ व्या वर्षी त्याला परत बोलविण्यांत येऊन तो दोन वर्षें हेडमास्तराचें काम करतो; नंतर पुन्हा त्याच गांवीं शाळेजवळच आपल्या बिन्हार्डी परत येऊन १५ वर्षांनंतर त्याची जीवन-यात्रा संपते! किती साधें सुधें घटनाविशेषरहित जीवन! परंतु या स्मृतिचित्रांमधून तें किती भावमधुर, मानव्यानें ओथंबलेलें, आणि हृदयस्पर्शी असें प्रतीत होतें! कादंबरीकारानें जें कलातंत्र अवलंबिलें आहे तें अत्यंत हृदयंगम आहे. ऐशीं उलटून गेलेले निष्कोप प्रकृतीचे वृद्ध चिप्स शेगडीच्या उबेंत चहा पीत बसले आहेत. त्यांना तेथून रस्त्याच्या पलीकडील आपल्या लाडक्या विद्यार्थिशाळेच्या घंटा ऐकूं येत असून तेथील जीवनाचें स्पंदन ते हृदयानें अनुभवीत आहेत! दररोज त्यांच्याकडे ब्रुकफील्ड शाळेंतील मुलें पाळीपाळीनें चहाला येत आहेत! त्यांच्या मंडळी ... स्वभावतः मनापुढें आपल्या जीवनातील कितीतरी स्मृतिचित्रें एकामागून एक तरळूं लागतात. ... शिकविलेल्या विद्यार्थ्यांच्या अनेक पिढ्या, विद्यार्थ्यांचीं मुलें, त्या मुलांचीं मुलें, किती मजेदार आणि किती सारखे त्यांचे स्वभाव! त्यांपैकीं कांहीं विद्यार्थी मोठे होऊन जीवनांत सुप्रतिष्ठित झाले आहेत, तर कांहीं युद्धामध्यें धारातीर्थी पडले! हेडमास्तरचे देखील किती नमुने चिप्सना अनुभवायला मिळाले! आपण ४८ वर्षांचे असतांना जिनें आपल्या शांत, एकाकी जीवनांत प्रवेश करून क्रांति घडवून आणली, पण जी शेवटीं दोन वर्षांनीं आपणास सोडून गेली ती आपली प्रिय पत्नी कॅथेराइन!—अशा अनेक आठवणी होऊन वृद्ध चिप्सच्या डोळ्यांतून अश्रू ओघळूं लागतात आणि त्या वाचतांना वाचकांच्याहि!

हीं 'स्मृतिचित्रें' वाचून या साध्या सामान्य शिक्षकाच्या व्यक्तिमत्त्वाचे अनेक विशेष आपल्या डोळ्यांसमोर उभे रहातात. चिप्सला खरा उत्स्फूर्त आनंद विद्यार्थ्यांमध्यें; त्यांच्यामध्यें त्यांचें मन रमतें; त्याचें जीवन ब्रुकफीलच्या शाळेच्या जीवनानें रंगून








गेलें आहे. तो निष्ठावंत शिक्षक असून कडक शिस्तीचाहि भोक्ता आहे. पण विद्यार्थ्यांविषयींची त्याची जिव्हाळ्याची भावना आणि त्याची स्वाभाविक विवेकशक्ति यामुळें तो शिक्षणपद्धतीचें वा शिस्तीचें कधीं स्तोम माजवीत नाहीं! त्याच्या स्वाभाविक विनोदबुद्धीमुळें तो लहान मुलांशींहि समरस होऊं शकतो. परिपक्व वयोमान झालेल्या या पुराणपुरुषाच्या ठिकाणीं व्यापक सहानुभूति दिसून येते. इंग्लंडचा एकनिष्ठ नागरिक या दृष्टीनें त्याचा देशाभिमान जागृत असला तरी संकुचित देशाभिमानाच्या आहारीं जाऊन त्याची वृत्ति विकृत बनलेली नाहीं. मानवी जीवनांतील मूल्यांबद्दल त्याची निष्ठा अचल, अविकृत आहे. पहिल्या महायुद्धामध्यें तो शाळेंत शिकवीत असतांना, आजूबाजूला बॉंबस्फोट ऐकूं येत असतात; तरी त्याचें लॅटिन ग्रामर व रोमन इतिहास शिकविणें चालूच असतें! त्याचें मन युद्धांतल्या घटनांनीं व्यथित होत असूनहि तो विवेकपूर्वक कर्तव्यबुद्धीनें शिकवीत असतो. मुलांना तो हेंच जणूं सांगत असतो कीं युद्धें ही माणसाची विकृति आहे, ज्ञान व बंधुभाव ही मूळ प्रकृति आहे! युद्धाच्या ऐन अमदानींत शाळेच्या इमारतींतून व क्रीडांगणांतून लष्करी छावण्या वसल्या असून बंदुकीच्या नेमबाजीचें शिक्षण देण्यांत येत असतें; त्याबद्दल त्याचें मत विचारलें असतांना तो सरळ सांगतो— "याहतकें माणसाचा अधःपात करणारें दुसरें शिक्षण नाहीं!" एक वेळचा त्याचा सहकारी जर्मन शिक्षक शाळा सोडून जर्मनीला गेलेला, युद्धाच्या वेळीं बाकीच्या लोकांच्या दृष्टीनें शत्रु बनलेला; पण चिप्स त्याच्याकडे मानव्याच्या, सहानुभूतीच्या दृष्टीनें बघूं शकतो.

श्री. केशवराव भोळे यांनीं या पुस्तकाला लिहिलेल्या आपल्या मार्मिक प्रस्तावनेंत म्हटल्याप्रमाणें चिप्समध्यें ब्रिटिश राष्ट्रीय स्वभावाचें प्रतीक आपणांस पहावयास मिळतें. विवेकबुद्धि, समतोलपणा किंवा प्रमाणशीरपणा, शांत पण कणखर असा खंबीरपणा, आपल्यापेक्षां भिन्न प्रकृतीच्या किंवा विरोधी गोष्टींशीं सहानुभूतीनें व खेळकरपणानें जमवून घेण्याची वृत्ति, प्रामाणिक स्वकार्यनिष्ठा व संस्थेबद्दलची आत्मीयता हे ब्रिटिश लोकांचे गुण त्यांच्या इतिहासांत–विशेषतः राष्ट्रीय आपत्तीच्या वेळीं दिसून आलेले सुप्रसिद्ध आहेत. या सर्व गुणांचें इंगित आपणांस चिप्सच्या सामान्य जीवनांत सूचित केलेलें दिसून येतें.

—वि म. बेडेकर

---

**सरोजिनीदेवींचें जीवनच काव्य होतें!** ( पान ५७२ वरून चालू )

उपयोजिलीं तरी तीं चालतलि! कारण त्यांच्या व्यक्तिमत्त्वांत खरोखरीच कांहीं विलक्षण तेज होतें, विलक्षण ओज होतें. त्यांच्यावर ईश्वराचा वरदहस्त होता. त्यांचे कांहीं गुण तर खरोखरी अद्वितीयच होते. कवयित्री म्हणून त्यांच्या सार्वजनिक जीवनास आरंभ झाला. पण त्यांनीं कागद आणि लेखणी यांनीं लिहिलेलें काव्य फार नाहीं. उलटपक्षीं त्यांचें सबंध जीवनच एक काव्य होतें, एक गीत होतें! जसें आमच्या राष्ट्रपित्यामुळें आमच्या राष्ट्रीय स्वातंत्र्यसंग्रामांत नैतिक उदात्तता व भव्यता ह्यांचा संचार झाला, तसाच सरोजिनीदेवीमुळें त्या संग्रामांत कलामयता व काव्यगुण हीं अवतरलीं. केवळ आपल्या देशांतीलच नव्हे तर पौर्वात्य आणि पाश्चात्य देशांत जे संस्कृतींचे निरनिराळे प्रवाह आहेत त्यांचा सुंदर समन्वय सरोजिनीदेवींच्या ठिकाणीं झाला होता; यामुळेंच त्या एक महान् राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय व्यक्ति म्हणून गणल्या गेल्या. त्या महान् भाष्यकार होत्या. त्यांनीं आपल्या प्रतिभेनें हिंदुस्थानांतलि संस्कृतीच्या निरनिराळ्या बाजूंवर, त्याचप्रमाणें पाश्चात्य संस्कृतीनें हिंदुस्थानवर जे परिणाम झाले त्यांवर, अर्थपूर्ण भाष्यें केलीं.

—पं. जवाहरलाल नेहरू [ हिंदी लोकसभेंत केलेल्या भाषणांतून. (३।३।४९) ]










# कवयित्री सरोजिनीदेवी नायडू

एक प्रयोजन सांगितलें आहे. त्यांचें म्हणणें असें कीं नितांतसुंदर अशा या बेटांत मला राहतां येणार नाहीं. जगाच्या धामधुमींत जिथें शूर वीरांच्या तरवारींचा खणखणाट ऐकूं येतो तिथें जाऊन मला माझ्या काव्याचा ध्वज उभारला पाहिजे.– Where brave hearts carry the sword of battle 'Tis mine to carry the banner of song.' अशा तऱ्हेचें हें सरोजिनीदेवींच्या काव्याचें द्विविध स्वरूप. त्यांना सौंदर्याचें जसें विलक्षण आकर्षण होतें तितकीच त्यांची देशसेवेची तळमळ तीव्र होती.

## काव्यांतील सहजमाधुर्य व गतिमानता

प्रथम प्रथम ( आणि नंतरसुद्धा ) सरोजिनीदेवींनी लोकगीतें[4] ( Folk Songs ) रचलीं. लोकगीतांच्या या वर्गांत हिंदी नृत्यांगना ( Indian Dancers) या गीताची बरोबरी करणारें दुसरें गीत सांपडणें मुष्किल. कवयित्रीच्या काव्यकलेचें हें अत्युच्च शिखर होय. निद्रागीत ( A Cradle-Song ) हें दुसरें एक मनोरम गीत. या गीताची सहजता, सरलता, माधुर्य एकाद्या पक्ष्यांच्या गाण्यांतच आपल्याला अनुभवितां येईल. सरोजिनीदेवींनी वसंतऋतूला आणि फुलांना[5] उद्देशून अनेक कविता लिहिल्या. चांफ्याच्या फुलावरची (Champak Blossoms) कविता मला फार आवडली. Golden Cassia ही कविता जवळजवळ तितकीच मनोहर. वसंतऋतूच्या वर्णनांत आपल्या इकडच्या वड, पिंपळ, वगैरे वृक्षांचा आणि कोकिळ, बुलबुल इत्यादि पक्ष्यांचा उल्लेख केला आहे. आपलीं इंग्लिश काव्यें हिंदुस्थानच्या पार्श्वभूमीवर खुलून दिसतील ही गोष्ट कवयित्रीनें दृष्टिआड होऊं दिली नाहीं. पुंगीवाला गारुडी, फुलें, फळें, पुऱ्या ( Bread ) विकणारे व्यापारी या विषयांवरहि सरोजिनीदेवींनीं कविता लिहिल्या. विषय सामान्य असले तरी सरोजिनीदेवींच्या कल्पनाशक्तीचा उजळा त्यांना मिळाल्यामुळें त्यांच्यावर अलौकिक तेज पसरलें आहेसें आपल्याला वाटतें.

हैद्राबाद शहरांतील सायंकाळ आणि जून महिन्यांतील सूर्यास्त[6] या दोन कविता सरोजिनीदेवींच्या वर्णनकौशल्याची उदाहरणें म्हणून देतां येतील. वर्णनाच्या बाबतींत या कवयित्रीचा हातखंडा आहे. आरंभीं आपल्या दृष्टिसमोर असलेल्या देखाव्याच्या चारपांच ठळक विशेषांचा त्या उल्लेख करतात आणि नंतर उपमा, उत्प्रेक्षा, रूपक वगैरे अलंकारांच्या साहाय्यानें वाचकांना विषयाची यथार्थ कल्पना आणून देतात. सरोजिनीदेवींच्या काव्यांत गतिमानता असते. एक उपमा सुचली कीं तिच्या पाठोपाठ दुसरी; एक रूपक संपतें ना संपतें तों दुसरें तयार–असा क्रम. आणि काव्यांतील ओळी पैंजण घालून तालावर–सुरावर नाच करणाऱ्या नृत्यांगनांची आपल्याला आठवण करून देतात.

## गंभीर विषयांवरील काव्यें

गंभीर विषयांवर लिहिलेल्या काव्यांत An Indian Love-Song याचा आधीं विचार करूं. लहानशा या काव्यांत कवयित्रीनें आंतरजातीय विवाहाचा ऊहापोह केला आहे. येथें सरोजिनीदेवींनीं स्वतःच्या चरित्रांतील एकादें प्रकरण तर रंगविलें नाहीं ना अशी वाचकाला शंका येते. Ecstasy ही दुसरी एक मनोहर प्रेमविषयक कविता. Dirge हें निधनगीतीचें उदाहरण. नुकतीच वैधव्यदशा प्राप्त झालेल्या स्त्रीचें हृदय हलवून सोडणारें कारुण्यपूर्ण वर्णन या कवितेंत आपल्याला वाचायला सांपडतें. The Temple या दीर्घ काव्यांत प्रेमाचें अन्तिम स्वरूप भक्ति असा निष्कर्ष काढला आहे. गोवळकोंड्याच्या राजघराण्यांतील स्त्रीपुरुषांची थडगीं[7] हेंही करुण गीतच. परंतु यांतील धीरगंभीर कारुण्यानें मन उल्हसित होतें. उद्विग्नता वाटली तरी संयमित, मर्यादित स्वरूपांत. थडग्यांत विश्रब्ध झोंपलेल्या राजांनीं

4. Palanquin-Bearer ; Wandering Singer; Indian Weavers Bangle-Sellers.
5. A Song of Spring ; The Joy of the Spring-time; Golden Cassia ; Champak Blossoms.
6. Nightfall in the City of Hyderabad; June Sunset.
7. The Royal Tombs of Golconda.

# मतें आणि मतभेद

श्री. संपादक, ‘नवभारत’ यांस—

सा. न. वि. वि.

१. मार्च १९४९ च्या ‘नवभारत’च्या अंकांतील श्री. कोल्हटकर यांच्या भारतीय व पाश्चात्य मानसशास्त्रासंबंधींच्या लेखांत पाश्चात्यांचा मानसशास्त्राचा अभ्यास objective (बाह्यविषयनिष्ठ) होता व आहे, व त्यांस introspective (अपरोक्ष) पद्धतीची माहिती नाहीं, निदान त्यांत त्यांची विशेष प्रगति नाहीं व त्यामुळें भौतिक शास्त्रांत पाश्चात्यांचा ‘मागोवा’ घेणें आम्हांस प्राप्त व इष्ट असलें तरी मानसशास्त्रीय विचारांत आम्ही भारतीय लोक अग्रेसर आहों असें म्हटलें आहे.

पाश्चात्यांकडे Aristotle या ग्रीक तत्त्वज्ञान्यानें प्रथम मानसशास्त्रविषयक शास्त्रीय विचार प्रकट केले. त्याची भूमिका व दृष्टिकोन, त्यानें या शास्त्रास Science or knowledge of the soul असें नांव दिलें, यावरूनच स्पष्ट होतें. मध्ययुगीन कालांत सर्व पाश्चात्य जीवन व शास्त्र–विचार हीं धार्मिक व आध्यात्मिक कल्पनांनीं भारावलेलीं असून मानसशास्त्रच नव्हे तर भौतिकशास्त्रेंहि अंतर्मुख होतीं. ज्याला Modern Philosophy चा कालखंड म्हणतात तो तेराव्या किंवा चौदाव्या शतकांत सुरू झाला; तेव्हांपासून एकोणिसाव्या शतकाच्या मध्यापर्यंत जो कांहीं मानसशास्त्रविचार पाश्चात्यांकडे झाला तो सर्वस्वी Introspective Method नेंच झाला. त्या सुमारास मानसशास्त्रांतहि Objective Method चा उपयोग करतां येण्यासारखा आहे व केल्यास अधिक निश्चित प्रगति होण्याचा संभव आहे असें मानसशास्त्रज्ञांच्या लक्षांत आलें, व शरीरशास्त्र, जीवशास्त्र यांनीं झालेल्या प्रगतीनें तें अधिकाधिक शक्य होत गेलें अशी वस्तुस्थिति आहे.

२. ‘नवभारता’च्या त्याच अंकांत प्रा. क्षीरसागर यांनीं आपल्या आधुनिक विवाहासंबंधींच्या लेखांत मुसलमान समाजांतील तरुण–तरुणींशीं हिंदुधर्मीयांचे प्रीतिविवाह होणें गैर आहे असें प्रतिपादिलें आहे. परंतु त्यांच्या लेखांतील एकंदर भूमिकेशीं हें प्रतिपादन विसंगत आहे, व वस्तुतःही गैर आहे असें मला वाटतें. प्रीतिविवाहांत वधूवरांच्या आवडीनिवडी व जीवनाबद्दलच्या कल्पना यांस स्वातंत्र्य असतें व तें तसें असावें हें प्रा. क्षीरसागर यांस मान्य आहे. परंतु तें मान्य केल्यास भिन्न हिंदु जातींतील विवाहापुरतीच या सिद्धांताची व्याप्ति आहे व अहिंदु निदान मुसलमान समाजाच्या बाबतींत तें कधींहि खरें असूं शकणार नाहीं, हें म्हणणें कितपत योग्य ठरेल? प्रत्यक्ष झालेले हिंदु–मुसलमान विवाह अनिष्ट ठरले असें जर खरें नाहीं तर कदाचित बहुसंख्य मुसलमान जमातीच्या आक्रमकत्वाबद्दल वगैरे केलेलीं विधानें खरीं धरलीं तरी त्यास अपवाद असूं शकतात हेंच सिद्ध होतें. कोठल्याहि समाजांत प्रीतिविवाह अपवादात्मकच असतात. वस्तुतः असे विवाह अनिष्ट ठरले नाहींत, यावरून मुसलमान जमातीबद्दलचा आपला समज सर्वस्वीं बरोबर नाहीं हा उलटपक्षीं निष्कर्ष निघतो. विवाह–संस्थेला सामाजिक बाजू आहे हें जसें खरें, तसें समाज व्यक्तींचाच असतो, व व्यक्तींचें सुख व उन्नति यांनींच ‘समाजहित’ होतें हेंहि खरें आहे. भिन्नजातीय हिंदूंमध्येंहि प्रीतिविवाह संख्येनें पुष्कळ होत नाहींत, व सर्व भिन्नजातीय विवाह प्रीतिविवाह नसतात व नसणार. परंतु त्यांत व हिंदुमुस्लिम विवाहांत तत्त्वतः कांहींच फरक नाहीं. ‘भिन्नत्वा’मुळें व्यावहारिक अडचणी येत नाहींत असें कोणीच म्हणत नाहीं. योग्य प्रसंगीं त्या आल्या तरी जुमानूं नये असें व्यक्तीस व त्या आणूं नये असें समाजास सांगणें इतकेंच विचारवंतांचें काम आहे.— क. ही वि.

आपला

ता. ९–३–४९, पुणें. (प्रा.) प्र. रा. दामले

आणि त्यांच्या राण्यांनीं मृत्यूवर मात केली हें सांगण्याकरतांच प्रस्तुत कविता लिहिली. मृत्यूला आणि दैवाला आव्हान देणारीं आणखीं अशीं काव्यें सरोजिनीदेवींनीं लिहिलीं. त्यांचा थोडाफार उल्लेख मागें येऊन गेलाच आहे.

### काव्याची राज्ञी संयुक्त प्रांताची राज्ञी झाली

गोखले[8], दिल्ली, हिंदुस्थानची देणगी वगैरे सरोजिनीदेवींच्या कविता वाचल्या म्हणजे आपल्याला कवयित्रीच्या जळजळीत देशप्रेमाची ओळख पटते. [9]म. गांधींवरचें सुनीत म्हणजे १४ ओळींचें रूपक होय. आपल्या वडिलांना उद्देशून सरोजिनीदेवींनीं एक सुनीत लिहिलें तें महात्मा गांधींवरच्या सुनीताप्रमाणेंच इटॅलिअन पद्धतीचें. इटॅलिअन पद्धतीच्या या सुनीताच्या प्रकारांत विचाराच्या उदात्ततेइतकीच कलाकुसरीचीही आवश्यकता असते. "रत्नं समागच्छतु कांचनेन" असा योग झाला तर तें सुनीत यशस्वी होतें. सरोजिनीदेवींचीं हीं सुनीतें यशस्वी झालीं याचें कारण त्यांचें काव्यशिल्पावरचें स्वामित्व. शब्द, वृत्त, अनुप्रास, पदलालित्य, यमक हीं सर्व सरोजिनीदेवींच्या सेवेला हात जोडून तयार असत. एवढेंच काय, पण तीं काव्याच्या अर्थाच्या पुढें धावत जातात. अर्थ मागेंच रगाळत राहातो. सरोजिनीदेवींचें काव्य वाचात असतां स्विनबर्नच्या काव्याची आठवण होते त्याचेंही हेंच कारण असावें.

गोपाळ कृष्ण गोखले यांनीं सरोजिनीदेवींना देशसेवेची शपथ घ्यायला लावली, आणि पुढें या देशप्रेमाच्या ज्योतींत त्यांची काव्याची ज्योति विराम पावली. गोखल्यांच्यानंतर त्यांनीं गांधींचें अनुयायित्व पत्करलें. स्वातंत्र्याच्या लढ्यांत हाल-अपेष्टा सोसल्या. हिंदु-मुसलमानांची एकी व्हावी म्हणून जिवाचें रान केलें. दक्षिण ऑफ्रिकेंत जाऊन तेथील आपल्या देशबांधवांना धीर दिला. राष्ट्रसभेचें अध्यक्षपद भूषविलें. मतामतांच्या गलबल्यांत त्या आपल्या ध्येयापासून कधीं यत्किंचित् ढळल्या नाहींत. आयुष्याच्या आरंभीं त्यांना सर एडमंड गॉस् आणि ऑर्थर सायमन्झ् या थोर साहित्यभक्तांची संगति लाभली. तरुणपणीं मेजर नायडूंच्या बरोबर सुखाचा संसार केला. नंतर गोखले–गांधी यांचा सहवास. अखेर काव्यांची ही राज्ञी संयुक्त प्रांताची राज्ञी झाली. अशी भाग्यवती स्त्री एखाद्या युगांत जन्मास येते. सरोजिनीदेवी हिंदुस्थानांत जन्मल्या हें हिंदुस्थानचेंच महद्भाग्य नव्हे का ?

---

8. Gokhale; Imperial Delhi; Gift of India.
9. A Mystic Lotus; In Salutation to my Father's Spirit.

## सरोजिनीदेवींचें जीवनच काव्य होतें !

सरोजिनीदेवी ह्या पूर्व व पश्चिम यांमधील, हिंदुस्थानांतील पक्षोपपक्ष यांमधील एक उत्कृष्ट दुव्यासारख्या असून आदर्श शिष्टाई करणाऱ्या ( Ambassador ) होत्या. भारतभूच्या पोटीं महान् पुरुष व स्त्रीरत्नें निर्माण झालीं आहेत व पुढेंहि होतील यांत शंका नाहीं; परंतु अशा दुसऱ्या सरोजिनीदेवी निर्माण होतील कीं नाहीं याबद्दल मात्र शंका आहे !—त्यांनीं गव्हर्नर म्हणून किंवा राज्यसंस्थेच्या एक महान् सेविका म्हणून मोठेंच यश संपादन केलें आहे हें खरें; परंतु त्या नात्यानें त्यांची कामगिरी मला वर्णावयाची नाहीं. गव्हर्नर साधारणपणें जसे गणले जातात त्यांपेक्षां त्या किती तरी थोर होत्या. त्या आमच्याशीं इतक्या एकजीव होऊन गेल्या होत्या, आमच्या राष्ट्रीय संस्कृतिप्रवाहाशीं त्या इतक्या एकरूप होऊन गेल्या होत्या कीं त्यांचें यथातथ्य वर्णन करणें मला खरोखरीच कठिण आहे. ज्यांच्याशीं आपला घनिष्ठ संबंध आला आहे अशा माणसांचे गुणवर्णन करण्यांत योग्य तो सुमार ठेवणें आपणांस कठिणच जातें ! तरी सुद्धां असें वाटून जातें कीं सरोजिनीदेवींचें वर्णन करायला कितीहि विशेष

[पृष्ठ ५७४ पहा








# साहित्य-सत्कार

## चिप्सचीं स्मृतिचित्रें

[लेखकः जेम्स हिल्टन, अनुवादकः वि. द. साठे; (कल्पना-प्रकाशन) ३१७ सदाशिव, पुणें २, पृष्ठसंख्या १५४, किंमत ३ रु.]

जेम्स हिल्टनची मूळ कादंबरी Goodbye Mr. Chipps ही पहिल्यांदा १९३४ सालीं प्रसिद्ध झाली. १९४७ सालापर्यंत तिच्या एकवीस आवृत्त्या निघाल्या. तिच्यावर आधारलेला सुप्रसिद्ध बोलपट कमालीचा गाजला. यावरून कादंबरीनें लोकप्रियतेचा केवढा उच्चांक गांठलेला आहे याची कल्पना येईल. अशा या कादंबरीवर आकृष्ट होऊन जेव्हां श्री. वि. द. साठे यांनीं तिच्या मराठी अनुवादास सुरुवात केली तेव्हां त्यांच्या या सहृदय उपक्रमाचें 'नवभारता'-नें स्वागत करून पहिलें प्रकरण 'नवभारता'च्या १९४८ च्या जानेवारीच्या अंकांत आनंदानें प्रसिद्ध केलें. आतां त्यांनीं आपला तो अत्यंत सरस अनुवाद पूर्ण करून प्रस्तुत पुस्तकाच्या रूपानें मराठी वाङ्मयांत एक मोलाची भर टाकली आहे, यामुळें 'नवभारता'ला तर विशेष आनंद होणें स्वाभाविकच आहे.

चिप्सच्या स्मृतिचित्रांतून एका साध्या इंग्रज शिक्षकाची जीवनकथा मोठ्या माधुर्यानें प्रतीत होते. चिप्स हा १८७० सालीं आपल्या वयाच्या २३ व्या वर्षी ब्रूकफील्ड या लहानग्या गांवांतील शाळेंत शिक्षक म्हणून येतो; ४३ वर्षे त्याच शाळेंत साधा शिक्षक म्हणून काम करतो; ६५ व्या वर्षी सेवानिवृत्त होऊन त्याच गांवीं शाळेजवळच एक रस्ता टाकून रहात असतो. पुढें १९१७-१८ सालीं पहिल्या महायुद्धाच्या वेळीं, आपल्या वयाच्या ६९ व्या वर्षी त्याला परत बोलविण्यांत येऊन तो दोन वर्षे हेडमास्तराचें काम करतो; नंतर पुढें त्याच गांवीं शाळेजवळच आपल्या बिऱ्हाडीं परत येऊन १५ वर्षांनंतर त्याची जीवन-यात्रा संपते! किती साधें सुधें घटनाविशेषरहित जीवन! परंतु या स्मृतिचित्रांमधून तें किती भावमधुर, मानव्यानें ओथंबलेलें, आणि हृदयस्पर्शी असें प्रतीत होतें! कादंबरीकारानें जें कलातंत्र अवलंबिलें आहे तें अत्यंत हृदयंगम आहे. ऐशी उलटून गेलेले निकोप प्रकृतीचे वृद्ध चिप्स शेगडीच्या उबेंत चहा पीत बसले आहेत. त्यांना तेथून रस्त्याच्या पलीकडील आपल्या लाडक्या शाळेच्या घंटा ऐकूं येत असून तेथील विद्यार्थि-जीवनाचें स्पंदन ते हृदयानें अनुभवीत आहेत! दररोज त्यांच्याकडे ब्रूकफील्ड शाळेंतील बालगोपाल-मंडळी पाळीपाळीनें चहाला येत आहेत! त्यांच्या स्वप्नाळू मनापुढें आपल्या जीवनांतील कितीतरी स्मृतिचित्रें एकामागून एक तरळूं, तरंगूं लागतात. त्यांच्या हाताखालून गेलेल्या विद्यार्थ्यांच्या अनेक पिढ्या, विद्यार्थ्यांचीं मुलें, त्या मुलांचीं मुलें, किती मजेदार आणि किती सारखे त्यांचे स्वभाव! त्यांपैकीं कांहीं विद्यार्थी मोठे होऊन जीवनांत सुप्रतिष्ठित झाले आहेत, तर कांहीं युद्धामध्यें धारातीर्थी पडले! हेडमास्तरचे देखील किती नमुने चिप्सना अनुभवायला मिळाले! आपण ४८ वर्षांचे असतांना जिनें आपल्या शांत, एकाकी जीवनांत प्रवेश करून क्रांति घडवून आणली, पण जी शेवटीं दोन वर्षांनीं आपणास सोडून गेली ती आपली प्रिय पत्नी कॅथेराइन!--अशा अनेक आठवणी होऊन वृद्ध चिप्सच्या डोळ्यांतून अश्रू ओघळूं लागतात आणि त्या वाचतांना वाचकाच्याहि!

हीं 'स्मृतिचित्रें' वाचून या साध्या सामान्य शिक्षकाच्या व्यक्तिमत्त्वाचे अनेक विशेष आपल्या डोळ्यांसमोर उभे रहातात. चिप्सला खरा उत्स्फूर्त आनंद विद्यार्थ्यांमध्यें; त्यांच्यामध्यें त्यांचें मन रमतें; त्यांचें जीवन ब्रूकफील्डच्या शाळेच्या जीवनानें रंगून

गेलें आहे. तो निष्ठावंत शिक्षक असून कडक शिस्तीचाहि भोक्ता आहे. पण विद्यार्थ्यांविषयींची त्याची जिव्हाळ्याची भावना आणि त्याची स्वाभाविक विवेकशक्ति यामुळें तो शिक्षणपद्धतीचें वा शिस्तीचें कधीं स्तोम माजवीत नाहीं! त्याच्या स्वाभाविक विनोदबुद्धीमुळें तो लहान मुलांशींहि समरस होऊं शकतो. परिपक्व वयोमान झालेल्या या पुराणपुरुषाच्या ठिकाणीं व्यापक सहानुभूति दिसून येते. इंग्लंडचा एकनिष्ठ नागरिक या दृष्टीनें त्याचा देशाभिमान जागृत असला तरी संकुचित देशाभिमानाच्या आहारीं जाऊन त्याची वृत्ति विकृत बनलेली नाहीं. मानवी जीवनांतील मूल्याबद्दल त्याची निष्ठा अचल, अविकृत आहे. पहिल्या महायुद्धामध्यें तो शाळेंत शिकवीत असतांना आजूबाजूला बॉंबस्फोट ऐकूं येत असतात; तरी त्याचें लॅटिन ग्रामर व रोमन इतिहास शिकविणें चालूच असतें! त्याचें मन युद्धांतल्या घटनांनीं व्यथित होत असूनहि तो विवेकपूर्वक कर्तव्यबुद्धीनें शिकवीत असतो. मुलांना तो हेंच जणूं सांगत असतो कीं युद्धें ही माणसाची विकृति आहे, ज्ञान व बंधुभाव ही मूळ प्रकृति आहे! युद्धाच्या ऐन अमदानींत शाळेच्या इमारतींतून व क्रीडांगणांतून लष्करी छावण्या वसल्या असून बंदुकीच्या नेमबाजीचें शिक्षण देण्यांत येत असतें; त्याबद्दल त्याचें मत विचारलें असतांना तो सरळ सांगतो— "याहतकें माणसाचा अधःपात करणारें दुसरें शिक्षण नाहीं!" एक वेळचा त्याचा सहकारी जर्मन शिक्षक शाळा सोडून जर्मनीला गेलेला, युद्धाच्या वेळीं बाकीच्या लोकांच्या दृष्टीनें शत्रु बनलेला; पण चिप्स त्याच्याकडे मानव्याच्या, सहानुभूतीच्या दृष्टीनें बघूं शकतो.

श्री. केशवराव भोळे यांनीं या पुस्तकाला लिहिलेल्या आपल्या मार्मिक प्रस्तावनेंत म्हटल्याप्रमाणें चिप्समध्यें ब्रिटिश राष्ट्रीय स्वभावाचें प्रतीक आपणांस पहावयास मिळतें. विवेकबुद्धि, समतोलपणा किंवा प्रमाणशीरपणा, शांत पण कणखर असा खंबीरपणा, आपल्यापेक्षां भिन्न प्रकृतीच्या किंवा विरोधी गोष्टींशीं सहानुभूतीनें व खेळकरपणानें जमवून घेण्याची वृत्ति, प्रामाणिक स्वकार्यनिष्ठा व संस्थेबद्दलची आत्मीयता हे ब्रिटिश लोकांचे गुण त्यांच्या इतिहासांत—विशेषतः राष्ट्रीय आपत्तीच्या वेळीं दिसून आलेले सुप्रसिद्ध आहेत. या सर्व गुणांचें इंगित आपणांस चिप्सच्या सामान्य जीवनांत सूचित केलेलें दिसून येतें.

—वि. म. बेडेकर

---

**सरोजिनीदेवींचें जीवनच काव्य होतें!** (पान ५७२ वरून चालू)

उपयोजिलीं तरी तीं चालतलि! कारण त्यांच्या व्यक्तिमत्त्वांत खरोखरीच कांहीं विलक्षण तेज होतें, विलक्षण ओज होतें. त्यांच्यावर ईश्वराचा वरदहस्त होता. त्यांचे कांहीं गुण तर खरोखरी अद्वितीयच होते. कवयित्री म्हणून त्यांच्या सार्वजनिक जीवनास आरंभ झाला. पण त्यांनीं कागद आणि लेखणी यांनीं लिहिलेलें काव्य फार नाहीं. उलटपक्षीं त्यांचें सबंध जीवनच एक काव्य होतें, एक गीत होतें! जसें आमच्या राष्ट्रपित्यामुळें आमच्या राष्ट्रीय स्वातंत्र्यसंग्रामांत नैतिक उदात्तता व भव्यता ह्यांचा संचार झाला, तसाच सरोजिनीदेवीमुळें त्या संग्रामांत कलामयता व काव्यगुण हीं अवतरलीं. केवळ आपल्या देशांतीलच नव्हे तर पौर्वात्य आणि पाश्चात्य देशांत जे संस्कृतींचे निरनिराळे प्रवाह आहेत त्यांचा सुंदर समन्वय सरोजिनीदेवींच्या ठिकाणीं झाला होता; यामुळेंच त्या एक महान् राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय व्यक्ति म्हणून गणल्या गेल्या. त्या महान् भाष्यकार होत्या. त्यांनीं आपल्या प्रतिभेनें हिंदुस्थानांतलि संस्कृतीच्या निरनिराळ्या बाजूंवर, त्याचप्रमाणें पाश्चात्य संस्कृतीचे हिंदुस्थानवर जे परिणाम झाले त्यांवर, अर्थपूर्ण भाष्यें केलीं.

—पं. जवाहरलाल नेहरू [ हिंदी लोकसभेंत केलेल्या भाषणांतून. (३।३।४९) ]










# मतें आणि मतभेद

श्री. संपादक, 'नवभारत' यांस—

सा. न. वि. वि.

१. मार्च १९४९ च्या 'नवभारत'च्या अंकांतील श्री. कोल्हटकर यांच्या भारतीय व पाश्चात्य मानसशास्त्रासंबंधींच्या लेखांत पाश्चात्यांचा मानसशास्त्राचा अभ्यास objective (बाह्यविषयनिष्ठ) होता व आहे, व त्यांस introspective (अपरोक्ष) पद्धतीची माहिती नाहीं, निदान त्यांत त्यांची विशेष प्रगति नाहीं व त्यामुळें भौतिक शास्त्रांत पाश्चात्यांचा 'मार्गोवा' येणें आम्हांस प्राप्त व इष्ट असलें तरी मानसशास्त्रीय विचारांत आम्ही भारतीय लोक अग्रेसर आहों असें म्हटलें आहे.

पाश्चात्यांकडे Aristotle या ग्रीक तत्त्वज्ञान्यानें प्रथम मानसशास्त्रविषयक शास्त्रीय विचार प्रकट केले. त्याची भूमिका व दृष्टिकोन, त्यानें या शास्त्रास Science or knowledge of the soul असें नांव दिलें, यावरूनच स्पष्ट होतें. मध्ययुगीन कालांत सर्व पाश्चात्य जीवन व शास्त्र–विचार हीं धार्मिक व आध्यात्मिक कल्पनांनीं भारावलेली असून मानसशास्त्रच नव्हे तर भौतिकशास्त्रेंहि अंतर्मुख होतीं. ज्याला Modern Philosophy चा कालखंड म्हणतात तो तेराव्या किंवा चौदाव्या शतकांत सुरू झाला; तेव्हांपासून एकोणिसाव्या शतकाच्या मध्यापर्यंत जो कांहीं मानसशास्त्रविचार पाश्चात्यांकडे झाला तो सर्वस्वी Introspective Method नेंच झाला. त्या सुमारास मानसशास्त्रांतहि Objective Method चा उपयोग करतां येण्यासारखा आहे व केल्यास अधिक निश्चित प्रगति होण्याचा संभव आहे असें मानसशास्त्रज्ञांच्या लक्षांत आलें, व शरीरशास्त्र, जीवशास्त्र यांनीं झालेल्या प्रगतीनें तें अधिकाधिक शक्य होत गेलें अशी वस्तुस्थिति आहे.

२. 'नवभारता'च्या त्याच अंकांत प्रा. क्षीरसागर यांनीं आपल्या आधुनिक विवाहासंबंधींच्या लेखांत मुसलमान समाजांतील तरुण–तरुणींशीं हिंदुधर्मीयांचे प्रीतिविवाह होणें गैर आहे असें प्रतिपादिलें आहे. परंतु त्यांच्या लेखांतील एकंदर भूमिकेशीं हें प्रतिपादन विसंगत आहे, व वस्तुतःही गैर आहे असें मला वाटतें. प्रीतिविवाहांत वधूवरांच्या आवडीनिवडी व जीवनाबद्दलच्या कल्पना यांस स्वातंत्र्य असतें व तें तसें असावें हें प्रा. क्षीरसागर यांस मान्य आहे. परंतु तें मान्य केल्यास भिन्न हिंदु जातींतील विवाहापुरतीच या सिद्धांताची व्याप्ति आहे व अहिंदु निदान मुसलमान समाजाच्या बाबतींत तें कधींहि खरें असूं शकणार नाहीं, हें म्हणणें कितपत योग्य ठरेल? प्रत्यक्ष झालेले हिंदु–मुसलमान विवाह अनिष्ट ठरले असें जर खरें नाहीं तर कदाचित् बहुसंख्य मुसलमान जमातीच्या आक्रमकत्वाबद्दल वगैरे केलेलीं विधानें खरीं धरलीं तरी त्यांस अपवाद असूं शकतात इतकेंच सिद्ध होतें. कोठल्याहि समाजांत प्रीतिविवाह अपवादात्मकच असतात. वस्तुतः असे विवाह अनिष्ट ठरले नाहींत, यावरून मुसलमान जमातीबद्दलचा आपला समज सर्वस्वीं बरोबर नाहीं हाच उलटपक्षीं निष्कर्ष निघतो. विवाह–संस्थेला सामाजिक बाजू आहे हें जसें खरें, तसें समाज व्यक्तींचाच असतो, व व्यक्तींचें सुख व उन्नति यांनींच 'समाजहित' होतें हेंहि खरें आहे. भिन्नजातीय हिंदूंमध्येंहि प्रीतिविवाह संख्येनें पुष्कळ होत नाहींत, व सर्व भिन्नजातीय विवाह प्रीतिविवाह नसतात व नसणार. परंतु त्यांत व हिंदुमुस्लिम विवाहांत तत्त्वतः कांहींच फरक नाहीं. 'भिन्नत्वा'मुळें व्यावहारिक अडचणी येत नाहींत असें कोणीच म्हणत नाहीं. योग्य प्रसंगीं त्या आल्या तरी जुमानूं नये असें व्यक्तीस व त्या आणूं नये असें समाजास सांगणें इतकेंच विचारवंतांचें काम आहे.—क. ही वि.

आपला

ता. ९–३–४९, पुणें. (प्रा.) प्र. रा. दामळे

# सार-संकलन

## अमेरिकेची अप्रसिद्ध पण महत्त्वाची बाजू !

अमेरिका ही कोट्यधीश कुबेरांची, गगनचुंबी इमारतींची, अद्ययावत् शास्त्रीय सुखसोयींची अशी सुप्रसिद्ध आहे. पण अमेरिकेची दुसरीहि अप्रसिद्ध पण भावी कालाच्या दृष्टीनें अत्यंत महत्त्वाची अशी बाजू आहे. अमेरिकेंतहि गरिबींत खितपत पडून दिवस कंठणारे लक्षावधि लोक आहेत. वॉशिंग्टनमधील कॅपिटॉल या सरकारी प्रासादतुल्य कचेरीपासून जवळच एक मैलावर कांहीं अशीं झोंपडीवजा घरें आहेत कीं ज्यांच्या जीर्ण भिंतीला पेट्रोल डब्यांच्या, व बिस्किट डब्यांच्या तुकड्यांचीं ठिगळें लावलीं असून त्या भिंती बिचाऱ्या कशाबशा उभ्या आहेत ! अशा गोठ्यावजा घरांतून गुरांसारखे लोक रहात आहेत. अशा लोकांची संख्या अमेरिकेंत वीस लाख आहे ! याशिवाय ७–८ लाख लोक युद्धावरून परत आलेले असे आहेत कीं ज्यांना स्वस्तांत स्वस्तहि घरभाडें परवडत नाहीं ! अमेरिकेंत स्वस्तांत स्वस्त असें घरभाडें १५० रु. महिना आहे !— साधारण बऱ्यापैकीं मासिक उत्पन्न असूनहि, पुढील कित्येक महिन्यांचे पगार आपल्या भाड्यापोटीं हस्तेवंदीनें लिहून देणारे असे लक्षावधि लोक अमेरिकेंत आहेत. अशा परिस्थितींत असा प्रश्न उद्भवतो कीं, अमेरिका ही समाजवादाकडे लवकरच झुकेल का ?— त्या प्रश्नाचें उत्तर होकारार्थी येऊं शकतें.

अमेरिकन कामगारवर्ग जोरानें संघटित होत आहे. अमेरिकेंत दोन प्रचंड मजूर-संघटना आहेत : अमेरिकन फेडरेशन ऑफ लेबर आणि कॉंग्रेस ऑफ इंडस्ट्रिअल ऑर्गनायझेशन्स. १६ वर्षांपूर्वी, कॉं. इं. ऑ. ही संघटना अस्तित्वांतच आली नव्हती; १६ वर्षांपूर्वी अमेरिकन फेडरेशन ऑफ लेबर ह्या मजूर-संघांत ३० लाख सभासद होते, ते हल्लीं ७५ लाख झाले आहेत. याशिवाय चार लाख रेल्वे-कामगार, सहा लाख यंत्रकामगार, दोन लाख टेलिफोन–कामगार आणि सहा लाख खाणींतले कामगार यांचे निरनिराळे संघ धरल्यास सुमारें दीड कोट सुसंघटित कामगार आज अमेरिकेंत आहेत.

तरी पण हे कामगार साधारणतः राजकीय दृष्ट्या अपरिपक्वच आहेत. एका कामगार–पुढाऱ्याला मीं विचारलें " अमेरिका समाजवादाकडे झुकते आहे का ? तुमचा अनिर्बंध व्यापारपद्धतीवर विश्वास आहे का ? " त्यानें जें उत्तर दिलें त्यावरून अमेरिकन कामगारांची राजकीय अपरिपक्वता दिसून येते. तो म्हणाला—" आम्ही कोणताही वाद जाणीत नाहीं. आमची आपली एक विशिष्ट पद्धत आहे ! अर्थात् अनिर्बंध व्यापार-पद्धतींत एक मोठा धोका आहेच—उद्योगधंदेवाल्या लोकांची नफ्याची प्रत्येक पैन्पै आपल्याकडे ओढून घेण्याची प्रवृत्ति असते ! त्या प्रवृत्तीला आळा घातला पाहिजे. अर्थात् तो घालतांना आम्ही आमचा समतोलपणा सोडणार नाहीं ! " नफ्याला आळा घालण्याचें त्यांच्या मनांत येत आहे यांतच खरी मेख आहे.— अमेरिकन उद्योगपतींची दृष्टि आज स्टॅलिनवर आहे. तो जितकें ताठर-पणाचें धोरण स्वीकारील तेवढें त्यांना हवेंच आहे. कारण त्यामुळेंच त्यांचे शस्त्रास्त्रांचे, विमानांचे कारखाने चालू रहातील !— अमेरिका 'डावीकडे' झुकेल का ? या श्लेषगर्भ प्रश्नाचें श्लेषगर्भ उत्तर असें : जोंपर्यंत परिस्थिति अशी अमेरिकेच्या मनाप्रमाणें 'सरळ' आहे, तोंपर्यंत ती कदाचित् 'डावीकडे' झुकणार नाहीं !

**बेव्हर्ली निकल्स (संडे न्यूज)**

---





अनुक्रमणिका

# नवभारत



## या अंकांतील जाहिराती व जाहिरातदार











अनुक्रमणिका



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास




नवभारत
७५
अमृतमहोत्सवी
वर्ष


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास




नवभारत
७५
अमृतमहोत्सवी
वर्ष

# औद्योगिक वृत्त-विशेष

(पॅरेमाउंट पब्लिसिटी सिंडिकेट लि., पुणें २ तर्फे प्रकाशित.)

—आयुर्वेदीय औषधांचें निर्मितींत मोठें नांव मिळविलेल्या पनवेलच्या धूतपापेश्वर कारखान्याचे **धूतपापेश्वर इंडस्ट्रीज् लि.** (गिरगांव रोड, मुंबई) या २५ लक्ष रु. अधिकृत भांडवलाच्या कंपनींत रूपांतर झालें असून श्री. नानासाहेब पुराणिक हे या कंपनीचे पहिले डायरेक्टर आहेत.

—अल्कोहोलिक पेयांच्या धंद्यासाठीं **डेक्कन ब्रुअरीज् लि.** (नीवलचेंबर्स, पार्सी बझार स्ट्रीट, मुंबई.) ही ६ लक्ष रु. भांडवलाची कंपनी निघाली असून श्री. एस्. एम्. सापळे हे तिचे पहिले डायरेक्टर आहेत.

—**लॅबोरेटरी इन्डो-फ्रान्काइज् लि.** (लक्ष्मी बिल्डिंग्ज, छोटाणी रोड, माहीम) ही पांच लक्ष रु. भांडवलाची कंपनी औषधें, रसायनें इ. निर्मितीसाठीं स्थापन झाली असून डॉ. आर. व्ही. साठे हे तिचे पहिले डायरेक्टर आहेत.

—**पांडुरंग ॲग्रिकल्चरल प्रॉडक्ट्स् लि.** (स्टेशन रोड, पंढरपूर) यांनीं कंपनीच्या वाढत्या व्यापामुळें सर्वांना सोइस्कर व्हावें म्हणून आपली कचेरी कुरोलीहून पंढरपूर येथें आणली आहे.








विक्रीस तयार !

# नवभारत

अनेक ग्राहकांच्या मागणीवरून 'नवभारता' च्या पहिल्या वर्षाच्या (ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर १९४८) बारा अंकांचें उत्कृष्ट बांधीव पुस्तक विक्रीस तयार असून म. ऑ. नें रु. पंधरा फक्त आल्यास तें रजि. बुक-पोस्टानें घरपोंच पाठवूं. व्ही. पी. नें पाठविलें जाणार नाहीं.

## जुने अंक विकत घेऊं

'नवभारत' चे जानेवारी १९४८ व मार्च १९४८ हे दोन अंक आमचेकडे मुळींच शिल्लक नसल्यानें ते योग्य किंमतीस विकत घेऊं. वरील अंक कोणाकडे असल्यास त्यांनीं आम्हांस कळविण्याची अवश्य कृपा करावी.

व्यवस्थापक
'नवभारत'
२९१ शनिवार, पुणें २

## वर्गणीदारांस सूचना

(१) 'नवभारत'चा अंक दरमहा १ तारखेच्या आंत नियमितपणें काळजीपूर्वक पोष्टांत टाकला जातो. वर्गणीदारांस जर आपला अंक ५ तारखेपर्यंत मिळाला नाहीं तर त्यांनीं प्रथम स्थानिक पोष्ट ऑफिसांत चौकशी करून नंतर आमचेकडे लिहावें. अंक शिल्लक असला तरच पाठविला जाईल. अंक न मिळाल्याबद्दल १० तारखेनंतर येणाऱ्या तक्रारीस उत्तर दिलें जाणार नाहीं.

(२) वर्गणीदार कोणत्याहि महिन्यापासून होता येते.

(३) पत्रव्यवहार करतांना नेहमीं अनुक्रम नंबर लिहावा. 'नवभारत' कचेरींतून दरमहा जो अंक रवाना होतो त्यावर पत्त्याच्या वरच्या बाजूस डाव्या हाताला अनुक्रम-नंबर लिहिलेला असतो.

(४) पत्ता बदलावयाचा असल्यास त्याबद्दलची सूचना कचेरीस २५ तारखे-पूर्वी मिळाली पाहिजे. त्यानंतर सूचना-पत्र आल्यास त्याची अंमलबजावणी त्याच महिन्यांत न होतां पुढील महिन्यापासून केली जाईल.

(५) 'नवभारत' च्या कोणत्याहि एजंटास वर्गणी वसूल करण्याचा अधिकार नाहीं. त्यामुळें कचेरी व वर्गणीदार या दोघांनाहि त्रास होतो व विलंब लागतो. म्हणून वर्गणी नेहमीं कचेरीकडे खालील पत्त्यावर पाठविण्याची कृपा करावी.

व्यवस्थापक
'नवभारत',
२९१ शनवार पेठ, पुणें २.







गांधी-तत्त्वज्ञानाच्या अभ्यासकांसाठीं

आमचीं नवीं प्रकाशनें

# गांधीजींचें मानस

संग्राहक :

आर. के. प्रभु आणि यू. आर. राव

अनुवादक :

श्री. अण्णासाहेब सहस्रबुद्धे

श्री. माधव पुरुषोत्तम लिमये

गांधीजींच्याच लेखनांतून विषयवारीनें निवडून काढिलेल्या उत्कृष्ट वेच्यांच्या संग्रहामुळें प्रस्तुत पुस्तकाला गांधी-तत्त्वज्ञानाच्या संदर्भ-ग्रंथाचेंच स्वरूप प्राप्त झालें आहे. प्रत्येक महाराष्ट्रीयाच्या घरीं हें 'आधुनिक उपनिषद्' अवश्यमेव हवेंच.

पृष्ठसंख्या २२५ : मूल्य ४ रुपये



# दिल्ली-डायरी

अनुवादक : साने गुरुजी

म. गांधींच्या १०-९-'४७ ते ३०-१-'४८ मधील प्रार्थनोत्तर प्रवचनांचा संग्रह. गांधीजींच्या हृदय-व्यथेचें आणि नष्ट पावलेल्या मानव-प्रतिष्ठेच्या पुनरुत्थानासाठीं त्यांनीं केलेल्या महान् प्रयत्नांचें दर्शन पानापानांतून घडविणारा गांधीजींचा अखेरचा ग्रंथ.

पृष्ठसंख्या २८० : मूल्य ६ रुपये

सुलभ राष्ट्रीय ग्रंथमाला, पुणें २

अनुक्रमणिका






